# दोन शब्द—

चित्रकार रंगा या नांवाची कादंबरी १९४२ च्या एप्रिल मे महिन्यांत धुळ्याच्या तुरुंगांत मी लिहिली होती. मला ती फार आवडली होती. मी १९४२ च्या १० ऑगस्टला सुटलों. ९ ऑगस्टचा अमर लढा सुरू झाला होता. मी अमळनेरला सारें सामान ठेवून पुण्याकडे एकदम निघून गेलों. मित्रांबरोबर भूमिगत होतों. खान्देशांतील अनेक मित्र तुरुंगांत होते. त्यांना जरी कांहीं नको असलें तरी त्यांच्या घरीं पाठवणें आवश्यक असे. भूमिगत असतांनाच गोड गोष्टींचे कांहीं भाग मी लिहिले. मिळाले तें पाठवीत असें. गोड शेवट व चित्रकार रंगा महाराष्ट्र ग्रंथ भांडार प्रसिद्धिणार होतें. चित्रकार रंगा सुरुहि झाले. खान्देशांतून एक मित्र माझ्या वह्या घेऊन येत होते. वाटेंत झडती होऊन या वह्या जप्त झाल्या. पुढे त्या मिळाल्या. मी त्यांतील पहिलीं दोन प्रकरणे पाठवलीं. तों मी पकडला गेलो. जेथें रहात असें तेथें झडती झाली. त्यांत चित्रकार रंगा हरवला. गेली वही. पुन्हां लिहून बाहेर काढायला वेळ कुठला ?

परंतु गेल्या महिन्यांत मी ती गोष्ट पुन्हां नव्यानें लिहिली. मूळची सर हिला नाहीं. मूळची गोष्ट मोठी होती. अनेक वर्णनें, चिंतनें होतीं. आतां लिहून काढली आहे ती आकारानें लहान आहे, रंगानेंहि निराळी आहे. परंतु आंतील आत्मा तोच आहे.

मी चित्रकलेच्या परीक्षा दिल्या नाहींत. परंतु चित्रांची मला अत्यन्त आवड. चित्रमय भारत रंगवावा वाटे. पुन्हां जन्म मिळाला तर चित्रकार व्हावें असें मी अमळनेरला मुलांजवळ म्हणें. चित्रकार केळकर, चित्रकार पिंगळे तेथील होतकरू विद्यार्थी. मी त्यांचीं चित्रें बघायचा, त्यांना कल्पना द्यायचा. विशेषतः नागेश पिंगळेशीं अधिकच परिचय झाला. आज तो बडोद्याला कला-भवनांत शिक्षक आहे. त्याच्याजवळ चित्रकलेंतील प्रतिभा आहे. नवनवकल्पना त्याला सुचतात. चित्रकला शिकवण्यासाठी नवमार्गदर्शक क्रमिक पुस्तकें त्याच्या

जवळ लिहून आहेत. परंतु त्याची ओळख नाहीं, वशीला नाहीं. तो एक झांकलें रत्न आहे. मी त्याला विश्वभारतींतहि जाऊन ये म्हणायचा. परंतु मी त्याला १९४० च्या सुमारास पैसे देऊं शकलों नाहीं. तो मुंबईस असतांना ४२ मध्ये त्याच्या खोलींत खान्देशी भूमिगत जमायचे. नागेश ध्येयमूर्ति आहे. त्याची धडपड पाहून मला वाईट वाटे. चित्रकार रंगा या गोष्टीचें मूळचें नांव 'चित्रकार नागू' असेच होतें. परंतु या पुनर्लेखनांत मी रंगा नाव ठेवलें. नागेशजवळ भारतीय संस्कृति, चित्रकला, याच्याविषयीं मी तासन्तास बोलत असे. निरनिराळ्या चित्रकला संप्रदायातील वैशिष्ट्ये त्याला सांगत असे. तो तन्मय होत असे. आज नागेशचे विद्यार्थीहि तयार झाले आहेत. त्याचा एक ख्रिश्चन व मुसलमान विद्यार्थी बक्षिसें मिळवित आहेत. नागेशनें मला परवां लिहिले, "गुरुजी, अमळनेरच्या माझ्या विद्यार्थ्यांना बक्षिसे मिळत आहेत. तुम्ही मला प्रफुल्लचंद्र रॉय यांच्याविषयीं एकदां सांगितलेंत कीं त्यांना D. Sc ही शास्त्रांतील मोठी पदवी नव्हती परंतु त्यांचे विद्यार्थी कितीतरी D. Sc. झाले. म्हणून त्यांना डी. एस्. सींचे तात असे म्हणत. मला ते शब्द आठवतात"

चित्रकार रंगामध्ये ती धडपड मी दाखविली आहे. चित्रकलेच्या द्वारा महान् ध्येयें मूर्त करण्याची धडपड. मी लहानपणापासून भारताचा, मानवतेचा उपासक आहे. भारत मला प्राणाहून प्रिय कां तर सारे धर्म नि संस्कृति येथें आहेत म्हणून. भारत म्हणजे मानवजातीचें पुंजीभूत पूज्य प्रतीक ! प्रान्तीयता, जातीयता, धर्मान्धता, या गोष्टी मला कधींहि शिवल्या नाहीत. माझ्या लिहिण्यांतून हेंच ओतलें जात असते. १९३१ मध्ये अमळनेरच्या माझ्या खोलींत मी खिचडी करायचा. माझ्याबरोबर खिचडी खायला हिंदु मुसलमान मुले बसायची. आमच्या स्वप्नांत, ध्येयांत सर्वांना नांदवणारा प्यारा महान् भारत असे व आहे.

प्रस्तुतच्या पुस्तकांत सर्वत्र महान् ऐक्याचे हें वातावरण आढळेल. राष्ट्रीयतेच्या पार्श्वभूमीवरील अतिराष्ट्रीयवृत्ति, आंतरराष्ट्रीय वृत्ति, किंवा आंतरराष्ट्रीय वृत्तीच्या पार्श्वभूमीवरील राष्ट्रीय वृत्ति !

आज भारत मुक्त झाला आहे. कादंबरींतील धडपडणारा रंगा म्हणतो "स्वतंत्र भारताचें सभागृह ( पार्लमेंट ) मी रंगवीन. माझी कला परकी सरकारला मी विकणार नाहीं. परकीयांचा मला द्वेष नाही. कला विश्वजनांना जोडते. परंतु गुलामगिरी लादणारें हें सरकार म्हणून माझा कुंचला तेथें नाहीं जाणार." तो उपाशी राहातो, परंतु कलेचा विक्रा करित नाहीं. एक लखपति त्याला म्हणतो "आमच्या प्रासादांत आम्ही सांगूं तशीं चित्रें रंगवा". चित्रकार रंगा नाकारतो. तो म्हणतो "ते प्रसंग मला न आवडले तर ? माझें आधीं हृदय उचंबळतें, रंगतें, मगच मी रंगवतो."

'भारताचा शोध' या महान ग्रंथांत पंडित जवाहरलाल म्हणतात "गणिती रामानुजं जगद्विख्यात होतात काय आणि लगेच मरतात काय! त्यांची उपासमार झालेली. भारतांतील कितीतरी बुद्धि दारिद्र्याच्या क्षयरोगानें गेल्या शेदोनशे वर्षांत नष्ट झाली असेल. राष्ट्राचे, मानवजातीचें हे मोठे नुकसान. स्वातंत्र्य आले म्हणजे असे नाहीं होणार." अशा अर्थाचे ते शब्द आहेत. मी किती तरी मुले कलात्मक गुणांचीं पाहिलीं आहेत चित्रकलेचे गुण असलेलीं हरिजन मुलें पाहिली आहेत. त्यांना कधी कशी संधि मिळणार ? शिक्षण तर अधिकच महाग होत आहे.

सर्वांच्या जीवनाचा कधी होणार विकास ? संस्कृतिसंवर्धनांत सारी जनता भाग घेत आहे हें कधीं होणार ? सर्जनशक्ति मारली जात आहे. शेतकऱ्यांना, कामगारांना अधिक विश्रान्ति मिळाली तर त्या फुरसुतीच्या वेळेस ते साहित्य निर्माण करतील, कला अभ्यासतील, दुर्बीण घेऊन आकाशाकडे पाहतलि, शास्त्र-संशोधक होतील. कधीं होणार हें ?

रंगाला असा भारत पाहिजे आहे, जेथें कोणाच्याहि विकासाच्या आड दारिद्र्य येणार नाहीं. दैन्य, दास्य, दारिद्र्य हे शब्द स्वतंत्र भारतांत नकोत.

त्याचप्रमाणें हा सारा भारत माझा, हे सारे लोक माझे, याचीहि रंगाला तहान आहे. तो महान् चित्रकार नंदलाल यांच्याजवळ बोलत असतो. खान्देशांत फैजपूर कॉंग्रेसच्या अधिवेशनासाठीं नंदलाल आलेले असतात. त्यांना एकदम वंगभूमीची आठवण येते. ते म्हणतात "रंगा, प्रियतम वंगभूमीचे स्मरण होतांच

माझें हृदय उचंबळतें. परंतु आतां या खान्देशांत येऊन साऱ्या भारताचा मी होत आहें. येथीलहि सृष्टिसौंदर्य पाहून मी आनंदित होतों. ज्या खान्देशनें अजिंठा दिला, ज्या महाराष्ट्रानें वेरुळ, कार्ला, घारापुरी, हीं अमर लेणी दिलीं, त्या महाराष्ट्राला प्रणाम. रंगा, आपण सारे भारताचे. सारे प्रान्त भाऊ भाऊ. आपण एकमेकांचें घेऊं, आनंद निर्मू. आपलें हृदय एकच आहे. तोच अद्वैताचा घोष साऱ्या भारतवर्षाच्या जीवनांत आहे, माहित्यांत आहे."

आज अशी दृष्टि हवी आहे. सर्व प्रातांनीं परस्परांस प्रेम दिले पाहिजे, परस्पराच्या वाढीला वाव दिला पाहिजे. सारीं लेंकरें नीट वाढत आहेत असें पाहूनच मातेला कृतार्थता वाटत असते. स्वतंत्र हिंदुस्थानांत उद्यां कला शिकवणाऱ्या संस्था प्रान्तांप्रान्तांत उभ्या राहतील. या सर्वांना सरकारनें, जनतेने मदत दिली पाहिजे. एखाद्या प्रान्तालाच मक्तेदारी नको. सर्वांना मोकळेपणाने वाढायला वाव हवा, संधि हवी, साहाय्य हवें.

कलावान् हा सर्वांना जोडतो. संगीतकलेचा भारतीय इतिहास पाहूं तर हिंदु मुसलमान एकमेकाचे शिष्य होत आहेत, सेवा करित आहेत, शिकत आहेत, असें दिसतें. ही गोष्ट जीवनाच्या कलेंतच आतां दाखल केली पाहिजे. या हिंदी संघराज्यांत तरी ज्याप्रमाणें अतिरेकी प्रान्तभेद नकोत त्याप्रमाणेच जात्यन्धता व धर्मान्धताहि नको आहे. महाराष्ट्रानें धर्माचें व जातीचें ऐक्य पुकारलें पाहिजे. सारी शक्ति त्यात ओतली पाहिजे. या कादंबरीतील वासुकाकांना एक धर्मान्ध शाळा काढून टाकते. वासुकाकांचा अपराध काय? ते सर्वांना जवळ घ्या सांगत हा. त्या शाळेंतून जातांना ते मुलांना म्हणतात :

"मी दुसऱ्या कोठल्यातरी शाळेंत जाईन. येथे तुम्हांला देत असें ते नवीन मुलांना देईन. तेथून कदाचित् मला हांकलतील. कारण आजकाल शिक्षणसंस्था जात्यंधतेचे अड्डे बनत आहेत. तुम्हां सर्वांना संकुचित, द्वेषी, मत्सरी बनवण्याचे प्रयत्न चालले आहेत. तुम्ही हें विष पचवून मृत्युंजय बना. राष्ट्राला प्रेमाचें अमृत द्या. सारे धर्म, सर्व जाति, यांना एकत्र नांदवायचा प्रयोग आपणांस करावयाचा आहे. विचारानें, भावनेनें उत्तरोत्तर मोठे व्हा. हाच सुखाचा मार्ग. नवीन मैत्री जोडा, नवीन शिका. उर्दू शिका. ईजिप्तपासून पंजाबपर्यंत

उर्दू लिपी. आशिया आफ्रिका यांतील मुस्लीम देशांना इंग्रजी पत्रांतून नि पुस्तकांतून समजून घेणार वाटतें? तुम्हाला जवळच्या सर्व राष्ट्रांशीं संबंध जोडावे लागतील. त्यांच्या भाषा शिकाव्या लागतील. शेजाऱ्याची भाषा शिकणें पाप नसून तो शेजारधर्म आहे. चिनी शिका, उर्दू शिका, रशियन शिका. उत्तरोत्तर पुढें जा. नवभारत तुम्हांला निर्मायचा आहे."

चित्रकार रंगा नवभारताचें चित्र उपासणारा आहे, रंगवणारा आहे. दहा हजार वर्षांच्या परंपरेतून आलेलीं ध्येयें घेऊन त्यांना नवीन रंगरूप देणारा. तो रंगा या ध्येयाशी एकरूप झाला, देवाघरीं गेला. त्याच्या ध्येयाशीं आपण सारे एकरूप होऊं या, तदनुरूप वागूं या. आपण सारेच नवभारताचे शिवसुंदर–भाग्यविधाते.

चित्रकार रंगाच्या जीवनसमाप्तीनंतर त्याची ध्येयपूजक पत्नी नयना भारतचित्रकलाधाम नांवाची संस्था उभी करते. ध्येयवादी रंगाने आपल्या लहानशा खोलीवरच बाहेर तशी पाटी लावली होती. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या चित्रांना जागतिक प्रदर्शनांत बक्षीस मिळतें. अमेरिकन मनुष्य लाखों रुपयांना तीं विकत घेतों म्हणतो. नयना म्हणते " ती भारताची ठेव आहे." पंडित जवाहरलाल त्यामुळें उचंबळतात व पांचलाख रुपये संस्थेला पाठवतात. आणि संस्थेंत पारशी मुलगी मणी, मुसलमान मुलगी आयेषा, हिंदू मुलगी लता येतात. सर्वांना जवळ घेणारा नवभारत तेथें कलांची उपासना करूं लागतो.

'माझ्या गोष्टी' म्हणून दहा भाग मी लिहिणार आहे. त्या गोष्टी परभृत नसतील, माझ्याच असतील. त्यांतील ही पहिली गोष्ट मी आज देत आहें. ध्येयोपासक महान् महाराष्ट्राला ती आवडो. मला तर ती अत्यन्त प्रिय आहे. पाहिलेलें, ऐकलेलें, अनुभवलेलें येथें आहे. परंतु त्याचा व्यक्तिगत संबंध कोणाशींच नाहीं. शेवटीं ही एक गोष्ट आहे हें कोणी विसरूं नये.

१३ मेघाभुवन,
पारशी कॉलनी, दादर, मुंबई.
८।१०।१९४८

**पां. स. साने.**

# बाल्य :



काशीचे हे पहिले बाळंतपण. ती माहेरी आली होती. तिचे दिवस भरत आले होते. आईबापांचे तिच्यावर फार प्रेम होते. तिची प्रत्येक हौस पुरविली जाई. माहेरी श्रीमंती होती अशातला भाग नाही. काशीचे वडील एका सावकाराकडे मुनीम होते. त्यांचे लहानसे घर होते. फुलांचा त्यांना फार नाद. किती तरी फुलझाडें घराभोवती होतीं. काशी आणि तिचा मोठा भाऊ काशिनाथ, दोघच भावंडे. काशिनाथ पुण्याला नुकताच नोकरीस लागला होता. मागल्या वर्षी त्याचें लग्न झाले होते. त्याची पत्नीहि माहेरीं बाळंतपणाला गेली होती. तिचें माहेर तिकडे लांब सांगलीकडे होते.

"काशी, दादाचें पत्र आले आहे."

"वैनी बाळंत झाली वाटते?"

"हो. मुलगी झाली. देवाला गूळ ठेव जा. आणि सर्वांना दे."

"इश्श, गूळ का वाटायचा? आई, बर्फी आणायला सांग ना ग बाबांना."

देवाला गूळ ठेवण्यांत आला. परंतु मागून वामनरावांनीं बर्फी आणून सर्वांना वांटली. सर्वांची तोंडे गोड झाली.

"काशी, तुला मुलगी होणार कीं मुलगा?" शेजारच्या रमाकाकूंनी येऊन विचारलें.

"तिला नक्की मुलगा होणार. मान बघा कशी बारीक झाली आहे" शेवंताताई म्हणाल्या.

काशी लाजली. ती तेथून उठून गेली. ती झोंपाळ्यावर जाऊन बसली. शिवरात्र गेली. शिमगा आला. होळी पुनवहि गेली. आज रंगपंचमीचा दिवस.

"बाबा, मला रंग आणून द्या पिचकारी आणून द्या"

"तू का आतां लहान रंग खेळायला? आणि दमून जाशील" आई म्हणाली.

"मुळीच नाहीं दमणार. मी नारखी रंग खेळत राहीन. आज माझ्या हातापायांत खूप शक्ति आली आहे. बाबा, तुमच्या अंगावर रंग उडवीन आई, तुझ्याहि. शेजारच्या शेवंताताई, रमाकाकू, सर्वांच्या अंगावर मी रंग उडवीन. जो भेटेल त्याच्या. गंमत. रंगाची गाणी म्हणूं, नाचूं. लता येईल, कुसुम येईल, गोपू येईल मजा."

काशीला वडिलांनी रंग आणून दिले पिचकारीहि आणली आणि काशी रंग खेळूं लागली. आज शेजारीपाजारी ती सर्वत्र गली. गडीमाणसे, मित्रमैत्रिणी, सर्वांच्या अंगावर ती रंग उडवीत सुटली तिच्याहि अंगावर इतरांनी वर्षाव केला अशी रंगपंचमी त्या आळीत कधी झाली नव्हती. सर्वांनाच जणू स्फूर्ति आली. आणि रंग उडवित काशी नाचूं लागली. तिच्या भोवती मुलेमुली नाचत होती. मध्येंच रंगाची कारंजीं उसळत.

"काशी, पुरे आतां. तूं दमून गेलीस हो ये घरी" आई म्हणाली काशी घरी आली. आंघोळ करून, पातळ बदलून ती पडून राहिली. तिचा डोळा लागला. परंतु पोट दुखायला लागले. ती उठली. अधिकच कळा येऊं लागल्या सुईण आली तयारी झाली. आणि दिवे लागताना काशी नीटपणे बाळंत झाली. मुलगा झाला. घरांत आनंद आला, प्रकाश आला. पेढे वाटण्यांत आले. मुलीची बर्फी, मुलाचे पेढे'

बारशाचा समारंभ झाला. बाळाचें नांव श्रीरंग ठेवण्यांत आले. रंग-पंचमीला झाला म्हणून श्रीरंग. महिना दोनमहिने हा हा म्हणतां गेले. काशी बाळाला घेऊन आतां सासरीं जाणार होती. आईबापांना जड वाटत होते. काशीनाथ पुण्याला होता. आतां काशीहि जाणार. तीं दोन पिकलीं पानें मात्र तेथें राहाणर!

वसंतऋतूचा बहर होता. झाडांना नवीन पल्लव फुटले होते. पळस फुलून लाल झाले होते. पानांच्या आधी त्यांना फुलें आली होतीं. आणि आंबे, फणस, काजू, करवंदें, जांभळे, कोकंब सर्व फळांना जसा ऊत आला होता. सृष्टीचे रंगवैभव जिकडेतिकडे दिसून येत होतें. मध्येंच ती कोकिळा कूऊ कूऊ करी. आणि लाजून झाडांच्या पानांत लपे.

गांवाबाहेर नदीकांठी ग्रामदेवतेचें देऊळ होतें. जगदंबेची खणानारळानीं ओटी भरायला आज काशी गेली होती जवळ बाळ होतें. दोन महिन्यांचे बाळ. त्याला सुंदर झबले घातलेले होते. गळ्यांत ताईत होता किती सुंदर दिसत होता रंगा! नाव श्रीरंग होते. परंतु रंगा, रंगा असेच सारीं म्हणत. देवीची ओटी भरण्यांत आली. तिच्या पायांवर बाळ घालण्यात आले. नारळ फोडून सर्वांना प्रसाद देण्यांत आला. मंडळी परत निघाली.

"बाबा, नदीकांठी जरा बसूंया" काशी म्हणाली.

"तिन्ही सांजाची वेळ. वाराहि गार आहे आतां घरीं जाऊ" आई म्हणाली

"आई, आकाशातल्या रंगाकडे बाळ बघतो आहे बघ! काय रे लबाडा तुला कळते? ते लाल रंग तुला आवडतात? आई, बघ बघ हंसला बघ जरा बसूं ये आई"

आणि तेथे बाळाला मांडीवर घेऊन काशी बसली. आकाशात रंगपंचमी होती ढगावर रंग पडून अनेक रमणीय प्रकार तेथे दिसत होते, नदीचे पाणीहि लालसर पिवळसर दिसत होते तो लहानगा रंगा वरच्या रंगसृष्टीकडे टपोऱ्या काळ्या भोर डोळ्यांनी पहात होता.

"चला आता जाऊं" आई म्हणाली.

"चल ताई" वडील प्रेमाने म्हणाले.

बाळाला घेऊन काशी उठली. परंतु रंगप्रेमी रंगा रडूं लागला.

"मी म्हणत होते, घरीं जाऊं. आतां रडायला लागला बघ." आई म्हणाली

"रंग दिसत नाहीत म्हणून तो रडत आहे" काशी म्हणाली

"एवढ्यांत त्याला काय कळणार रंग नि बिग. चला लौकर. दे माझ्याजवळ त्याला. नीट गुरंगटून घेते म्हणजे वारा लागणार नाही."

आजीने नातवाला घेतले. त्याचे रडणे थांबले. तो झोंपीं गेला. सारीं घरीं आली बाळाला अंथरुणावर ठेवण्यांत आले.

"आई, झोंपेंत हंसतो आहे बघ बाळ."

"मुलें अशीच हंसतात. तूं लहानपणी झोंपेंत हंसायचीस व जागेपणीं रडायचीस"

" मी का रडवी होते बाबा ?"

" अग मुले रडतातच. "

काशी सासरीं जायला निघाली. शेजारच्या धोंडोपंतांबरोबर ती पतिगृहीं आज जाणार होती. आईने बरोबर लाडू वगैरे दिले. बाळाला जप म्हणाली. बाळकडु घालीत जा, तिन्हीसाजा मीठ मोहऱ्या काढित जा, अंगारा लावित जा, आईनें सांगितलें. देवांच्या, मायबापांच्या पायां पडून, शेजारी सर्वांना विचारून काशी मोटारींत बसली. तिचे डोळे भरून आले.

" ये हो. बाळाला सांभाळ " आई म्हणाली.

" पत्र पाठव " वडील म्हणाले.

पों पों करीत मोटार निघाली. बाळ वाटेंत फारसा रडला नाही. आईच्या मांडीवर निजून होता. मोटारच्या मुक्कामावर आनंदराव आले होते. काशीने त्यांच्याचजवळ बाळ दिला. दोघांचीं जीवने एकत्र जोडणारा तो प्राणमय दुवा. आनंदरावांनी बाळाकडे पाहिलें. त्याचे डोळे, त्याचं काळेंभोर जावळ, ती सुंदर मूर्ति पाहून पित्याला कृतार्थ वाटले. काशी खाली उतरली हमालानें सामान घेतलें. सारीं घरीं आलीं. शेजारच्या आयाबाया आल्या. मित्र आले. सर्वांनी बाळाला पाहिलें. नयनमनोहर बाळ !

बाळ वाढत होता. त्याचे रडूं थांबवायची एक युक्ति असे. रंगीत खेळणीं, रंगीत फुगे, रंगारंगांचीं फुले दाखवलीं कीं त्याचें रडें थांबायचे. त्या लहान बाळाची जणूं समाधि लागे. आनंदराव एका वकीलाकडे कारकून होते. सायं-काळीं घरीं आल्यावर ते बाळाला घेत, हिंडवीत. कधी त्याला सार्वजनिक बागेंत नेत, कारंजे दाखवीत, फुले दाखवीत. रविवारी त्याला ते घरी खेळवायचे, बोळकीं रचायचे, रंगांचे तुकडे जोडायचे. बघे बघे नि रंगा एकदम हात मारून सारें पाडी नि हंसे. रंगाला फुलपांखरें, पांखरें म्हणजे केवढी गंमत ! एके दिवशीं काशीनें पिंवळें फुलपांखरूं हळुच पकडले नि रंगाजवळ आणलें. रंगा बघत राहिला. तिनं एकदम सोडतांच पटकन् पांखरूं गेलं वर. रंगानें टाळी वाजवली.

बाळाला आतां पाय फुटले. तो रांगूं लागला, लौकरच उभा राहूं लागला, चालूं लागला. तो कोळसे घेई नि रेघोट्या ओढी. आईला पुसतां भुई थोडी होई. परंतु एके दिवशीं मजाच झाली ! मजा कसली, तें मरण होतें. लहान रंगा

खेळत होता. आणि तेथें एक सरसर प्राणी आला. रंगानें पटकन् टोक धरून तो पकडला.

" आई, ही बघ गंमत " असें म्हणत आईला दाखवायला तो आला.

" टाक टाक,अरे तो विंचू " आई घाबरून ओरडली. बाळानें एकदम टाकला. नांगी वर करून ती काळी सांवळी मूर्ति निघाली. आईनें लांकडानें ती मूर्ति भंगली. ' आई आई ' बाळ म्हणाला.

" किती छान दिसत होता ! त्याचा आंकडा कसा होता, नाहीं आई ? तूं त्याला मारलेस. तू वाईट आहेस. मला खेळायला झाला असता. "

आईनें बाळाला पोटाशीं घेतलें. जगदंबेची कृपा असे ती मनांत म्हणाली.

आणि नागपंचमीचा दिवस होता. नागोबा घेऊन नागारी हिंडत होते, पुंगी वाजवित होते. रंगाच्या अंगणांत नागोबा आला. पुंगी वाजत होती, नाग डोलत होता. रंगा एकदम पुढे गेला. त्यानें नागाच्या फणेला हात लावला. नागानें फुस् केलें. रंगा मागे झाला.

" काशीताई, रंगाला मागे घ्या " मुलें ओरडली.

" भिऊं नका. नागोबा आज डसणार नाहीं. त्याला लाह्या द्या, दूध द्या; त्याला पै पैसा द्या " पुंगीवाला म्हणाला पुंगी वाजूं लागली.

" छान छान आई नागोबा
डोल डोल करतो नागोबा "

असें म्हणत रंगा नाचूं लागला. पुंगीवाला गेला. मुलें गेलीं. काशीताई बाळाला घेऊन घरात आल्या.

रंगा मोठा झाला. पांचा वर्षांचा झाला. त्याला रंगित पुस्तक देण्यांत आलें. पाटी आली, पेन्सील आली. रंगा शाळेंत जाऊं लागला. तो पाटीवर चित्रे काढी. मास्तर रागें भरत नि छडी मारीत. त्यानें एकदां छडी मारणाऱ्या मास्तरांचें चित्र काढले. मास्तरांच्या पायांजवळ एक मुलगा रडत होता. रंगा चित्रांत रंगूं लागला. एवढासा मुलगा. परंतु सुंदर चित्रें काढी. खडू, कोळसे त्याच्या पिशवींत नेहमीं असत. घराच्या भिंती रंगूं लागल्या. कधीं आई मग मारी, आनंदराव रागें भरत.

" किती रे सगळीकडे काळें करतोस " आई म्हणे.

" मला दुसरे रंग दे आणून. म्हणजे लाल करीन, हिरवें करीन. आई, मला हिरवीं झाडे काढायला आवडतात. खरेंच. "

रागावणारी आई हंसूं लागे नि रंगाचा ती पापा घेई.रंगाच्या पाठीवर काशीला मूलबाळ झालें नाहीं एकुलता एक मुलगा आनंदराव त्याचे कोडकौतुक करित. त्यांनी त्याला रंग आणून दिले, कुंचले आणून दिले. रंगा रंगवित बसे.

" आई, हे बघ तुझें चित्र. "

" माझें कशाला ? त्यांचे काढ "

" याला मिशा लावल्या म्हणजे बाबा होतील "

" वेडा आहेस तू रंगा अरे दुसरे कांहीं वाच. गणित कर. "

" आई, गणित म्हणजे दोन नि दोन चार हेचना ? त्यात ग काय कठिण आहे ? नुसते आपले आंकडे. आई, पांचाच्या आकड्याचा मी अडकित्ता करून दाखवूं ? दोनाच्या आंकड्याचें बदक करू ? सहाच्या आंकड्याचा मासा करूं ? सांग."

" तू जादुगार आहेस वाटते ?"

" हो. मी जादुगार. मला सारें येतें करता."

रंगा मोटा झाला तो आतां चौथींत होता. चौथी झाल्यावर काय ? मामाकडे पुण्याला त्याला शिकायला ठेवावें असें काशीच्या मनांत होतें परंतु निराळ्याच घटनेनें ती इच्छा पुरी होणार होती एका तापाची सर्वत्र साथ आली. घरोघर माणसें आजारी पडली आनंदराव अंथरुणांत तापानें फणफणत होते. तिकडे काशींचे आईबाप तापाला बळी पडले काशिनाथ रजा घेऊन घरीं आला होता. ती वार्ता ऐकून काशी रड रड रडली माय तों माहेर. परंतु अश्रु पुसून ती पतीची सेवाशुश्रुषा करित होती.

" काशी, मी बरा नाहीं होणार. रंगाला जप. तो गुणी मुलगा आहे तूं पुण्याला काशिनाथकडे जा. तुझा भाऊ तुम्हांला सांभाळील. तूं एकुलती तर त्याची बहीण. कोठें आहे रंगा ?"

" तो झोंपला आहे."

" खरेंच. रात्र आहे हे मी विसरलोच. निजूदे." काशिनाथ तिकडे आईबापांच्या क्रिया करित होता. तो आनंदराव अधिक म्हणून तार आली. परंतु तो येण्याच्या आधींच आनंदराव देवाघरीं निघून गेले होते. काशिनाथ आला तों घरांत अंधार होता. रात्रीं बहीण भाऊ बोलत होतीं.

"काशी, रडूं नको मी आहे तुला. एकदमच आकाश कोसळलें. काय करायचे"

"असा रे कसा देव? पंधरा दिवसांत त्याने तिघांना नेलें"

"ताई, देवाचे हेतु अतर्क्य आहेत आपणाला काय कळणार? मी उद्यां पुण्याला जातो पुढे लौकरच तुम्हाला न्यायला येईन"

"मरताना म्हणाले रंगाला जप तो गुणाचा आहे"

"तू काळजी नको करूं मी माझ्या मुलाप्रमाणे त्याचेंहि करीन."

मामा जायला निघाला त्याने भाच्याला जवळ घेतलें, कुरवाळलें

"रंगा, आतां पुण्याला ये हो."

"आई पण येईल?"

"हो तुम्ही दोघं या."

"मला रंगाची पेटी द्याल? बाबा देणार होते. माझ्या वाढदिवशीं देणार होते नाही आई?"

"मामा देईल हो तुला"

बहिणीचा निरोप घेऊन भाऊ निघून गेला. दिवस जात होते. काशी रडत बसे पतीची, आईबापाची तिला राहूनराहून आठवण येई. रंगा जवळ असला म्हणजे ती दुःख लपवी. ती हंसे, आनंदी दिसे माझा बाळ सुखी असो, त्याला कशाची ददात नसो, असे ती मनांत म्हणे तो निजला म्हणजे त्याच्या डोक्यावर हात ठेवून ती विश्वंभराची प्रार्थना करी.



## मामाकडे : : : २

काशी रंगाला घेऊन पुण्याला भावाकडे आली होती. शनिवारपेठेतील एका वाड्यांत ते बिऱ्हाड होतें. घरांतील सारे काम आतां काशीच करी. तिला परिस्थितीची जाणीव होती. ती सारे अपमान सहन करी. सारीं बोलणीं सहन करी. मुलाला घेऊन ती कोठे जाणार ? भावाचाच काय तो तिला आधार होता.

पुण्याच्या इंग्रजी शाळेत रंगा जाऊं लागला त्याची चित्रकला तेथे प्रगट होऊं लागली. अनेक मुलांच्या वह्यांमध्यें तो चित्रे काढी.

" रंगा, माझ्या वहीत बांसरीवाला कृष्ण काढ "

" रंगा, माझ्या वहीत महात्माजी काढतोस ? "

असें मुलें म्हणायची. रंगाचा हात झपझप चाले. तो पटपट रेषा ओढी आणि चित्र तयार होई. खरेंच तो जादुगार होता.

त्या दिवशी रविवार होता. मामा घरी होते.

" रंगा. अभ्यास बरा आहे ना ? "

" हो. "

" नंबर कितवा ?"

" बत्तिसावा "

" मुलें किती ? "

" पस्तीस "

" तुझा बत्तिसावा नंबर ? हा गाढवा, दिवसभर करतोस तरी काय ? गणित येतें का ? इतिहास वाचतोस का ? बघूं तुझीं पुस्तकें, वह्या. पुस्तकें आहेत कीं हरवलीं ? आण तुझी पिशवी. "

रंगानें मामांना पिशवी आणून दिली. मामांनी वह्या बघितल्या. जिकडे तिकडे चित्रे.

" अरे शाळेत का रेघोट्या ओढित बसतोस ? शब्द नाहीत, गणितें नाहीत. ते मास्तर शिकवतात तरी काय ? हे बघ पुढच्या महिन्यात दहा नंबरच्या आंत नंबर यायला हवा समजलास ? अभ्यास कर. उनाडूं नकोस हे रंगकाम आता पुरे " रंगा रडत दूर गेला तिकडून आई आली.

" सभरदा सांगितले तुला की अभ्यास कर म्हणून. बत्तिसावा नंबर. लाज नाही वाटत तुला कार्ट्या भिकमाग्या कुठला ऊठ, पुस्तक घेऊन बस का घालू पाठीत लाटणे रडायला काय झाले ?" आई संतापाने म्हणाली.

स्वाभिमानी माता आपले दुःख मुलावर रागवून प्रगट करित होती. बिचारा रंगा आईच्या प्रेमालाहि तो आज आचवला होता. तो वाचीत बसला शब्द घोकीत बसला

रंगाच्या वर्गात एक मुलगा होता त्याचे नाव पंढरी पंढरीहि पोरका होता चुलत्याकडे तो शिकायला होता त्याचेहि हाल असत. एके दिवशी तो रडत रडत शाळेत आला

" पंढरी, काय झाले तुला ?" रंगाने विचारले

" काकूने मारले न जेवता पाठवले "

" तूं उपाशी आहेस ?"

" हो रंगा "

" मधल्या सुट्टीत तूं माझ्या घरी ये माझी आई तुला जेवूं वाढील."

रंगा मधल्या सुट्टीची वाट पहात होता. दोघे मित्र आले.

" रंगा, शाळा का सुटली ?" आईने विचारले.

" आम्ही परत जाणार आहोत आता मधली सुट्टी आहे."

" आई, तुझ्या कानांत सांगायचे आहे. "

रंगाने हळूच आईला सारे सांगितले.

" ये बाळ, ये हो. पोळी भाजी खा ये "

रंगाच्या आईने पंढरीला खाऊं घातले. दोघे मित्र हंसत खेळत शाळेत गेले. परंतु मामीला ते आवडले नाही. तिच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला:

" स्वतःच्या मुलाला घेऊन येथें आल्यात. आतां मुलाच्या मित्रांना जेवायला वाढा. हलवायाच्या घरावर तुळशीपत्र. फुकाचा मोठेपणा नि चांगुलपणा मिरवायला काय जातें ! ये हो बाळ, जेव पोटभर. हा मेल्यांनो, कोणाचें घर, कोणाचें अन्न ! मला नाहीं हो हे सहन व्हायचे. मला एका शब्दानें तरी विचारलेत की त्या पोराला देऊं का खायला ? मी मालकीण की तुम्ही ? भिकेला लावाल तुम्ही आम्हांला. आणि तो पोरगा विधुळा. नंबर म्हणे बक्तिगाबा तरी आईचे लाड सुरूच आहेत. आणि आतां मुलाच्या मित्राचे लाड. सारे जग जणुं तुमचे तरी बरें घर ना दार. तो ही ऐट. "

" वैनी, नको उगीच बोलूं. माझ्या भावाची मी बहीण आहे. एका आईच्या पोटांतून आम्ही आलो. आमचा का एकमेकावर हक्क नाहीं ? रंगाला का मी बोलत नाहीं ? त्या दिवशी नाहीं का त्याला मारलें ? कोण आहे त्याला दुसरे ? सारीचजणें जर त्याला खाऊ की चावूं करतील तर त्या पोरानें जावें तरी कोठें ? आणि त्याचा तो मित्र, तो लहान मुलगा आज उपाशी होता. आपण भिकाऱ्यालाहि चतकोर नितकोर देतो. मी त्या मुलाला खायला दिले परन्तु रंगाला नाहीं हो खा म्हटलें. आज रात्रीं मी जेवणार नाहीं. म्हणजे झालें ना ? बेरीजवजाबाकी होईल ना मग बरोबर ? मी दादाला मागेंच म्हटलें की मी आपली एकदांच जेवत जाईन म्हणून. परतु तो नको म्हणाला. आम्ही दोन निराधार जीव. आमच्यावर आकाश कोसळलें. कोठें जाणार आम्ही वैनी ? "

" जायचें होतें मसणात. म्हणे कोठें जाऊं आम्ही. रहा कोणाकडे भाकऱ्या बडवायला. "

" तुमच्याकडे करतेंच आहे ना सारें ? वैनी, वेडेंवांकडें नको बोलूं. "

" बोलणार. कोण करणार आहे माझें तोंड बंद ? वेडेंवांकडे काय मी म्हटलें ? म्हणे बोलूं नको. तूं कोण मोठी आलीस ? " रंगाची आई गप्प बसली. शब्दानें शब्द वाढतो. वाड्यांतील बायका अंगणांत जमल्या. दुसऱ्यांची फजीती पाहण्यांत माणसाला एक आनंद वाटत असतो. दुसऱ्यांचे उणें पाहण्यात एक प्रकारचें सुख असतें.

शाळा सुटल्या. मुलें घरी आलीं. मामाचीं मुलें घरीं आलीं. रंगा आला. काशीनें सर्वांना खायला दिलें.

" रंगा, पुन्हां त्या पदरीला घरीं नको आणू नुसता आण. परंतु खायला नको आणूं " आई म्हणाली.

"मला नकोच ही पोळी खायला. माझी आजची पोळी पदरीला दिलीस असें समज. त्याला आणीन त्या दिवशी मी कमी खाईन. चालेल आई ?"

आईचे डोळे भरून आले. मुले खाऊन खेळायला गेलीं. असे दिवस जात होते.

रंगाला जुन्या बाजारांत हिंडण्याचा नाद लागला. तेथे जुने अंक विकायला असत पुस्तके असत सचित्र सुंदर मासिके असत. रंगा ती मासिकें चाळित बसायचा त्यातील चित्रे बघायचा

"हे चित्र मला देता ? मला फार आवडले आहे" एखादेवेळेस तो विचारी.

" हो चालना. म्हणे फार आवडले. पैसे आण बापाजवळून."

"माझे बापा नाहीत."

"मग कोण आहे ?"

"मी मामाकडे आहे "

" मग त्याच्याजवळून आण पैसे. ही चित्रे का फुकट वाटायला ठेवली आहेत मी ? नीघ येथून. नेशील फाडून बिडून. पोलीसांच्या ताब्यांत देईन बघ. हो दूर."

रंगाला अशी बोलणी अनेकदां ऐकावी लागत. फुलपाखराप्रमाणे तो हिंडत राही, चित्रे बघत राही. कोणी हाकलले तर निघून जाई.

आज रविवार होता रंगाचा आज वाढदिवस होता. आईने देवाना गूळ ठेवला. रंगाला अंगारा लावला. दुसरे ती माउली काय करणार ?

"रंगा, तेल जा आण. हे घे बारा आणे. नीट सांभाळून आण. लौकर ये" मामीने सांगितलें.

हातांत आलीमेलीची बरणी घेऊन रंगा निघाला. जुना बाजार भरलेला होता. रंगा चित्रें बघत निघाला. एका पुस्तकविक्रयाजवळ फारच सुंदर एक अंक होता. त्यात काश्मीरचे देखावे होते. दुसरीहि चित्रें होतीं. झोंक्यावर झोंके घेणाऱ्या एका मुलाचें चित्र होते. रंगा रंगला. तो तेल वगैरे विसरला.

" या अंकाची काय किंमत ?"

" रुपया "

" बारा आण्याला देतां ? "

" आण बार आणे. "

रंगानें अंक विकत घेतला. तो नदीकिनारी जाऊन बसला. ती चित्रे तो पुन्हां पुन्हां बघत होता. तिकडे आकाशात रंगशाळा उघडली देवाच्या घरी किती रंग. परंतु मला कोण देणार ? आज माझा वाढदिवस. बाबा रंगाची पेटी देणार होते. कोठें गेले बाबा ? देवानें त्यांना कां नेलें ? ते चांगले होते म्हणून आणि आम्ही का सारीं वाईट ? तो लहान मुलगा विचारांत होता.

तो उठला. ती बरणी हलवित तो घराकडे वळला

" काय करावें या पोराला. दिवे लागले तरी याचा पत्ता नाहीं ? विहीर खणून तेल आणतो की काय ? लाडोबा आहे करून ठेवलेला " मामींचे तोंड सुरू झालें.

" किती रे उशीर " आई त्रासून म्हणाली.

" आई ! "

" काय ? "

" मी तेल नाहीं आणलें. हे चित्रांचें पुस्तक आणले तूं रागावूं नको बाबा वाढदिवशी रंगाची पेटी देणार होते खरें ना आई ? "

" चित्रें विकत आणलीस ? काय बाई तरी पोर. चुलीत घालत्ये दे ती चित्रे. ठेवा लाडावून. उद्यां तुरुंगांत जायची ही लक्षणे आहेत " मामी ओरडली.

आईनें रंगाला मारमार मारले.

" आणशील पुन्हां चित्रे ? आणशील ? आणशील ? "

" आई नको मारूं. रक्त आलें आई. "

" येऊं दे रक्त. मरत नाहीं मेला. छळवाद्या आहेस नुसता "

मामा बाहेरून आले.

" काय, काय आहे हें ? " त्यांनीं विचारलें

मामीबाईनीं तिखटमीठ लावून सारें सांगितले.

" थांब आज तुझी गय नाहीं " असें म्हणून टेबलावरच्या रुळानें मामा मारूं लागले.

" दादा, मी त्याला मारलें आहे. तूं आणखी नको मारूं. कोठें जाईल तो पोर ?"

"घे तुझा पोर तो चांगला व्हावा म्हणूनच ना मारलें ? त्याला मारण्याचा तुलाच फक्त अधिकार वाटतें ? आणि खायला घालणाऱ्याला हक्क नाही ? माझ्याकडे राहायचे असेल तर असे प्रकार चालणार नाहींत. तूं आपला पोरगा घेऊन कोठेंहि जा सुखी असा. मी म्हणून तुम्हांला आणले. नाहीं तर हल्लींच्या दिवसात कोण कोणाला विचारतो ? तरी मी त्याला कधी हात लावित नाही. भाऊ वाईट, त्याची बायको वाईट. चांगलीं तेवढीं तुम्ही दोघे मायलेकरे !"

"दादा, मी कधीं तुम्हाला वाईट म्हटले ?"

"त्याला हात नको रे लावू म्हणतेस. मी का दुष्ट आहे ? ज्याचे भले करायला जावे, त्यानेच चावायला यावें असो. अधिक कशाला बोलूं ?"

"बस्स, तुम्ही येथून जाच. रोज उठून मेलीं भांडणे. तुम्ही सुखी, आम्ही सुखी "

"दादा, तुझीहि अशीच इच्छा आहे का ?"

"मलाहि असेच वाटते."

"ठीक. आजवर आधार दिलात त्याबद्दल मी ऋणी आहें. दादा, पृथ्वी ओस नाही. परमेश्वरानें कोठे तरी आमच्यासाठीं घांस ठेवलाच असेल. जो पाखराना पोसतो, कीडमुंगीला सांभाळतो, तो आम्हांला दूर नाहीं लोटणार. मी कोठें तरी खोली शोधते तोंवर येथे राहूं दे. तुझी बहीण कोठे तरी मोलकरीण होईल, परतु येथे नाहीं हो राहणार. नको तुम्हाला भार, तुम्हांला ओझें. कोणाची भांडी घांशीन, धुणीं धुवीन; दळीन, काडीन. देवाची जनाबाईहि दळी मला त्यांत कसला कमीपणा ? जाईन बरें, दादा जाईन."

काशीताईने रंगाला पोटाशी धरले. तिच्या डोळ्यांतील धारांचा त्या बाळराजाला अभिषेक होत होता.

"आई, तूं नको रडूं. मी चित्रें काढीन नि तुला पैसे आणून देईन. आपण येथून जाऊं."

"बघा कसा चुरु चुरु बोलतो आहे तो. जा, खुशाल जा" मामी म्हणाली.

जेवणें झालीं. रंगा जेवला नाहीं. त्याची आईहि जेवली नाहीं. रात्र झाली. सारीं झोपली. आईजवळ रंगा झोंपला होता. तिला झोंप येईना. तिच्या एकुलत्या बाळाचा आज वाढदिवस होता. आज बाळाचे वडील असते तर

केवढा आनंदाचा सोहळा झाला असता. रंगाला रंगांची पेटी हवी होती. परंतु आज त्याला मरेमरे तों मी मारलें. मामानें त्याला मारलें. तिने रंगाच्या अंगावरून प्रेमळ हात फिरवला. अंगावर वळ होते. आपल्या डोळ्यांतील अश्रूंचें अमृतांजन त्या जखमांना ती लावित होती.

"माझा गुणाचा बाळ" मरताना ते म्हणाले–'बाळ गुणी आहे. त्याला जप.' रंगा, राजा, आतां नाहीं हो कधी तुझी आई तुला मारणार! ते आकाशांतून बघत असतील त्याचा आत्मा तुझ्याभोवतीं घुटमळत असेल त्यांचीच का ती मूर्ति! होय नका असे रागाने नका बघूं! हे काय? क्रोध जाऊन तोंडावर करुणा ओथंबली. नका रडूं बाळाला आतां नाही कधी मारणार मी कैदाशीण नाही होणार, त्याची प्रेमळ माता बनेन. आम्ही उद्यापासून स्वतंत्र राहूं. बाळाचा आत्मा फुलेल. खरेंच. हंसले रंगा, ते बघ तुझे वडील हंसताहेत. तुला आशीर्वाद देत आहेत." गेली, ती मूर्ति गेली. ते का स्वप्न होते की भास होता? काशी अंथरुणावर पडली. ती विचार करित होती. "उद्यां कोठे जायचे? पृथ्वी मोठी आहे म्हणून म्हटले खरें! परंतु रात्री डोके कोठे ठेवायचे? त्या रखमाबाई देतील काम मिळवून. त्या मायाळू आहेत. रंगाला त्या खाऊ आणून देतात. हो. त्यांनाच विचारावें. आई, बाबा, काय ही तुमच्या मुलीची दशा! जाऊं दे. तुमची मुलगी धीर नाहीं सोडणार. तुम्हा बरं वाईट नका वाटून घेऊं. या तुमच्या दुर्दैवी मुलीला, या तुमच्या गुणी नातवाला आशीर्वाद द्या. आणि दादा, वैनी, तुम्हींहि सुखी असा. तुमचीं मुलेबाळे सुखी असोत. इतके दिवस आधार दिलात. ते उपकार आहेतच. देवा, त्यांना सुखी ठेव." असे म्हणत मुलाच्या अंगावर प्रेमानें हात ठेवून ती दुःखी दुर्दैवी माता केव्हांतरी झोंपली. झोंप. तुझ्या आत्म्याची वेदना कमी होवो.



## आंधार मिळाला : : : ३

एका भल्या मोठ्या वाड्यांतील एका लहानशा खोलींत काशी नि तिचा बाळ रंगा दोघे रहात होतीं. रखमाबाईची तिला मदत मिळाली. त्या वाड्यांतील एक दोन घरचें कामहि तिला मिळालें.

" काशीबाई, तुम्ही हळद घाल का कुटून नि दळून? आधीं कुटायला हवी, मग दळायला हवी."

" मला एकटीला जातें ओढेल का ?"

" तुम्ही कुटून ठेवा. आपण दोघी मिळून दळू."

" किती तुमचे उपकार. देव तुमचें भलें करो."

" आणि ही रंगाला गुळपापडीची वडी ठेवा. मिळाली होती अंबुताईकडे. म्हटलें रंगाला होईल. गेला कोठें? खोडगाळ आहे हो तुमचा रंग. परवां मला म्हणाला हे बघा तुमचें चित्र काढलें आहे. मला हंसतां पुरेवाट झाली. उद्यां देईन हळद आणून."

रखमाबाई अशी अवांतर कामें आणीत. दोघीजणी सहकार्यानें करीत. मीठ वांटणें, मिरच्या कुटणें, हळद दळणे, भाजणी करणें, मसाला कुटणें, पापड घालणे, नाना कामें असत. भांडीं नि धुणीं दोन तीन ठिकाणीं होतींच. कधीं रंगाहि आईला मदत करायचा. मायलेकरांचे दिवस कष्टांत परंतु समाधानांत जात होते.

त्या वाड्यांत एक शिक्षक रहात होते. त्यांना वासुकाका म्हणत. तिशीपस्तिशीच्या वयाचे होते. त्यांच्या पत्नीचें नांव वासन्ती. त्यांना मूलबाळ नव्हतें. वासुकाकांकडे कितीतरी मुलें यायचीं, जायचीं. कोणाला वाचायला पुस्तक देतील, कोणाला गणित सांगतील, कोणाला रागें भरतील, असें चालायचें.

रविवारी ते मुलांना गोष्टी सांगत. कधी ते मुलांना खायला द्यायचे, खाऊ द्यायचे. त्यांच्या खोलींत तीन तसबिरी होत्या. लोकमान्य, जवाहरलाल आणि गांधीजी. या तीन थोर पुरुषांच्या त्या होत्या. हीं वासुकाकांची दैवते. त्या त्या दैवताचा वाढदिवस खोलीत साजरा होई. वासुकाकांची ती प्रशस्त खोली म्हणजे नवभारताच्या निर्मितींची जागा होती नवीन पिढी तेथे तयार होत होती. थोर विचार घेणारी, व्यापक दृष्टि ठेवणारी नवीन पिढी.

वासुकाकांचें लक्ष रंगाकडे गेले. एकेदिवशीं रंगा नळावर होता. तेहि होते. रंगाला बालदी उचलत नव्हती. आईने पाणी भरून ठेवायला सांगितले होते.

"इतकी कशाला भरलीस ? अर्धी न्यायची थांब. मी नेऊन देतो."

"तुम्ही कशाला ? मी नेईन. टेकित टेकित नेईन."

परंतु वासुकाकांनी ती बादली उचललीच. रंगाच्या खोलीत त्यांनीं ती नेऊन ठेवली. त्यानी खोली पाहिली. भितीवर चित्रे होतीं. तेथे रंग होते. खालीं जमिनीवर चित्रांची वही होती.

"तूं का काढलीस हीं चित्रे ? अरे वा एवढासा आहेस, पण चित्रे छान काढतोस. माझ्याकडे येत जा. मी तुला चित्रांचे संग्रह दाखवीन. येशील ना ? ये. कितीतरी मुलें येतात."

"पण माझी तुमची ओळख नाहीं."

"आलास म्हणजे होईल. आई कामाला गेली वाटतें ?"

"हो"

"तुझें जेवण ?"

"आईनें भाकरी भाजून ठेवली आहे. ती खाऊन जाईन."

"मी भाजी देऊं आणून ? चल आमच्याकडे. भाजी घेऊन ये. ओळखहि होईल. तुझें नांव रंगा ना ?"

"तुम्हांला काय माहीत ?"

"तुझी आई तुला हांका मारते, त्या कानीं पडतात. तूं आईला मदत करतोस. चांगला आहेस तूं मुलगा. चल आमच्याकडे."

दार ओढून घेऊन रंगाला घेऊन वासुकाका आपल्या जागेंत आले.

"ये रंगा. किती दिवस तुला बोलविन बोलविन म्हणत होतें" सुनंदा म्हणाली.

" अग त्याला भाजी दे वाटींत. त्याच्या आईनें भाकरी भाजून ठेवली आहे."

" जेवायलाच राहूं दे नाहींतर ? "

" भाकरी फुकट जाईल."

" पुन्हां कधी ये. ही घे भाजी."

रंगा भाजी घेऊन गेला. त्याची शाळेंत जाण्याची वेळ होत आली. जेवून तो शाळेंत गेला. आज त्याला आनंद झाला होता. तो पोटांत मावत नव्हता.

" रंगा, आज किती हंसतो आहेस ? आईनें गोड गोड जेवण दिलें वाटतें ?" पंढरीनें विचारलें.

" आमच्या वाड्यांत वासुकाका आहेत. ते छान आहेत नाहीं ? ते मला चित्राचा संग्रह दाखविणार आहेत."

" ते मुलांचे मित्र आहेत. त्यांना वाचायला पुस्तकें देतात, खाऊ देतात."

" तुला काय माहीत ?"

" आमच्या वाड्यांतील शरद त्यांच्याकडे जातो." दोघे मित्र बोलत होते. घंटा झाली. दोघे आपापल्या वर्गात गेले.

रंगाची नि वासुकाकांची चांगलीच गट्टी जमली. इतर मुलांच्याहि तेथें ओळखी झाल्या पंढरीहि तेथें यायचा. वासुकाका मुलांना कधीं कधीं पोहायला नेत. रंगा, पंढरी दोघे पोहायला शिकले. रंगाला आतां कांहीं कमी नसे. पुस्तकें, रंग, कुंचले सारें मिळे. वासुकाका त्याला निरनिराळीं चित्रें दाखवीत. त्यांतील फरक समजवून सांगत.

रंगाच्या आईला समाधान होतें. मुलाला मार्गदर्शक भेटला म्हणून ती देवाचे आभार मानी. परंतु एक निराळीच घटना झाली. अलीकडे काशी एका श्रीमंताकडे स्वयंपाकाला जात असे. परंतु श्रीमंताची राणी माहेरीं गेली. श्रीमंतच घरीं असत. त्यांना वाढून काशी रात्रीं घरीं येई. एके दिवशीं सायंकाळीं काशी स्वयंपाक करात होती. तो रंगेल श्रीमंत तिच्याकडे बघत होता. काशीच्या लक्षांत ती गोष्ट आली.

" काय पाहिजे ?" तिनें विचारलें.

" तुम्हीच " तो म्हणाला.

" काय बोलतां ?"

"घरांत आज चोरी झाली आहे. माझ्या खिशांतले पैसे गेले. दुसरें तर कोणी आलें नव्हतें."

"मला काय माहीत तुमचे पैसे ?"

"तुम्हांलाच त्यांची जरूरी असणार. दुसऱ्या कोणाला असणार ?"

"मी का चोर ? या विस्तवाची शपथ, मला माहात नाहीं. मी दिवाण-खान्यांत जातहि नाहीं."

"मी पोलिसांत सांगणार आहें."

"नका हो माझे धिंडवडे मांडूं."

"त्याला एकच उपाय आहे."

"कोणता ?"

"तुम्ही माझ्या होणं. उगीच का तिला मी माहेरीं पाठवले ? मी मोठा योजक आहे. तुमचें दारिद्र्य जाईल. मुलाला कांहीं कमी पडणार नाही."

चुलींतील लांकूड काशीनें त्याच्या अंगावर फेंकलें. जरा चुकलें नाही तर त्याचे डोळे जळते. ती नागिणीप्रमाणें तेथून निघून गेली. तो चंदुलाल बघतच राहिला. चूल धडधड पेटत होती. तो हंसला.

"मूर्ख बाई" असें पुटपुटला.

तेथें टमाटोची कोशिंबीर होती. पळ्या ती खात बसला. त्याला काशीचे शील म्हणजे चटणी कोशिंबिरीहून अधिक मोलाचें नव्हतें वाटत.

काशी लाल होऊन घरीं आली. संतापाचें अश्रूंत परिवर्तन झाले. रंगा वासुकाकांकडे वाचीत होता.

"रंगा, तुझी आई लौकरशी आज घरीं आली ? बरें वाटत नाहीं कीं काय ?"

"आई आली ? मी बघून येतों."

रंगा घरीं आला. आई रडत होती. त्यानें आईच्या गळ्याला मिठी मारली. तिनें त्याला पोटाशीं घेतलें. कोणी बोलत नव्हतें.

"आई काय झालें ? आई ?"

"काय सांगूं बाळ ? आपण दुर्दैवी आहोंत. कशाला आलास अभागी आईच्या पोटीं ?

"असें नको म्हणूं आई. तूं काकूंकडे येतेस ?"

"तूं जा. अभ्यास कर. तूं शहाणा हो. जा."

रंगा रडत वासुकाकांकडे आला. त्यानें आई रडत आहे म्हणून सांगितलें. सुनंदा काशीकडे गेली. दोघी बोलत होत्या. काशीनें सारें सांगितलें.

"चोरीचा आळ घालता की काय? उद्यां का पोलीस येतील? सारे धिंडवडे."

"तुम्ही आमच्याकडे चला. ते सारें करतील. घाबरूं नका."

सुनंदा काशीला घेऊन आली. रंगा तेथेंच वासुकाकांच्या खाटेवर झोंपी गेला होता. त्याच्याजवळ बसून ते वाचित होते. मधून त्याच्या मुखाकडे वात्सल्यानें बघत. तो त्यांचा जणूं मुलगा झाला होता. त्यांचें अपत्यप्रेम आजवर कोंडलेलें त्याच्याठायीं जडलें, प्रगट झालें.

सुनंदा, काशी, वासुकाका तिघें बराच वेळ बोलत होतीं.

"काशीताई, घाबरूं नका. उद्यांपासून त्याच्याकडे जाऊं नका."

"महिन्याचा पगार?"

"जाऊं दे पगार. तुम्ही काळजी करूं नका. मी देईन पैसे. पैशासाठीं तुम्ही परत याल अशी त्या चांडाळाची कल्पना असेल. पुन्हां त्याचें तोंड पाहूं नका. तो पोलिसांत जाणार नाही. त्याची छाती नाही. निर्धास्त असा बरं का. नका रडूं. तुमचा मुलगा मोठा कलावान् होईल. नांव मिळवील."

"उद्यांपासून आतां काम कोठे बघूं?"

"काशाताई, तुम्ही सेवासदनांत काम कराल का? तेथें कांहीं मुली श्रीमंत असतात. त्यांचें काम असतें. इतरहि काम मिळेल. फावल्या वेळीं प्रौढ स्त्रियांच्या वर्गात शिकालहि. तुमची तेथें राहायाची व्यवस्था झाली तर रंगा आमच्याकडे राहील. रविवारीं यावें भेटावें. मधूनहि येतां येईल. बघा विचार करून. म्हणजे असले प्रसंग येणार नाहींत. खरें ना?"

"तुमचा आधार मिळाला, जगदंबेची कृपा."

"आपण कोण कोणाला कितीसे पुरणार? खरी कृपा देवाची, जगदंबेचीच."

"नंदा येथेंच निजला."

"निजूं दे. आतां उठवूं नका त्याला. मला तो परका नाहीं. आम्हांला मूल ना बाळ. रंगाच आमचा मुलगा."

"मी मेलें बिलें तर तुम्ही त्याला वाढवा."

"असें वेडेंवांकडें मनांत नका आणूं. मुलाचें वैभव बघाल. चांगले दिवस येतील. आशेनें रहा."

"जातें मी."

"विचार करा नि मला सांगा."

"मी कसला विचार करूं? तुम्ही सांगाल तें हिताचेंच असेल."

"मी त्या संस्थेंत उद्यां विचारतों. तेथे भलीं माणसें आहेत."

काशीताई आपल्या खोलींत गेली. किती तरी वेळ तिला झोंप येईना. भावानें घालवलें. परंतु ज्यांची ओळख ना देख ते भाऊ बनले. देवाची दया. विचार करतां करतां तिचा डोळा लागला.

दुसऱ्या दिवशीं वासुकाका सेवासदनांत गेले. ते तेथे मागें अवैतनिक शिकवित असत. त्यांची प्रकृति बिघडल्यामुळें ते जातनासे झाले होते.

"या वासुकाका, बरेच दिवसांनीं आलंत" व्यवस्थापक बाईंनी विचारलें.

"कामाला आलों आहें."

"तुमचें काम सर्वांच्या आधी. सांगा."

वासुकाकांनीं सारी हकीगत सांगितली.

"काशीबाईंची करूं सोय. दोनचार मुलींचीं धुणीं मिळतील. स्वयंपाक-घरांतहि भाज्या चिरणें, निवडणें, काम देऊं. हरकत नाहीं. अशा भगिनींची नाहीं सोय लावायची तर कोणाची लावायची?"

वासुकाका आनंदानें घरीं आले. त्यानीं काशीताईस सारें सांगितलें.

एकेदिवशीं काशीताई सेवासदनांत रहायला गेल्या. त्यांचें सामान वासु-काकांच्या घरीं ठेवण्यांत आलें. रंगा त्यांच्याकडे राहिला.

काशीताईंना प्रथम जरा जड गेलें. कोणाची ओळख नाहीं. परंतु पुढें त्यांना समाधान वाटूं लागलें. त्या सारें नीटनेटकें करित. पालेभाजी धुवून चिरीत. लिंबाच्या फोडी कापायच्या झाल्या तर सारख्या कापीत. रस जमिनीवर पडूं नये म्हणून खालीं वाटी ठेवीत. तो रस चटणींत वगैरे ओतीत. मुलींचे कपडे स्वच्छ धुवीत, घड्या करून ठेवीत. मधल्या वेळेस बारा ते दोन त्या शिकत. मग मधल्या सुटींतील मुलींचीं खाणीं. तीं झाल्यावर डाळ तांदुळ निवडणें, संध्या-काळची भाजी चिरणें, सुरू होई काम.

"नयना, कां ग निजलीस? काय होतें?"

"काशीताई, सारें आंग दुखत आहे. ताप का येईल? डोकें जड झालें आहे."

"मी चेपूं का आंग? वत्सलेकडून अमृतांजन आणूं का कपाळाला चोळायला?"

"तुम्हांला त्रास. तुमच्या वर्गाची वेळ होईल."

काशी गेली. तिनें अमृतांजन आणलें. चोळलें. नयनाचें आंग चेपीत ती बसली. इतक्यांत व्यवस्थापक बाई तेथें आल्या. काशीताई उठून उभी राहिली.

"बसा हो. चेपा तिचं आंग. नयना, काय ग झालें? घरची आठवण आली असेल. होय ना! बाबाची लाडकी आहेस. ताप नाहीं अंगांत. उद्यां जुलाब घे, बरें वाटेल. काल भजी अधिक खाल्लीं असशील. आणि काशीताईनीं तुला आग्रह केला असेल. बरी हो संध्याकाळीं खेळायला." बाई गेल्या. काशीताई नयनाजवळ बसून होती.

"काशीताई, मला आई नाहीं. घरीं बाबा आहेत. त्यांचं माझ्यावर फार प्रेम."

"ते येणार ना आहेत भेटायला?"

"तुम्हांला कोणी सांगितलें?"

"प्रमिला नि कमल म्हणत होत्या."

"हो येणार आहेत. तुम्ही बघाल बाबांना. शान्त नि प्रेमळ आहेत. माझे बाबा."

दोघी बोलत होत्या. नयनाला आतां बरें वाटत होतें. मधल्या वेळेला काशीताईनीं तिला कोको करून दिला.

एके दिवशीं काशीताई नयनाच्या खोलींत बसल्या होत्या. त्यांच्या हातांत एक चित्र होतें. इतक्यांत नयना आली.

"कोणाचें हें चित्र? कोणी काढलें?" तिनें विचारलें.

"रंगानें."

"तुमचा तो रंगा?"

"हो."

"किती छान आहे, खरेंच किती छान! मला नाहीं असें येणार. मला चित्रकलेचा नाद आहे. मी बाबांना म्हणत असतें मी मोठी चित्रकार होईन. जगांतील चित्रशाळा बघून येईन. खरेंच किती सुंदर हे रंग! एक रंग कोठें संपला,

दुसरा कोठें सुरू झाला, तें समजून नाहीं येत. आकाशांतील रंग असेच मिसळलेले असतात."

"रंगा लहानपणीं आकाश बघत बसे. एकदां मी त्याला चल घरीं म्हणून मारलें."

"रंगाचीं आणखी चित्रें आणाल? तो कोणते ब्रश वापरतो!"

"मला काय माहीत? रविवारी माझ्याबरोबर याल?"

"हो. बाईंना विचारून जाऊं आपण. रंगाचीं चित्रें बघेन."



## ताटातूट : : : ४

" पंढरी, तूं पुढें काय करणार ? "

" चुलते मला मिलिटरींत घालणार आहेत. "

" बंदुकवाला होणार तूं ? "

" कोठल्यातरी मिलिटरी खात्यांत हिशेब लिहायचे, टाईप करायचें, असें कारकुनी काम. '

" तुला शिकावेसें वाटतें ? "

" रंगा, मला कांहीं वाटत नाहीं. मी या जगांत एकटा आहें. कोणासाठीं शिकूं ? माझ्यामुळें कोणाला आनंद होणार आहे ? जाईन मिलिटरींत. युद्ध आलें नि आमच्या कचेरीवर पडले बॉंब तर खेळ खलास होईल. "

" तुझें माझ्यावर प्रेम नाहीं ? "

" रंगा, आज आपण येथें आहोंत. उद्यां आपण कोठ असूं ? कशाला हीं प्रेमें, या मैत्री ? उद्यां आठवणी येऊन रडूं यायचें. "

" आज आपण टिळक तलावांत पोहायला जायचे. येशील ? "

" हो. पोहायला मला आवडतें. "

ते दोघे मित्र दुपारी पोहायला गेले. सुटी होती. दोघांनीं उड्या मारल्या. एकमेकांला पकडीत होते, खेळत होते. अणु प्रेमसागरांत तीं मुलें डुंबत होतीं. निर्मळ मैत्रीच्या गंगेंत बुडत होते, वर येत होते.

" येथेंच आपण मेलों तर रंगा ? "

" वेडा आहेस तूं. "

" तुझी आई आहे. ती रडेल. मी विसरूनच गेलों. "

" मरण्याचे विचार नकोत. चल पुन्हां सूर मारूं. "

" मी आतां दमलों आहें. "

" चल घरीं जाऊं. "

दोघे मित्र बाहेर आले. पंढरी रंगाच्या घरीं आला. सुनंदाताईनीं दोघांना खायला दिलें. रंगानें आपलीं चित्रें दाखविलीं.

" रंगा, तुझें माझ्यावर प्रेम ना आहे ? "

" हो. "

" माझें चित्र कां नाहीं काढलेंस ? कोठें आहे माझें चित्र ? "

" तूं समोर बस म्हणजे काढतों. "

" मी तुझ्या मनांत नाहीं ? "

" तरी समोर बघावला नको का ? परंतु थांब, दाखवूं तुझें चित्र ? "

रंगानें एक सुंदर कागदी पेटी उघडली. एका मनोहर आवरणांत एक चित्र होतें. रंगानें तें पंढरीला दिलें.

" केव्हां काढलेंस हें ? "

" चांगलें आहे ना ? "

" मी का इतका चांगला आहें ? "

" कलावान् अधिक सुंदरता बघतो. जगाला जेथें दिसत नाहीं तेथेंहि ती त्याला दिसते. "

" नसेल तें तुम्ही बघाल आणि असेल तें ? "

" असेल तें अधिक यथार्थपणें बघूं, आंत शिरून बघूं. "

" वासुकाका तुला शिकवतात असें बोलायला. होयना ? "

" ते मला किती तरी शिकवतात. चित्रकलेंतील नाना संप्रदाय, नाना विशेष, सारें सांगतात. त्यांना चित्रें काढतां येत नाहींत. परंतु ते शास्त्र जाणतात. त्यानीं अभ्यास केला आहे. "

" रंगा, मी जातों. नाहीं तर घरीं बोलणीं खावीं लागतील. "

" आई येईपर्यंत थांब. "

" नको, जातों. "

" थांब रे. माझ्यासाठीं घरचीं बोलणीं सहन कर. "

" मायलेकरांच्या भेटींत आमची अडगळ कशाला ? "

" माझ्या आईला तूंहि आवडतोस."

" त्यांनीं मला खायला पोळी दिली नि त्यांना शिव्या खाव्या लागल्या."

" आई त्या शिव्यांना आशीर्वाद मानी."

" थोर आहे तुझी आई."

" तुझी कशी होती ?"

" मला आठवत नाहीं मी लहान असतांनाच आई वडील देवाघरी गेली अरे स्वत:च्या मुलाचें कोणतीहि आई चांगलेंच करील. परंतु दुसऱ्यांच्या मुलांचेहि करील ती खरी माता तुझी आई खरी माता आहे तिची वत्सलता सर्वांसाठीं आहे. मी जातों रंगा."

पंढरी निघून गेला वाड्याच्या दरवाजांत रंगा उभा होता. तो आईची वाट बघत होता. त्याला आई दिसली तो धांवला. परंतु आज आई एकटी नव्हती

" रंगा, ही नयना तुझी चित्रे बघायला आली आहे."

" आई, तू माझी जाहिरात नको करूं. मी का मोठा चित्रकार आहें ?"

" माझ्या हातांत बाळ तुझें चित्र होते. हिनें पाहिलें. तिला आवडले. तीहि चित्रकार आहे."

" त्यांची चित्रे कोठे आहेत ?"

" तीं दाखवण्यासारखी नाहीत."

" तुम्ही आगळी असालच. माझ्या खिशांत माझी चित्रे असायचींच. तोच तर आपला आनंद, तो प्राण."

सारी घरी आलीं. रंगानें आपली चित्रशाळा दाखविली. नयना बघत होती.

" हे बुद्धदेवांचें चित्र सुरेख आहे."

" वासुकाका मला प्रसंग सांगतात, मी चितारतों."

" तुमचे ब्रश बघूं."

रंगानें आपले ब्रश दाखविले.

" झप्झप् काढायला हा ब्रश उपयोगी पडतो. चिनी चित्रकार फटके मारीत भरभर रंगवतात. कुंचल्याचे तीनचार फटके आणि निसर्गदृश्य समोर उभें करतात. ठसठशीत असतात त्यांच्या रेषा."

" तुम्हांला हें सारें कोण शिकवतो ?"

" वासुकाका."

" मी मधूनमधून येत जाईन. मला फार आवड आहे चित्रकलेची. "

" तुमचीं दाखवा ना चित्रें? नक्की आणलीं आहेत तुम्ही."

नयनानें पिशवींतून चित्रें काढलीं. रंगा तीं पहात होता.

" छान आहेत" तो म्हणाला.

" तितकीं चांगली नाहीत. आज वासुकाका कोठें गेले?"

" शाळेंत कसली तरी सभा होती."

" मी जातें आतां."

सुनंदानें काशीताई, नयना, सर्वांना खायला दिलें. रंगाच्या पाठीवरून हात फिरवून आई निघाली.

" जाते मी रंगा."

" आईबरोबर येत जा वासुकाका भेटतील केव्हा तरी."

" अच्छा."

असे दिवस जात होते. रंगाची सर्वांगीण प्रगति होत होती. परंतु एक वादळ आलें. उन्हाळ्याची सुटी लागणार होती. आजपासून शाळा बंद व्हायच्या होत्या. रंगा पास झाला होता. वासुकाका सुटींत त्याला महाबळेश्वरला नेणार होते. किती बेत होते. परंतु सारें स्वप्न ठरायचें होते.

वासुकाकांना शाळेच्या चालकांनी कचेरींत बोलवून त्यांच्या हातीं त्यांनीं लिफाफा दिला. काय होतें त्यांत? पुढील वर्षापासून तुमची नोकरी नको असें त्यांत होतें.

" माझी काय चूक झाली?" वासुकाकांनीं विचारलें.

" तुम्ही अभ्यासाव्यतिरिक्त इतर शिकवतां. समाजवाद शिकवतां, इतर अनेक गोष्टी सांगतां. आमचीं मतें तुम्हांला माहीत आहेत."

" तीं चूक आहेत. भारतीय परंपरेला तीं शोभणारीं नाहींत. सर्वांना एकत्र नांदवायचा भारतीय प्रयोग आहे."

" तुमचा समाजवाद भारतीय परंपरेला शोभतो वाटतें?"

" समाजवाद म्हणजे कृतींत आणलेला वेदान्त."

" समाजवादांत धर्म आहे का?"

" धर्म म्हणजे का अस्पृश्यता ? धर्म म्हणजे का आम्ही तेवढे सज्जन बाकी सारे दुर्जन असें म्हणणें ? धर्म म्हणजे का मानवतेला तिलांजलि, उदार भावना फेकून देणें ? धर्म जोडीत असतो, तोडीत नसतो. धर्माचा खरा आत्मा सर्वांची धारणा नीट होण्यांत आहे. खरा धर्म सर्वांचे संसार सुंदर होण्यासाठीं झटेल. समाजवाद तुमच्या रूढी धर्माला मानीत नाहीं अमुक जात श्रेष्ठ, अमुक मानववंश श्रेष्ठ असें मानित नाहीं मानव्याचा खरा धर्म समाजवाद मानतो. ईश्वर मानून मानवांचा संहार करण्यापेक्षां त्याला न मानणारा परंतु मानवांना जवळ घेणारा खरा धार्मिक आहे. तुम्हांला महमद पैगंबराची गोष्ट आहे माहीत ?"

" मुसलमानांचें नांव नका काढूं."

" श्री छत्रपतींनीं त्यांच्या मशीदींस इनामें करून दिलीं. ऐका तर खरी गोष्ट एकदां पैगंबराकडे एक मनुष्य आला नि म्हणाला 'माझे भाऊ वाईट आहेत. ते प्रार्थनेला कधीं येत नाहींत. नमाज पढत नाहींत तुम्ही त्यांची खरडपट्टी काढा.' पैगंबर म्हणाले 'ते देवाची प्रार्थना करित नाहींत, परंतु कोणाची चुगली करायलाहि ते माझ्याकडे आले नाहींत तू प्रार्थना करतोस, परंतु दुसऱ्यांची त्यांच्या पाठीमागें निंदा करतोस, चुगल्या करतोस. प्रार्थना करून चुगलखोर बनण्यापेक्षां, चुगली न करणारा प्रार्थनाहीन बरा तो खरा धार्मिक.' आलें ना तुमच्या लक्षांत ? नुसते देवदेव म्हणणें म्हणजे धर्म नव्हे."

" मला तुमच्याशीं वाद करायचा नाहीं. या शाळेंत तुम्ही नको."

" ठीक. तुम्हांला सद्‌बुद्धि सुचो. लहान मुलांचीं मनें द्वेषानें भरूं नका. ती निर्मळ मनें घाणीनें बरबटवू नका. तें भयंकर पाप आहे."

" आम्हांलाहि अक्कल आहे."

वासुकाका बाहेर पडले शिक्षकांच्या बैठकींत चर्चा चालली. मुलांत कुणकुण गेली. कांही मुले म्हणालीं 'आपण त्यांना निरोप देऊं.'

" हो. खरेंच. चला मुख्याध्यापकांना विचारूं."

परंतु त्यांना परवानगी मिळाली नाहीं. शाळा सुटली. वासुकाकांनीं सर्व शिक्षकांचा, प्रमुखांचा निरोप घेतला. मुलांची त्यांच्याभोंवतीं गर्दी उसळली.

" आतां आम्हांला हरिजन कोण वाचून दाखवील ?"

" लेनिनच्या गोष्टी कोण सांगेल ?"

" सुंदर चित्रें आणून कोण दाखवील ?"

" खरा इतिहास कोण शिकवील ? "

मुलें म्हणत होतीं. तिकडून शाळेचे चालक आले. त्यांच्या तोंडावर संताप होता. वासुकाकांविषयींचे तें प्रेम पाहून त्यांना मत्सर वाटला.

" जा रे घरीं. येथें काय आहे ? निघा. "

" शेवटचे दोन शब्द मला त्यांना सांगू दे. "

" येथें शाळेंत नको. "

" सांगा, सांगा. " मुलें गर्जलीं.

" मी त्यांना दोन शब्द सांगणार आहें. तुम्हांला करायचें असेल तें करा. वाटले तर पोलीस बोलवा. "

असें म्हणून वासुकाकांनीं शेवटचे चार शब्द मुलांना सांगितले :

" प्रिय विद्यार्थ्यांनो, तुमच्या प्रेमानें मला निर्भय केले आहे. शाळाप्रमुखांनी मला क्षमा करावी. मुलांनों, मी दुसऱ्या कोठल्या तरी शाळेंत जाईन. येथें तुम्हांला देत असें तें नवीन मुलांना देईन. तेथूनहि कदाचित् मला हाकलतील. कारण आजकाल शिक्षणसंस्था जात्यंधतेचे अड्डे बनत आहेत. तुम्हां सर्वांना संकुचित, द्वेषी, मत्सरी बनवण्याचे प्रयत्न चालले आहेत. तुम्ही हे विष पचवून मृत्युंजय बना. राष्ट्राला प्रेमाचें अमृत द्या. सारे धर्म, जाति एकत्र नांदवायचा प्रयोग आपणांस करायचा आहे. भेदात अभेद पहायचा आहे. तुम्ही विचारानें, भावनेनें मोठे होत जा. सुखी होण्याचा एकच मार्ग आहे. उत्तरोत्तर वाढत जाणें, नवीन नवीन शिकणें, नवीन नवीन मैत्री जोडणें. तुम्ही उर्दुहि शिका. ती लिपी शिका. ईजिप्तपासून जावापर्यंतच्या अनेक देशात तीच लिपी आहे. या देशांशीं उद्यां स्वतंत्र झाल्यावर तुम्हांला संबंध जोडावे लागतील. इंग्रजी शिकण्यांत जसें पाप नाहीं तसें शेजारच्या भावांची, शेजारच्या देशांची भाषा शिकणें पाप नाहीं. त्यांच्या भाषा शिकणें हा शेजारधर्म आहे. कोणी चिनी शिका, रशियन शिका. उत्तरोत्तर पुढें जा. नवभारत तुम्हांला निर्मायचा आहे. मोठी जबाबदारी तुमच्यावर आहे. मी तुम्हांला किती सांगूं ? थोडीं तों गोडी "— त्यांचा आवाज सकंप झाला. एका मुलानें केव्हां हार आणला जाऊन कोणास कळे ? त्यानें तो हार घातला. वासुकाका मुलांजवळ बोलत शाळेबाहेर पडले.

" बेशिस्त मनुष्य " संतापानें प्रमुख ओरडले व निघून गेले. वासुकाका घरीं आले. रंगा, सुनंदा वाट पहात होतीं.

" काका, उशीरसा ? "

" रंगा, आतां दुसरी नोकरी शोधायला हवी. मला शाळेंतून काढून टाकलें. "

" कां ? "

" मी मुलांना नवजीवन देतों म्हणून. थोर विचार देतो म्हणून. द्वेषमत्सराऐवजीं सहानुभूति नि संयम शिकवतो म्हणून. संकुचित दृष्टि न देता विशाल दृष्टि देतो म्हणून."

" आता ? "

" आतां अर्ज लिहित बसायचे. महाबळेश्वर आतां येथेंच. सुटीचा पगारहि आतां मिळणार नाहीं. "

" काका, माझा पुन्हा भार ? "

" बाळ, तुझा का आम्हाला भार आहे ? काळजी नको करूं. कोठें तरी नोकरी मिळेल. नाहीतर वर्ग चालवीन. मला सारे विषय येतात. पुस्तकें लिहीन. "

" तुमचे एक पुस्तक अर्धवटच लिहून पडले आहे " सुनंदाने आठवण दिली.

" हात दुखे म्हणून तसेंच राहिलें. तें पुरें करीन. होईल. सारे ठाक होईल. हजारो, लाखोंची स्थिति तीच आपली."

काशीताईहि आता घरीं आली होती. सुनंदा, काशीताई, वासुकाका, रंगा–चौघे आनंदांत होतीं. रंगा चित्रें काढी, कधीं वाचीं, कधीं पडरीबरोबर फिरायला जाई. वासुकाका पुस्तक लिहीत: कोठें अर्ज करीत.

" रंगा, अरे दुधगांवचें बोलावणें आले आहे. "

" दुधगांव ? "

" हो. तेथें नुकतीच गिरणी झाली आहे. वाढते आहे शहर. तेथे इंग्रजी शाळा आहे. या म्हणतात. जायचें का तेथें ? तेथील हवा सुंदर आहे म्हणतात. एका नदीचा धबधबा तेथें पडतो, म्हणून दुधगांव. "

" तेथें सुंदर निसर्ग असेल. धबधबा मी बघेन. त्याचें चित्र काढीन. "

" तू का त्यांच्याबरोबर जाणार रंगा ? " आईनें विचारले.

" काशीताई, तो कोठें राहणार ? तो माझ्याजवळच असूंदे. तुम्ही सेवासदनांत रहा. सुटींत घरीं या. रंगाची चिंता नका करूं. मला त्याचें ओझें नाहीं.

त्याच्या गुणांचा विकास करणें हा माझा आनंद आहे. रंगा देशाचें नांव करील. तो मोठा कलावान् होईल. त्याच्या बोटांत अपूर्व देणगी आहे."

"तुम्हीच त्याचे खरे मायबाप" आई डोळ्यांत पाणी आणून म्हणाली.

मे महिना संपला. एक दिवस घरी आइस्क्रीम करण्यांत आलें. पंढरी व इतर मित्र आले होते. नयना मातारला आपल्या घरीं गेली होती. काशीताईंना तिची आठवण येई.

बांधाबांध झाली आंवराआंवर झाली. कांहीं सामान पुढें पाठवण्यांत आलें. कांहीं जुनें सामान मोलकरणीला देण्यांत आलें. जायचा दिवस उजाडला.

"रंगा, जपून रहा. काकांचें ऐकत जा. आईला पत्र पाठवित जा. माझी काळजी नको करूं" काशीताई त्याला जवळ घेऊन सांगत होत्या. त्यानीं लोंकरीचा एक उबदा विणला होता तो त्याला त्यानीं जातांना दिला.

स्टेशनवर सारीं आलीं गाडी तयारच होती काशीताई खालीं फलाटावर उभी होती.

"जपा सारीं" ती म्हणाली.

"रंगाची काळजी नका करू" काका म्हणाले

"सुटींत या तुम्ही स्वतःची काळजी घ्या" सुनंदा म्हणाली. शिट्टी झाली. गाडी हलुहलु निघाली. आणि हलुहलु अश्रूहि बाहेर पडले. रंगा आईकडे बघत होता. आईला वर बघवेना. गेली गाडी. आतां रंगाला रडें आलें. त्याला हुंदका आला.

"उगी रंगा दिवाळीला आणूं हं आईला."

थोड्या वेळानें तो शांत झाला. गाडी भग्‌भग् सण्सण् करित जात होती.

काशीताई सेवासदनांत आल्या. त्या आल्या तों दारांत नयना.

"केव्हां आलीस नयना?"

"आज दुपारीं. रंगा बरा आहे?"

"बरा आहे. तो आतां लांब गेला. वासुकाकांची येथली नोकरी गेली. ते दुधगांवच्या शाळेंत गेले. त्यांनीं रंगालाहि बरोबर नेलें. तेच आतां त्याचे मायबाप. मी कोण? मी फक्त जन्म दिला. नयना, मी दुर्दैवी आहें."

"असें नका म्हणूं. सारें चांगलें होईल" ती म्हणाली.



## आई गेली : : : ५

रंगाला दुधगांव आवडले. नदीकांठचा देखावा नयनमनोहर असे. आजुबाजूला वृक्षाच्छादित टेंकड्या होत्या. त्या जंगलांत मोर होते, वानर होते. रंगा कधीं कधीं एकटाच वनराजींत जाई आणि वनदेवतेचा अणु बाळ होऊन तेथें बसे. त्याला कधीं भय वाटत नसे. तो नदीच्या डोहांत पोहायचा. त्याला त्यावेळेस पंढरीची आठवण येई.

शाळेंत तो सर्वांचा आवडता झाला चित्रकलेचे शिक्षक त्याच्यावर प्रेम करित. शाळेंत हस्तकौशल्याचें प्रदर्शन होते. मांडामांड करायला रंगाने मदत केली. प्रदर्शन बघायला गावांतील बरीच मंडळी आली. रूपचंद म्हणून एक कलाप्रेमी सुखवस्तु मनुष्य गांवांत होता. रंगाचीं चित्रे त्याला फार आवडलीं. त्या चित्रांना त्यानें एक सुवर्णपदक दिलें. मोठ्या समारंभानें रूपचंदांच्या हस्तेच रंगाला तें देण्यांत आले. चित्रकलेच्या शेवटच्या परीक्षेला तो बसला नि पहिला आला. त्याला अनेक बक्षिसें मिळालीं. आई दिवाळींत आली नाहीं. रंगाच्या आईला नयना आपल्या घरीं घेऊन गेली. काशीताईना तिनें सज्जनगड, माहुली, मेरुलिंग, धावडशी सारें दाखविलें.

" रंगाला हें सारे पाहून किती आनंद झाला असता ?" काशीताई म्हणाल्या.

" उन्हाळ्याच्या सुट्टींत त्या सर्वांनाच आपण बोलावूं. आपण महाबळेश्वराला जाऊं. बाबा दरवर्षी तेथें बंगला घेतात. "

" पुढचें कोणी पाहिलें आहे. तो दिवाळींत माझ्या आशेनें होता. "

" परंतु मी तुम्हांला आणलें. काशीताई, मला आई नाहीं. तुम्ही माझीं धुणीं धुतां. परंतु मी तुमच्याकडे निराळ्या दृष्टीनें बघते. मला तुम्ही जवळच्या

वाटतां. माझ्या आजारीपणांत तुम्ही माझें आंग चेपीत होतां. मला आईचे जणूं हात वाटले."

"मीं आलें म्हणून तुला बरे वाटलें ना ?"

"हो. मुलाला सोडून तुम्ही माझा हट्ट पुरवलात. किती तुमचें उदार मन ? आणि काशीताई, बाबांना रंगाची चित्रे आवडलीं. ते मला म्हणाले 'तुझ्या चित्रांत सहजता नाहीं. हा मुलगा जन्मजात चित्रकार आहे. त्यानें दोन रेघा ओढल्या तरीं त्यांत सुंदरता असेल ! मी चित्रकलेची प्रयत्नशील उपासना करणारी आहें. तुमचा रंगा सहजभक्त आहे. जणूं तो मूर्तिमंत चित्रकला आहे. त्याचीं बोटें मी पहात असें. कशीं लांब सरळ आहेत. वर निमुळतीं होत गेलेलीं "

"रंगावर सर्वांचें प्रेम आहे."

"काशीताई, त्याचें रंगा नांव कसें ठेवलेत ? तुम्हांला का आधीं स्वप्न पडले ?"

"तो रंगपंचमीच्या दिवशीं जन्मला त्या दिवशीं मी अपार रंग खेळलें. ज्याच्या त्याच्या अंगावर रंग उडवित सुटले गायीगुरांच्या अंगांवरहि उडविला. चिमण्यांच्या अंगांवर पिचकारी मारली माझी वृत्ति रंगित झाली होती. आणि मी दमून घरीं आले नि बाळंत झाले बारशाच्या दिवशी आई म्हणाली 'रंगपंचमीचा बाळ. त्याचें नांव श्रीरंग ठेवा.' पुढें श्री गेली नि नुसता रंगा राहिला."

"श्री गेली. तुम्हांला गरिबी आली. येईल, पुन्हां श्री येईल. रंगाचें एकेक चित्र पृथ्वीमोलाचें होईल. रंगा पुन्हां श्रीरंग होईल. हो काशीताई."

"तुझें नांवच नयना. तुझ्या डोळ्यांना का दूरचें दिसत आहे ? तूं का भविष्यदेवतेचे नयन आहेस ? तुझी वाणी खरी ठरो. नयनाच्या नयनांना दिसणारें खरें होवो."

सुटी संपली. नयना नि काशीताई आज पुण्याला जाणार होत्या. नयनाच्या वडिलांनीं काशीताईना एक सुंदर पातळ घेऊन दिलें. त्यांना नाकारवेना. नयनाचें मन कसें दुखवायचें ?

सेवासदन सुटीनंतर सुरू झालें. एके दिवशीं रंगानें आईकडे बक्षीस मिळालेलें सुवर्णपदक पाठविलें. आईला जेव्हां तें आलें तेव्हां धन्यता वाटली.

"नयना, छान आहे नाहीं पदक ?"

"थांबा, मी माझ्या दंडाला तें बांधतें."

"वेडी आहेस."

नयना तें पदक घेऊन बसली. जवळ काशीताई होत्या.

"नयना, तूं सुद्धां अशीं पदकें मिळवशील."

"माझ्या बोटांत तशी कला नाहीं."

"येईल. त्या कलेची उपासना तू चालवली आहेस."

"काशीताई, ध्रुवाला देव तीन दिवसांत भेटला. परंतु कांहींना हजारों वर्षे तपश्चर्या करूनहि तो भेटला नाहीं. असें कां बरें असावें ?"

"त्यांची पूर्वजन्मींची तपश्चर्या आपणांस दिसत नाहीं. आणि किती काळ तपश्चर्या केली याला महत्त्व नाहीं. त्या तपश्चर्येंत मन किती रंगलें होतें ही मुख्य गोष्ट आहे. हजारो वर्षे जप केला परंतु मन दुसरीकडेच असेल तर तें सारें वाया नाहीं कां गेलें. ? या उलट क्षणभरच देवाला हांक मारली, परंतु त्या हांकेंत सारा आत्मा असेल तर देव धांवल्याशिवाय राहणार नाहीं. वासुकाका एके दिवशीं रंगाला असें सांगत होते."

"तुमच्या रंगाची पुण्याई की अशा थोरांजवळ त्याला धडे मिळत आहेत."

काशीताई कामाला निघून गेल्या. नयना ते पदक बघत होती. ती तें मनगटावर बांधी, दंडाला बांधी. कपाळावर पिंपळपानाप्रमाणें धरी, तर गोफांत ओंवून गळ्यांत घाली. ती उठली. तिनें ट्रंकेंतून रंगाच्या हातचीं चित्रें काढलीं. त्या चित्रांकडे ती बघत बसली. त्या चित्रांच्या शेजारी तिनें स्वत:चीं चित्रें मांडलीं.

"रद्दी चित्रें, भिकार"

असें म्हणून स्वत:चीं चित्रें तिनें फाडून फेकलीं. ती तेथें डोळे मिटून बसली. ती का साधना करित होती ?

रंगाचें एके दिवशीं सुंदर पत्र आलें.

"प्रिय आई,

तुझी किती आठवण येते ! तूं दिवाळींत नाहीं आलीस. आतां उन्हाळ्यांत येशील ? का ती नयना तुला पुन्हां नेणार ? नयना असे करील तर माझ्या डोळ्यांत खुपूं लागेल ती.

परवां आम्हीं वनभोजनास गेलों होतों. दाट झाडींत आम्ही होतों. आणि सळसळलें कांही तरी. सर्प होता कीं काय ? लहानपणीं मी विंचवांजवळ, सर्पांजवळ खेळत असें. सापाच्या फणेवर मी हात ठेवला होता. होय ना ? मी

त्या गोष्टी काकांना काकूंना सांगितल्या. काका म्हणाले, ' तरीच साप तुला भेटायला आला. परंतु आम्हां भित्र्यांना पाहून निघून गेला. ' आम्ही मोर पाहिले. कसे ते छान ओरडत. तूं असतीस तर ? त्या नयनालाहि ही जागा आवडली असती.

काका म्हणतात चित्रकारानें सृष्टींत बुड्या घ्यायला हव्यात. आई, एक चिनी चित्रकार होता. समुद्राची वादळी भव्यता यथार्थपणें कळावी म्हणून तो वादळांत समुद्राच्या लाटांत उभा होता. घों घो लाटा उसळत येत होत्या. सों सों वारा वहात होता. आणि तो चित्रकार सर्वेंद्रियांचे नयन करून समोरची फेसाळ, हेलावणारी भव्यता पहात होता. दुसरा एक चिनी चित्रकार उंच पर्वतावर जाई नि तेथे बसून सृष्टि बघे. काका म्हणाले " उंच पर्वतावरची शुद्धता त्याच्या कलेंत येई." काकांचें एकेक सांगणें अपूर्व वाटते.

काल काकूनें तुझी आठवण काढली होती. माठाची भाजी होती. कोरडी. तुला ती फार आवडते. आई, आपण उन्हाळ्याच्या सुटींत भेटूं हं ? तूं काळजी नको करूं. काकाकाकू आहेत तोंवर रंगा सुखी आहे. आणि तुझा आशीर्वाद नेहमीं जवळच आहे. नयनाला नमस्कार. माझें पदक तेथेंच असूं दे.

तुझा आवडता,

**रंगा**

" छान लिहितो रंगा पत्र " नयना वाचून म्हणाली.

" काका त्याला शिकवतात. "

" आणि काशीताई लिहितो कसा कीं नयना डोळ्यांत खुपेल ! मी खुपेन का हो कोणाच्या तरी डोळ्यांत ? मी का दगड धोंडा आहे, कुसळमुसळ आहें खुपायला. "

" त्यानें गंमत केली. तुझें नांव नयना ना ? त्या शब्दावर त्यानें खेळ केला. लबाड आहे तो. त्याला खोड्या करायला हव्यात. लहानपणीं त्यानें माझें चित्र काढलें. मी म्हटलें त्यांचें कां नाहीं काढलेंस ? लगेच माझ्या चित्राला मिशा काढून म्हणाला हें त्यांचें ! मला हंसतां थोडें झालें."

" परंतु रंगा आतां गंभीर दिसतो. "

" गरिबी, अनुभव यामुळें अकालीं गंभीरता येते. "

एके दिवशी वाढतां वाढतां काशीताईस घेरी आली. हातांतील पोळ्यांचें ताट पडलें. कोण धांवाधांव ! त्यांना उचलून नेण्यांत आलें. नयनानें त्यांना

आपल्या खाटेवर गादीवर निजविलें. डॉक्टर आले. काशीताईंना शुद्ध येईना. बराच वेळ झाला. काय करणार ?

"मेंदूतील रक्तस्राव कारण आहे. अति काळजीमुळे झालें असावें. आम्हांला आशा नाहीं" तज्ज्ञ डॉक्टरांनीं सांगितलें.

नयनानें दुधगावला तार दिली. रंगाला घेऊन वासुकाका निघाले. परन्तु आईचे प्राण निघून गेले होते. नयनानें रंगाचा फोटो आईच्या हृदयाशीं ठेवला होता.

वासुकाका नि रंगा आले. तो सारें शून्य होतें. रंगा आईच्या शांत देहाजवळ बसला.

"आई" दोनच अक्षरें त्यानें उच्चारिलीं. आईच्या चरणांवर त्यानें डोकें ठेवले. तो डोकें उचलीना.

"रंगा, मी आहें तुला. ऊठ बाळ. नयना, त्याला घेऊन जा'. वासुकाका म्हणाले.

वासुकाकांचे स्नेही आले इतर मंडळी आली. वासुकाकांनीच अग्नि दिला' रंगाला त्यांनी बरोबर नेलें नाही. तो चितेतहि उडी घेईल ते म्हणाले.

नयना नि रंगा दोघे बसली होती.

"आईची सेवा तूं केलीस. नयना तूं भाग्याची. मी कपाळकरंटा. आईला सुख देईन म्हणून माझी आशा. सारी स्वप्नें संपली, भंगलीं."

"रडू नको रंगा. आईने एकदां तुझी आठवण केली. रंगा असें म्हणाली. मी म्हटलें काशीताई, रंगाची काळजी नका करूं. मी तुझा फोटो त्यांच्या हातांत दिला. त्या हातांना का कळले ? त्या हातांना का डोळे होते. ? त्या निर्जीव होत जाणाऱ्या हातांनीं तो फोटो घट्ट धरला. पकड सुटेना. मी तो हळूच हृदयाशीं ठेवला. उगी रंगा. तुझ्या आईचे हाल नाही झाले. माझ्या गादीवर निजविलो डॉक्टर किती आले होते. परंतु उपाय चालेना. काय करणार आपण ? माझी आई लहानपणींच गेली. तुला आतांपर्यंत तरी देवानें दिली."

"तुझे बाबा आहेत."

"तुला थोर वासुकाका मिळाले आहेत."

आणि रंगाचा मित्र पंढरी आला. दोघे मित्र भेटले रंगाला रडूं आवरेना.

" रंगा, उगी. अरे मी लहानपणापासून पोरका आहें. माझ्याकडे रंगा बघ आणि डोळे पूस. चल. आपण बाहेर जाऊं"

पंढरी रंगाला घेऊन गेला. कोठें गेले दोघे ? पर्वतीच्या बाजूला जाऊन कालव्याच्या कांठी बसले. बोलणें बंद होतें. मधूमधून रंगाचे डोळे पुन्हां भरून येत.

" रंगा, तूं यंदां मॅट्रिक होशील. पुढें ?"

" मुंबईस कलाभवनांत जाईन. काका म्हणाले मी पैसे देईन. पुढे ते मला विश्वभारतींतहि पाठवणार आहेत. नंदलालांच्या पायांजवळ बसून धडे घेईन. कलेच्या अंतरंगांत शिरेन. कलेच्या आत्म्याची भेट घेईन."

" मी मिलटरीत जाईन. तेथेंच हिशेब करीत बसेन. मुंबईस आलास तर मी भेटेन. एखादेवेळेस पेशावरकडेहि मला पाठवायचे. काय नेम ? मला साऱ्या जागा सारख्याच. माझें प्रेमाचें कोण आहे ? मी दूर गेलों काय, मेलों काय, कोण रडणार आहे ?"

" रंगा रडेल."

" तुला मी पत्र पाठवीन. भारतमातेचा मी पुत्र; जेथें जाईन तेथें माझे घर, तेथें माझे भाऊ. देवानें मला मोठे केलें आहे. मला १६०० मैल लांब रुंद घर दिलें आहे. कोट्यवधि माझीं भावंडें. लाखों माझे माय बाप."

" तूं कवि होऊन जणूं बोलत आहेस."

" तूं चित्रकार, मी कवि."

" आपण एकमेकांस शोभतों. आपण दोघे पोरके. दोघे भारतमातेचे."

" तूं अजून तेवढा बंधमुक्त नाहींस. काका काकू आहेत आणि नयना आहे."

" आईचें सारें तिनें केलें."

" ती थोर मुलगी आहे. एकदां मला रस्त्यांत भेटली म्हणाली रंगा तुमचा मित्र ना ? त्याचें पत्र येतें का ? मी म्हटलें आमचें प्रेम पत्रापत्री नाहीं. तें पत्रातीत आहेत. तें शब्दांत मावत नाहीं. कागदावर रंगत नाहीं. तिनें माझ्याकडे करुणेनें पाहिलें नि ती गेली. जहागिरदाराची मुलगी परंतु ऐट नाहीं."

" माझी आई धुणीं धुणारी. परंतु स्वतःच्या गादीवर तिनें तिला निज-विलें. सुटींत घरीं घेऊन गेली होती."

"ऊठ रंगा. तुम्ही आज जागार का?"

"अस्थि घेऊन परवा जाऊं. गंगेंत नेऊन सोडूं. नाशिकच्या गोदावरीच्या प्रवाहांत, कांहीं मुंबईस समुद्रांत"

"आतां केव्हां भेटशील?"

"काय सांगूं पंढरी? आई अकस्मात गेली. या जगांत कशाचा भरवसा नाहीं."

"असले दळभद्रें नको बोलूं. आशेने रहा, भारतासाठी जग. भारताची कीर्ति तुझ्या कुंचल्यानी दिगंतात ने. चल ऊठ. रंगा, ऊठ, डोळे पूस. हंस जरासा. माझें दुःख आज तुला कळेल. परंतु मी दुःख उगाळीत नाहीं बसत. हंसतों, खेळतो, पोहतो. तसा तू हो. चल. मी स्टेशनवर तुला पोंचवायला येईन." दोघे मित्र उठले नि गेले



## रंगाचें आजारीपण : : : ६

रंगाला घेऊन वासुकाका दुधगांवला आले. त्यांना व सुनंदालाहि रंगाबद्दल फार वाईट वाटे. त्याला आतां कोण होतें? आई ना बाप, बहीण ना भाऊ. मामा होता, तो असून नसल्यासारखा. रंगावर तीं दोघें अधिकच माया ममता दाखवूं लागलीं. वासुकाका रंगाच्या गुणांची नीट वाढ व्हावी म्हणून शत प्रयत्न करीत. ते सुंदर सुंदर मासिकें बोलवीत. चित्रांचे संग्रह मागवीत. रंगासाठीं सारें. ते त्याला चित्रकलेंतील निरनिराळ्या संप्रदायांचीं वैशिष्ट्यें सांगत. रजपूत कला, बंगाली कला, मोगल कला, प्राचीन अजिंठा कला, सर्वांमधील साम्य आणि विरोध दोन्ही दाखवीत. त्या त्या कलांच्या पाठीमागचा हेतु सांगत. कमलासारखे विशाल नयन का दाखवायचे? दक्षिणी शिल्पांत कंबर अगदीं बारीक आणि छाती विशाल कां? कमल पुष्प अलिप्तता दाखवतें; बारीक कंबर विषयवासनांकडे लक्ष न देणें व विशाल छाती म्हणजे पुरुषार्थशाली होणें इत्यादि भाव दाखवतात असा प्रतीकवाद वासुकाका सांगायचे. रंगाला आनंद होई. त्याला जणूं नवीन डोळे आले. त्या त्या सांप्रदायिक चित्रांकडे तो आतां रसिकतेनें पाहूं लागला. पाश्चिमात्य आणि पौर्वात्य कलांतील विशेष अभ्यासूं लागला. वासुकाकांच्या चरणांजवळ बसावें नि शिकावें असें त्याला सारखें वाटे. त्याला कशाचा आतां तोटा नव्हता. रंग, ब्रश, सारें साहित्य भरपूर असे.

परंतु काय असेल तें असो. वासुकाका मात्र पूर्वीप्रमाणें तितके आनंदी नसत. रंगा जवळ असला म्हणजे त्यांची कळी फुललेली दिसे. परंतु एरव्हीं एकटे असले कीं ते विचारमग्न असत. क्वचित त्यांच्या डोळ्यांतून अश्रुहि घळघळत. एके दिवशीं ते एकटेच खोलींत होते. जवळ एक पुस्तक उघडें पडलेलें होतें. परंतु एकाएकीं त्यांच्या मनांत अन्य विचार आले. समोरच्या खिडकींतून

ते शून्य दृष्टीनें बाहेर पाहूं लागले. एक उंच झाड समोर होतें. तें त्यांना फार आवडायचें. परन्तु त्या झाडाकडे आज त्यांचे लक्ष नव्हते. त्यांचे डोळे घळघळत होते.

इतक्यांत सुनंदा कशालातरी आंत आली. तिने ते गंभीर दृश्य पाहिलें. ती अवाक् तेथे उभी होती शेवटी जवळ येऊन ती म्हणाली :

" काय झाले, डोळ्यांत कां पाणी ?"

" तूं केव्हां आलीस ? पाणी येत मधून मधून. '

" डोळे पुन्हा तपासून तरी घ्यावे. चष्म्याचा नम्बर बघावा."

" डोळे ठीक आहेत."

" मग पाणी कां येतं ? आणि मधून मधून येते म्हणता."

" तुला काय सांगूं ?"

" मा तुम्हांला विचारणारच होते. तुम्ही अलिकडे तितके आनंदी नसतां. कां बरे ? रंगाची आई गेली म्हणून ? परंतु त्या गोष्टी का कोणाच्या हातच्या आहेत ? आपण रंगाला सांभाळित आहोतच. तो मुलासारखाच आहे. तो आतां परका नाही. तुमचं प्रेम त्याला मिळतच आहे."

" हें बघ, आपण कितीहि प्रेम दिले तरी आईच्या प्रेमाची का सर येणार आहे ? आईने नुसते बघणें, त्यांत सारें त्रिभुवन असतें. रंगाला आपण इकडे आणलं हें त्याच्या आईला सहन झालें नसावे. तो वियोग त्या माउलीला फार जाणवला असावा. नका नेऊं रंगाला असे तरी काशीताई कसें म्हणणार ? मीच त्याला इकडे नको होते आणायला. तिकडेच त्याला पैसे पाठवले असते तर तो आईला मधून मधून भेटता. काशीताईच्या अंतरात्म्याला आनंद मिळत राहिला असता. परंतु त्यांच्या सकल सुखाचा ठेवा, त्यांचे परम निधान आपण लांबविलें. रंगा रंगा त्या रोज मनांत म्हणत असतील. मेंदू त्यांचा शेवटीं दुभंगला, शतभंग झाला. हृदय भंगलें. मुलाचे रात्रंदिवस स्मरण करीत त्या देवाघरीं गेल्या. राहून राहून माझ्या मनांत हे असे विचार येतात नि आपण मोठें पाप केलें, मायलेंकरांच्या कायमच्या ताटातुटीला आपण कारणीभूत झालों असें वाटून डोळे शेवटीं भरून येतात."

" तुम्ही असें कांहीं मनांत आणूं नका. रंगाचें आपण सारे चागलें करूं याची काशीताईंना खात्री होती. त्या दिवाळाच्या सुट्टीत नयनाकडे गेल्या.

मुलांची इतकी आर्त ओढ रात्रंदिवस असती तर त्या इकडे नसत्या का धावत आल्या ? त्यांना माहीत होतें कीं रंगा सुखांत आहे. त्या निश्चिंत होत्या. उगी-चच मनाला लावून घेतां. "

इतक्यांत रंगाच आंत आला.

" ये रंगा. बैस. कोठें गेला होतास ? "

" वाचनालयांत गेलों होतों. काका, आज मला बरें नाहीं वाटत. कांहीं तरी होतं आहे. "

" काय होतं ? तापबीप नाही ना आला ? सर्वत्र साथ आहे. बघूं ? "

वासुकाकांनीं त्याच्या अंगाला हात लावून पाहिलें. कढत होतें अंग. ते चपापले. रंगाचे डोळेहि जरा लाल दिसत होते. चेहरा तप्त दिसत होता.

" रंगा, बाळ तुला ताप आला आहे चल नीज. आंथरुणावर पडून रहा. थंडी वाजली का ? "

" दोन दिवस मला कणकण वाटे. परंतु म्हटलं थांबेल. आज मात्र हात-पाय गळून गेल्यासारखे वाटते. वाचनालयांत मी बसूं शकलों नाहीं. "

सुनंदानें नीट आंथरुण केलें. रंगा जाऊन झोपला. मच्छरदाणी लावण्यांत आली. वासुकाकांनीं तापनळी लावून ताप पाहिला.

" किती आहे काका ?

" आहे, बराच आहे. पडून रहा हं बाळ "

" पण किती आहे सांगा ना ? मी कांहीं घाबरत नाहीं. तुम्ही नि काकू जवळ असल्यावर मी कशाला घाबरूं ? किती आहे ताप ? "

" दोनहून अधिक आहे. मी कपाळावर कोलन वाटरची घडी ठेवतों. बरें का. "

वासुकाका त्याच्याजवळ बसून होते त्याचें मधून अंग चेपीत, पाय चुरीत. मधेंच त्याच्या तप्त मस्तकावर आपला वत्सल हात ठेवीत. रंगा डोळे मिटून पडून होता. त्याला का झोंप लागली होती ?

दहा वाजून गेले.

" शाळेंत जाणार ना ? " सुनंदानें येऊन विचारलें.

" आजच ताप आला असावा. एखादे वेळेस कदाचित् घाम येईल. बघूं आजचा दिवस वाट. "

"जातांना वाटेंत डॉक्टरांना सांगून जा. ते येऊन बघून जातील. मी औषध आणीन. वेळींच जपावें. ते घामाचें औषध देतील."

"बरं. मी त्यांना सांगतों. तूं वाढ पान."

वासुदेवराव उठले. त्यांनीं हातपाय धुतले. ते पानावर बसले.

"त्याला खायला नको काही देऊं. मोसंबी आण. दूध कॉफी दे."

"डॉक्टरांना मी विचारीनच काय द्यायचें तें."

जेवण झालें. शाळेत जायची वेळ झाली. रंगा पडून होता. वासुकाका क्षणभर त्याच्याजवळ बसले. रंगानें डोळे उघडून बघितले.

"मी शाळेंत जाऊना रंगा?"

"हो जा माझी रजा सांगा ताप निघेल, नाहीं काका? मला आतां बरें वाटतें. जा तुम्ही."

ते उठले नि गेले. सुनंदानेंहि स्वतःचें जेवण वगैरे आटोपलें. आणि डॉक्टर बाराच्या सुमारास आले. त्यांनी तपासलें. औषध पाठवतो ते म्हणाले.

"खायला काय?"

"गोड ताक, दूध, मोसंब्याचा रस द्या. अन्न नको."

"साधाच आहे ना ताप?"

"साधा नसावा. एक दोन दिवसांत लक्षणें नक्की दिसतील."

डॉक्टर गेले. सुनंदा औषध, फळें घेऊन आली. तिनें रंगाला औषध दिलें. त्याच्याजवळ ती बसून होती. मध्ये रस वगैरे तिने दिला. मधल्या सुटींत वासूकाका दुचाकीवरून घाईघाईनें आले नि बघून गेले. ताप कमी नव्हता झाला. घामाचेंहि चिन्ह नव्हतें.

रंगाचा ताप शेवटी दोषीच ठरला. ताप हटेना, निघेना. चौदा दिवस झाले. एकवीस झाले. ताप आहेच. रंगा थकला. तो वातांत असे. त्याची शुद्ध बिद्ध गेली.

"आई, तूं चिंता नको करूं. मी सुखी आहे. मी नाहीं येणार. मला शिकायचें आहे. खरें नाहीं वासुकाका? मी चित्रकार होईन. मी भारताचें नांव करीन. अमेरिका माझीं चित्रें खरेदी करील. आई, मी तुला श्रीमंत करीन. तुझ्या रंगाच्या एकेका चित्राला लाख लाख रुपये मिळतील. हंसूं नको आई. मी स्वप्नांत नाहीं कांहीं. चांगला जागा आहें मी. मी वातांत नाहीं. शुद्धीत आहे. नयना, खरें कीं नाहीं? नयना, बोल ना! आईची सेवा करणारी नयना. काका,

महाबळेश्वरीं जायचें ना? यंदां जाऊंच. परंतु आई नाहीं. पंढरी, ये ना रे. रंगा-जवळ बसून रहा. एकटे काका किती करतील! नयना, तूहि ये. काकूंना म्हण 'तुम्ही झोपा. मी बसते रंगाजवळ.' पंढरी, जेवलास की उपाशी? तूं मिलिटरींत जाणार का? तुझ्या हातांत बंदुक, माझ्या हातांत ब्रश. मी ब्रशानें क्रान्ति करणारा, तूं मिलिटरींत जाऊन क्रान्ति कर. पंढरी, हंसूं नको. अरे तुम्ही शिपायीहि पुन्हां बंड करून उठाल. १८५७ पुन्हां होईल. १९५७ च्या आंत इंग्रज जातीलच जातील. १८४८ मध्ये यांनी सातारची गादी खालसा केली. पाप केलें गोऱ्यांनी. त्यांना १९४८ साल हिंदुस्थानांत दिसणार नाहीं. काका, केव्हां हो हे इंग्रज जातील? आतां पुन्हां स्वातंत्र्याचा लढा आला तर मी जाईन हो. तुम्ही मला तीस सालीं, बत्तीस सालीं जाऊं दिलें नाही. आतां नाही मी ऐकणार. मी जाणार, जाणार."

असें म्हणून तो ताडकन् उठे. सुनंदा, वासुकाका यांना तो आवरता आवरत नसे. रंगाला त्या तापांत जणुं स्फुरण चढे. त्याच्या बुद्धीला जणुं पल्लव फुटत. मधेंच तो कविता रचून म्हणे. मधेंच हसे, मधेंच बोले, उठे. एखादेवेळेस शान्त पांखराप्रमाणें निपचित पडून राही.

एके दिवशीं वासुकाका एकटेच रंगाजवळ होते. ते जणुं भावमग्न होते. त्यांचे डोळे मिटलेले होते. रंगाचा हात त्यांच्या हातांत होता. ते कांहीं तरी बोलत असावेत. काय बरें म्हणताहेत?

"प्रभो, या बाळाला वांचव. तूं त्याला अमोल देणगी देऊन पाठविलें आहेस. माझें आयुष्य या बाळाला दे. मी काय सांगूं प्रभो तुला. तूं सर्वज्ञ आहेस. तुला का आम्ही सांगायचें? तुला का कळत नाहीं? आम्ही वेडीं माणसें."

असें ते म्हणत होते. त्यांचे डोळे मिटलेले होते. आणि रंगानें आतां उघडले होते. तो एकाग्र दृष्टीनें काकांकडे बघत होता. आणि एकदम तो उठला. त्यानें काकांना मिठी मारली.

"काका, रडूं नका. मी बरा होईन."

"अरे, असें उठूं नये एकदम. रंगा, नीज बाळ. पडून रहा. असें उठूं नये."

"मी बरा होईन; आई मला म्हणाली तूं बरा होशील. 'रहा काका काकूं-जवळ. सुखी हो' असें म्हणाली. मला आई भेटली, बोलली. आतां मी बरा होईन. आई मला नेणार होती परंतु मी नको म्हटलें. काका, आईपेक्षां का ब्रशांवर नि रंगांवर माझें अधिक प्रेम आहे?"

"रंगा, किती रे बोलशील ? तूं अशक्त झाला आहेस. तापांत हृदय दुबळें होतें. असें उठूं नये, फार बोलूं नये."

"तुम्ही जवळ असल्यावर हृदय दुबळें कशाला होईल ? माझें हृदय वज्राचें आहे. तें कधीं मोडणार नाहीं."

वासुकाका त्याला बोलूं देत होते. परंतु थोड्या वेळानें रंगा शान्त कोंकराप्रमाणें पडून राहिला. शाळेंतील विद्यार्थी मधून मधून तेथें बसायला येत. रात्रीं कधीं रघु येई, विठू येई. वासुकाका नि सुनंदा यांना जरा विश्रांति मिळे.

४२ दिवसानंतर रंगाचा ताप निघाला. हळुहळु त्याला बरें वाटूं लागलें. परंतु दोन महिने चालवत नव्हतें. सुनंदा त्याचा हात धरून त्याला चालवी. कधीं वासुकाका चालवीत.

"मी तुमचा लहान बाळ जसा. मला चालायला शिकवतां. खरें ना काका ?"

"तूं आमचाच बाळ. तुझी आई आमच्या पदरांत घालून, आम्हांला देऊन गेली. वाटलें ती माउली देणगी परत नेते की काय ! परंतु या देणगीला आम्ही पात्र ठरलों. खरें ना रंगा ! आतां लौकर चांगला हो " असें वासुकाका प्रेमानें म्हणत.



रंगाचे एक वर्ष फुकट गेलें. परंतु प्रकृति चांगली झाली. मॅट्रिक होऊन तो मुंबईस चित्रकलेचें शिक्षण घ्यायला गेला. तीनचार विद्यार्थी मिळून त्यांनीं एका चाळींत एक जागा घेतली होती. लहान लहान दोन खोल्या होत्या. इतर विद्यार्थी खानावळींत जात. परंतु रंगा हातानेंच स्वयंपाक करी. खानावळीचें अन्न त्याला आवडत नसे. शिवाय खर्च कमी यावा म्हणूनहि तो जपे. वासुकाकावर बोजा घालायचा तरी किती असें त्याच्या मनांत येई.

रंगा चित्रकार होता, कलावान् होता. परंतु त्याची कला केवळ कागदी नव्हती. सर्व जीवनांतच तो कला आणी. खोली कशी स्वच्छ ठेवी. इतर विद्यार्थी सारें अस्ताव्यस्त टाकून जायचे. रंगा तें सारें नीट लावून ठेवायचा. तो जितक्या आवडीनें चित्र रंगवी, तितक्याच आवडीनें केर काढी, मोरी घाशी, कपबश्या स्वच्छ विसळी. तो भांडीं लख्ख ठेवी. त्याचा स्वयंपाक स्वच्छ, सुटसुटीत असे. साधी पोळीच परंतु तो किती सुंदर भाजी. बटाटे चिरणें असो. तो तुकडे कलात्मक कापी. रंगा अन्तर्बाह्य कलावान् होता. त्याची दृष्टि सर्वत्र सौंदर्य बघे, आणि सर्वत्र तें निर्मी.

एक दोन वर्षें गेलीं. रंगा आतां चित्रकलेच्या तिसऱ्या वर्षाला होता. तो घरांत रंगवित बसे. शेजारची लिली त्याच्या खोलींत यायची. रंगाला तिचें वेड. दोन तीन वर्षांची मुलगी. रंगा रंगा करित यायची. रंगा तिला चित्रें द्यायचा: तिला स्टुलावर बसवून तिचें चित्र काढायचा.

"ओहो माझें चित्र, आई हें बघ माझें चित्र."

"तूं भाऊला त्रास नको देऊं. काल त्याचे रंग सांडलेस ना?"

"मी चित्र काढित होतें. रंगा माझें चित्र काढतो, मी त्याचें काढीन. आपण रंगाचें चित्र येथें टांगूं हां आई."

"लिले, रंगा रंगा नाहीं म्हणायचें. काय म्हणायचें? भाऊ. भाऊ म्हणत जा हो."

"आई, रंगा तुझा भाऊ?"

"हो"

"म्हणजे माझे कोण?"

"मामा"

"मग मी मामा म्हणून हांक मारू?"

"भाऊच हाक गोड आहे."

"मी रंगालाच विचारीन कीं भाऊ म्हणूं की मामा म्हणूं ते."

अशी ही लिली मोठी गोड मुलगी होती. रंगाला कधीं वेळ असला म्हणजे तो तिला समुद्रावर फिरायला नेई. तिला समुद्राच्या लाटात नेई. तिच्याबरोबर तो शिंपले गोळा करी, तिला वाळूंत किल्ले बांधून देई, बोगदे खणून देई. आणि त्यांच्याकडे बघत बघत लिली एकदम ओरडून त्याच्यावर लाथ मारी नि सारें पाडी.

"लिले, हे काय?"

"वाळूंतले किल्ले वाळूंत गेले. आतां पुन्हां बाध. मोडले म्हणजे पुन्हां बांधतां येतात, नाही भाऊ?"

तिच्या बोलण्याचे रंगाला कौतुक वाटे. ती मुलगी सहज बोले. परंतु त्या मुलीच्या सहज बोलण्यांत त्याला अपार अर्थ दिसे. तो तिला एकदम उचलून घेई व तिचा पापा घेई.

"मला नाहीं आवडत पापा."

"कां ग लिले?"

"त्या तुझ्या मोरुदादानें माझा पापा घेतला नि थुंकी लागली माझ्या तोंडाला. मला नको पापा."

"मी चांगला नाहीं?"

"तू चांगला आहेस. मी घेऊं तुझा पापा?" असे म्हणून ती चिमुरडी पोर रंगाचा पापा घेई नि त्याचा हळूच चावा काढी.

"हें काय लिले?"

"पापा फुकट नसतो म्हटलं. आई म्हणते लिले पापा दे, तर मी कांहीं-तरी मागतें आधीं. मग पापा. रंगा, अरे तो बघ पक्षी, पांढरा पांढरा, पाण्यांत चोंच मारली त्यानें, तो बघ डुलतो आहे, भाऊ, बघ बघ."

"तूं मला रंगा म्हणालीस."

"पण लगेच पुन्हां भाऊ म्हटलें ना? आईनें त्या दिवशीं मला मारलें. भाऊ नाहीं म्हटलेंस तर बघ म्हणाली. तुझ्यासाठीं मला मार. मग भाऊच कां रे नाहीं नांव ठेवलें? रंगा नांव, म्हणायचें मात्र भाऊ."

"तूं बाबांना बाबा नाहीं का म्हणत?"

"त्यांचें नांवच बाबा. आई तर त्यांना कांहींच हांक मारीत नाहीं. मी लहान म्हणून त्यांना बाबा म्हणतें. भाऊ, आई काय रे हांक मारित असेल? मी विचारलें आईला, तर म्हणाली वेडी आहेस हो तूं लिले. भाऊ मी वेडी का रे?"

"तूं फार शहाणी"

"म्हणजे वाईट ना? मी नाहीं बोलत जा. फू तुझी गट्टी. भाऊ, फू गट्टी"

लिलीची आई रंगाला कधीं भाजी द्यायची, चटणी द्यायची. या मुलाचें, या तरुणाचें तिला कौतुक वाटे. रंगालाहि ताईची ओढ असे. लिली तर अक्षै रंगाच्या खोलींतच असायची. लिले, आतां घरीं जा, मला खोली बंद करायची आहे, असें शेवटीं तो म्हणे.

असे दिवस जात होते. एके दिवशीं रंगाला पत्र आलें. कोणाचें पत्र? तें पंढरीचें प्रेमळ पत्र होतें. तो पुण्याला मिलिटरी हिशेबखात्यांत मागेंच नोकरीला लागला होता. त्याची बदली एकदम पेशावरकडे झाली होती. तो लांब जाणार होता. मुंबईला येऊनच पुढें जायचें. रंगाकडे तो उतरणार होता.

"लिलीच्या आई, मला तुमचा पाटावरवंटा रात्रीं देऊन ठेवा बरं का."

"कशाला रे भाऊ?"

"मोठा बेत आहे. उद्यां लिलीला माझ्याकडे आमंत्रण."

"पुरणपोळी करणार आहेस वाटतें?"

"हो. पंढरीला फार आवडते. तो येणार आहे उद्यां. पेशावरला जायचा आहे. तो माझ्यासारखाच आहे. परंतु देवाच्या दयेनें मला काका, काकू, लिलीची आई, अशीं माणसें भेटतात. पंढरीला कोणी नाहीं."

"त्याला तूं आहेस. तुला येते पुरणपोळी?"

"हो. आईनें मला सारें शिकविलें आहे. किती छान पुरण भरतोस आई म्हणायची."

"मी देईन तुला करून."

"माझ्या मित्राला माझ्या हातची पुरणपोळी देण्यांत निराळीच गोडी आहे. नाहीं का लिलीच्या आई."

त्या दिवशीं रंगा मोठ्या पहांटे उठला. त्यानें पुरण शिजत ठेवलें. मित्र म्हणाले "रंगा, आज काय आहे?"

रंगा म्हणाला, मागून कळेल मित्र आपापल्या वर्गांना निघून गेले. लिलीचे वडील कामाला गेले. रंगा पुरणपोळ्या करूं लागला. लिलीच्या आईनें येऊन पाहिलें.

"भाऊ, तुला सारें येतें."

"आईची कृपा."

"भाऊ, दे ना रे पोळी. मला लागली भूक."

"लिले, घरीं चल. भाऊकडे मागून पोळी खा."

"मागून नको; आधीं खाईन."

"लिले, तुला नैवेद्य दाखवूं?"

"देवासारखा? आई नैवेद्य दाखवते नि स्वत:च दूध पिते."

"लिले, तूं जवळ असलीस तर तुला नाहीं का देत?"

"परंतु देवाला नाहींच ना? आई, देव आतां म्हातारा झाला असेल नाहीं? त्याला भूक नसेल लागत."

"लिले, हा घे नैवेद्य. लाग खायला."

पोळी खाऊन लिली गेली. रंगा स्टेशनवर गेला. आपल्या मित्राला घेऊन येणाऱ्या गाडीची तो वाट पहात होता. एकदांची गाडी आली. मित्र भेटले. गाडी करून दोघे घरीं आले, खोलीवर आले. पंढरीनें स्नान केलें. दोघे मित्र जेवायला बसले.

"रंगा, आतां आपण परत कधीं भेटूं?"

"पत्रानें वरचेवर भेटूं. तूं तिकडची वार्ता कळव, वर्णनें लिही. उंच पर्वत, बर्फाळ चमकदार शिखरें, द्राक्षांच्या बागा. आपला देश किती सुंदर, किती समृद्ध. या पेशावर भागांतच पूर्वी प्राचीन काळीं दोन अडीच हजार वर्षांपूर्वी

मोठें विद्यापीठ होतें. भगवान् पाणिनि तेथें शिकवित. शिकवतां शिकवतां वाघानें त्यांना खाल्लें. पंढरी, मी तो प्रसंग चितारला आहे. आमच्या मुख्य अध्यापकांना ते चित्र फार आवडलें. तूं मला तिकडची वर्णनें लिहून पाठव. मी चित्रें काढीन नि तुला पाठवीन."

"रंगा मला पुरणपोळी करून तिकडे पाठव पार्सल करून. बरं का तिकडच्या पठाण मित्रांना पोळी देईन ते मला द्राक्षं देतील"

"टोळीवाले तुला पळवून नेतील जप"

"मी सदैव बेफिकीर असतो."

रंगा पंढरीला पोचवायला गेला. मेलनें तो जाणार होता दोघे मित्र सद्गदित झाले होते. दोघे सम दुःखी दोघांना मायबाप नाहीं, सख्खें असें कोणी नाहीं. परंतु त्यांतल्यात्यात रंगा अधिक भाग्यवान होता. तो जाई तेथे त्याला प्रेमळ माणसें लाभत. प्रभु अनंत रूपानें त्याच्यासाठीं जणुं थांबून येई एका कवीचे ते चरण तो कधीं कधीं चित्र काढताना गुणगुणत असे :

"कशास चिन्ता करिशी उगीच
जिथें तिथें माय असे उभीच
मना कशाला करितोस खंत
जिथें तिथें हा भरला अनन्त ॥"

परंतु पंढरीला अशी प्रेमळ माणसें फारशीं लाभलीं नाहीत. त्याच्यावर प्रेम करणारा एक रंगाच होता.

गाडीची वेळ झाली.

"पंढरी, पत्रें पाठव. तूं उत्तरेकडे जात आहेस. वर जात आहेस"

"देव नाहीं रे अजून वर नेत!"

"त्या अर्थी तुला कांही तरी करायचें आहे. वेळ येईल तेव्हां तो सर्वांना नेईल. सुखी अस. मी तरी तुला आहें ना?"

पंढरी गाडींत बसला. सीमागाडी निघाली. हात सुटले नि डोळ्यांतून शतधारा सुटल्या. रंगा घरीं आला. पंढरी खिडकीबाहेर तोंड ठेवून डोळे रिकामे करून कोरडे करित होता.

कांहीं दिवस रंगा उदासीन होता. परंतु पुन्हां तो रंगांत रंगला, कामांत दंगला. मे महिना जवळ येत होता. परंतु रंगा काकांकडे दुधगांवला जाणार

नव्हता. मुंबईतच एका वर्गाला जाणार होता. दादरचा तो कलावर्ग फार सुंदर होता. ध्येयवादी कलावान् तेथे शिकवित. ग्रामीण जीवनावरची तेथें सुंदर चित्रें होतीं. समाजवादी जीवन आणि आजचें जीवन अशी दोन चित्रात्मक प्रदर्शनें त्या वर्गातर्फे एकदां मांडण्यांत आली. समाजवाद म्हणजे धर्मशून्यता नव्हे. समाजवाद म्हणजेच खरा मानवधर्म. त्या चित्रांतून हे फार सुंदर दाखविण्यांत आले होते. आजच्या जीवनातील रूढी, भेदाभेद, विषमता, अज्ञान, दारिद्र्य, उच्चनीच भाव, नाना प्रकार एका चित्रसंग्रहांत दाखवलेले; तर सर्वांना ज्ञान आहे, मानवधर्म आला आहे, सर्व निरोगी आहेत, आजारांत दवा मिळत आहे, ज्ञान-विज्ञान येत आहे, अशा अर्थाची चित्रे दुसऱ्या संग्रहांत. आणि मग प्रश्न विचारला होता की "खरा धर्म आजच्या समाजरचनेंत आहे कीं समाजवादी रचनेतच येईल?"

रंगाला ते प्रदर्शन फार आवडले. वासुकाका त्याला समाजवाद वगैरे सांगत असतच. परंतु आपली कला समाजवादाच्या निर्मितीसाठी कारणीं लावतां येईल असा त्याला आत्मविश्वास वाटला. त्याला एक नवीन दृष्टि आली. जणुं एक नवीन दालन उघडले, एक नवीन कप्पा उघडला.

सुटी होती. रंगा कधी वर्गाला जाई, कधीं घरीं असे. लिली येऊन बसे. लिलीची आईहि कधी कधी रंगनित बसे.

"भाऊ, मला शिकव रे चित्रे काढायला."

"ताई, एकदम कसे येईल?"

"मी हळुहळू शिकेन. तूं माझे चित्र पुरें केलेंस? कितीरे छान काढलें आहेस तूं."

"भाऊबीजेच्या दिवशी मी ते तुला ओवाळणी म्हणून घालीन. तोंपर्यंत तें माझ्या पेटींतच असूंदे. मधून मधून आणखी रंग भरीन, छाया दाखवीन. ताई, तुझी ती तसबीर मी तुला मढवून देईन. भाऊच्या हातची तसबीर. तूं ती भितीवर लाव. लिली बघत राहील. भाऊनें काढलेली आई असें म्हणेल."



## नवीन अनुभव : : : ८

मुंबईस एक खादीप्रदर्शन व्हायचें होतें. रंगाला निरनिराळे अनुभव घ्यायची हौस. त्या प्रदर्शनांत आपल्याला कांही काम करतां आलें तर किती चांगलें असें त्याच्या मनांत आलें. त्यानें ग्रामीण जीवनाचे कांही फलक तयार केले. खादी गरीब मायबहिणींना कसा आधार देत आहे तें त्याने कांही चित्रातून दाखविलें. तें पहा एक चित्र त्यानें चितारलें आहे. तो आंधळा आहे. परंतु चरख्यावर तो सूत कातता. भीक मागण्याऐवजीं स्वाभिमानपूर्वक भाकरी मिळवितो. ती एक मुसलमान अम्मा; ती जुन्या खानदान घराण्यांतील. परंतु घराला अवकळा आलेली. अम्माला तर रूढीमुळें बाहेर जातां येत नाहीं. शेतांत मजुरी करतां येत नाहीं, कारखान्यांत जातां येत नाहीं. परंतु तिच्या घरांत चरखा आला. तीं शिकली, तिच्या मुली शिकल्या. घरांत चार पैसे येऊं लागले. रंगा अनेक चित्रें रंगवीत होता. त्यानें ग्राम-गोकुळ म्हणून कांहीं चित्र-फलक तयार केले. एका चित्रांत गांवांतील सारे लोक एकत्र जमले आहेत, मुले मुली ऐक्याचा गोप विणीत आहेत असें दाखविलें. दुसऱ्या एका चित्रांत रानांत एकीकडे गुरें चरत आहेत तर दुसरीकडे गुराखी वर्तमानपत्र वाचित आहेत असें त्यानें दाखविलें. रात्रीच्या शाळेंत निरक्षर शिकत आहेत असें तिसरें चित्र होतें. एका चित्रांत सारा गांव स्वच्छतेच्या मोहिमेवर निघाला आहे असें होतें. चौथ्या एका चित्रांत महात्माजी मुरली वाजवीत आहेत आणि त्यांच्या पाठीमागून लहानथोर जात आहेत, नवयुग निर्मू बघत आहेत असें होतें. रंगा ध्येयसृष्टींत रमला होता. त्याला भान नव्हतें. तो दिवसरात्र तीं ग्रामोद्योगी ग्रामीण दृश्यें रंगवित बसे. देशबंधु दासांनीं एका व्याख्यानांत फारच सुंदर असें चित्र उभें केलें होतें. " तीं पहा आपलीं गजबजलेलीं जुनीं गांवें. पहांटे बाया दळीत

आहेत. गोड गीतें कानांवर येत आहेत. गांवांत दूधतूप भरपूर आहे. गायींचीं धष्टपुष्ट खिल्लारें आहेत. लोहाराचा भाता चालू आहे, हातमाग सटक सटक करित आहे. पंतोजी वडाच्या पारावर शिकवित आहे. रात्रीं रामायण वाचलें जात आहे. सभोंतीं ऐकायला लोक जमले आहेत. ती रामनवमी आली, गोकुळ अष्टमी आली. ते पहा रामलीलेचे नि कृष्णलीलेचे खेळ·आणि त्या पहा कुस्त्या. तो दाडपट्टा फिरवित आहे, तो लाठी खेळत आहे, तो मलखांबावर उड्या मारित आहे. आणि नागपंचमी आज. झाडाला दोर बांधून बायकाहि उंच झोंके घेत आहेत, गाणीं म्हणत आहेत. आनंद. मौज."

रंगासमोर तें व्याख्यान होतें. बापुकाकांनीं त्याला तें एकदां वाचून दाखविलें होतें. रंगा ग्रामीण जीवनांत नवीन रंग भरीत होता. तेथील अस्पृश्यता गेली आहे, भाऊबंदकी कमी झाली आहे, निरक्षरता जात आहे, नवे सुधारलेले ग्रामोद्योग येत आहेत, राष्ट्रीय भावना वाढत आहे, असें जीवन तो रंगवित होता.

एके दिवशी ते आपले चित्रफलक, तीं नाना चित्रें घेऊन प्रदर्शन-चालकांकडे तो गेला. तेथें त्याची आधीं दाद लागेना. परंतु ते पहा एक गृहस्थ. ठेंगणेसे आहेत. परंतु डोळ्यांत मधुरता नि करुणा आहे. मुखावर गंभीर प्रसन्नता आहे. रंगाजवळ ते थांबले ते त्या तरुणाजवळ बोलूं लागले :

" पाहूं तुमचीं चित्रें, आपण तिकडे बसूं चला." रंगाला घेऊन ते एका खोलींत गेले. रंगानें आपले फलक माडले, तीं चित्रें तेथें मांडलीं. आणि बापुसाहेब चकित झाले.

" फारच सुंदर " ते म्हणाले.

इतक्यांत तेथें आणखी मंडळी आली. तीं चित्रें पाहून जो तो मान डोलवूं लागला.

" प्रदर्शनांत हीं चित्रें लावावीं, हे फलक टांगावे. आपल्या व्याख्यानांनीं होणार नाहीं तें या रंगांनीं होईल. आम्हांलाहि अशा कल्पना सुचल्या नसत्या. तुम्ही का कोणत्या आश्रमांत होतां ? "

" नाहीं. "

" मग तुम्हांला हें खादीचें तत्त्वज्ञान कोणी शिकाविलें ? ग्रामीण जीवनाच्या अंतरंगांत कसे शिरलांत ? कोण तुमचा गुरु ? "

" वासुकाका. ते मला नवी दृष्टि देतात. आणि महात्माजी तर सर्वांनाच देत आहेत. ज्याला सहानुभूति आहे तो सारें लौकर शिकतो. त्याला सारें पटकन् समजतें."

" खरें आहे. आणि कलावानाचें हृदय जास्तीत जास्त सहानुभूतीनें भरलेलें असतें. इतरांना दिसत नाही तें त्याला त्याच्या भावनेचा दिवा दाखवतो. तुमचें नांव काय ?"

" रंगा "

" वा:, सुंदर नांव. आमचें प्रदर्शन मांडायला तुम्ही मदत करा. येत जा सध्यां तुम्हांला सुटीच आहे. आम्ही तुम्हांला कांही सन्मान्य देणगीहि देऊं "

" मी केवळ पैशांचा आशक नाहीं. मला नवी नवी दृष्टि येईल. माझी कला व्यापक नि खोल होईल. म्हणून मी ही जागा धुंडीत आलों. मी गरीब आहे मिळाली मदत तर हवीच."

" दरसाल राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचे वेळेस आम्ही प्रदर्शन भरवतो. तुम्ही तेथें येत जा. यंदां महाराष्ट्रांत खेड्यांत अधिवेशन व्हायचें आहे. फैजपूरला. तेथें शान्तिनिकेतनचे प्रख्यात कलावान् नंदलाल येणार आहेत. ते ग्रामीण वस्तूंतूनच सौंदर्यनगरी निर्माण करणार आहेत. रंगा, तुम्ही तेथे या. तुमची कला वाढेल, वाढत्या राष्ट्रीय आकांक्षांशी ती जोडली जाईल. कला म्हणजे दैवी वस्तु. कलेची हांक हृदयाला जाऊन पटकन् पोंचते. देवाचे तुम्ही आवडते लोक."

" मला तेथें कोण येऊं देईल ? "

" आम्हीं आहोंत ना ? आतां ओळख होईल ती वाढतच जाईल "

रंगा प्रदर्शनांत काम करूं लागला. मांडामांड कशी करावी, कोठलें चित्र कोठें टांगावें, कोठला फलक कोठें शोभेल, तें तो सांगे. पुन्हां रागवत नसे. समजून देई. रंगा सर्वांचा आवडता झाला.

परंतु त्याला कामाचा ताण फार पडला. तो थकला. प्रदर्शन संपलें. त्याला प्रशस्तिपत्रें मिळालीं. कांहीं सन्मान्य वेतनहि मिळालें. ओळखी झाल्या. परंतु तो आजारी पडला. खोलींत पडून राहिला. अजून थोडी सुटी होती. खोलींतील इतर मुलें आलीं नव्हतीं. रंगा एकटाच होता. तो रंगवायला बसे. परंतु पाठ दुखूं लागे. तो आंथरुणावर पडे.

" रंगा काय होतें ?" शेजारच्या ताईनें येऊन विचारले.

" बरें नाहीं वाटत. थकवा वाटतो."

" तूं रात्रंदिवस काम करित असस. मी सांगत होते इतकें नको करूं काम. मध्यें कांही दिवस तर दिवसरात्र तिकडेच असस मी म्हणें गेला तरी कुठें. आतां विश्रांति घे. स्वयंपाक नको करूं. मी देत जाईन जेवायला. चार दिवस तूं आम्हांला जड नाहीस. आणि बहिणीला भावाचे का कधीं ओझें वाटतें रंगा ?"

ताईनें रंगाची खोली झाडली. तेथलीं भांडीं वगैरे स्वच्छ करून ठेवलीं. ती त्याच्याजवळ बसली होती. त्याचें डोकें थोपटीत होती.

" आई, भाऊला बरें नाहीं ?"

" होय बाळ. भाऊला त्रास नको देऊ"

" आता भाऊचा ब्रश घेऊन मीच चित्र काढीन. भाऊचेच चित्र काढीन."

" किती बोलशील ग."

" मी बोललें म्हणजे भाऊला बरें वाटतें. परवां मी बोलत नव्हते, रागावलें होते. तर भाऊ कसे म्हणे बोल बोल, एक शब्द बोल. आणि मला खुदकन् हंसूं आलें."

" खुदकन् म्हणजे ग काय ?"

" मला काय माहीत ? तुम्हीच तर म्हणतां."

अमृतराव घरीं आले. कपडे काढून ते रंगाच्या खोलींत आले. ताई तेथें बसलेली होती. रंगाला थोपटीत होती. लिली कांहीं तरी रंगकाम करित होती. अमृतरावांनीं तेथील दृश्य पाहिलें. ताई उठली नि आपल्या खोलींत गेली. तिनें स्टोव्ह पेटवला. पटकन् चहा करून पतीला नेऊन दिला.

" मला नको चहा "

" घ्या ना. तुम्ही आलांत मला कळलेंहि नाहीं."

" कशाला कळेल ? रंगाजवळ बसलें म्हणजे थोडेच कांहीं कळणार आहे ? तुला लाज वाटत नाहीं. बेशरम. येथें राहयचें नाहीं याच्यापुढें. बिऱ्हाड बदलायचें. माझ्या संसारांत साप शिरत आहे. मला थोडथोडें वाटूं लागलेंच होते. तरी म्हटलें हा सुटींत गेला कसा नाहीं ? आणि आतां आजाराचें सोंग. सारे रंग मला समजतात. कलावंतांचे हे नमुने. ते कलावान् आणि तूं कलावती. उचल तो चहा. खबरदार त्याच्या खोलींत जाशील तर ? लिलीला हि जाऊं देऊं नकोस. मी उद्यां दुसरीकडे जागा बघतों. येथें राहणेंच नको."

अमृतराव विष वमत होते. बिचारी ताई गाईप्रमाणें कावरी बावरी झाली. ती तेथें खिळल्याप्रमाणें उभी राहिली. ती थरथरत होती. ती पडेल, कोलमडेल असें वाटलें. परंतु ती स्वयंपाक घरांत जाऊन रडत बसली.

" आई, रडूं नको. बाबा रागावले होय ना ? मी बाबांना मार देईन. "

" कुणाला मार देणार आहेस, बोल पुन्हां " पित्यानें त्या मुलीच्या कोमल गालांवर भराभरा चापट्या मारल्या.

" नका मारूं तिला, मला मारा. "

" दोघांना मारतों. "

तिकडून रंगा धावून आला. त्यानें लिलीला उचललें.

" ठेवा खालीं तिला. "

" तुम्ही का पशु आहांत ? त्या मुलीला किती मारलेंत ? "

" पशु तुम्ही, दुसऱ्याच्या मुखांत विष कालवणारे. साप तुम्ही साप. खोलींतून बाहेर निघा. माझ्या मुलीचें मी वाटेल तें करीन. " त्यानें लिलीला ओढून घेतलें. ती भाऊभाऊ म्हणून ओरडूं लागली. "पुन्हां भाऊ म्हणशील तर बघ, डाग देईन तोंडाला " त्या खवळलेल्या पित्यानें त्या लहान मुलीला बजावलें. फुलांवर निखारे ओतावे त्याप्रमाणें तो बोलत होता. रंगा खोलींत गेला. त्याला या अनुभवांची कल्पनाहि नव्हती. तो स्वप्नसृष्टींत रमणारा. संसारांतील या कुरूपतेकडे त्याचें लक्ष कधीं गेलें नव्हतें. आज त्याला आपला सारा आनंद अस्तास गेल्याप्रमाणें वाटलें. निरागसता, निष्पापता म्हणून जगांत नाहींच का ? जगांत संशय, सूड, दुष्टावा, अहंकार यांचेंच का सर्वत्र राज्य ?

रात्रीं त्याला झोंप आली नाहीं. त्याची ताईहि तळमळत होती. लिली झोंपेंत भाऊ भाऊ म्हणत होती.

सकाळ झाली. अमृतराव बाहेर पडले. आणि ते कोठेंतरी नवीन जागा ठरवून आले.

" आजच बिऱ्हाड मोडायचें. येथें आज स्वयंपाक नाहीं करायचा. बांधाबांध कर. आंवराआंवर कर. बघतेस काय ? "

आंवराआंवर सुरू झाली. रंगानें लिलीला दिलेलीं चित्रें, तीं सारीं ट्रंकांप्यांत आलीं. लिली रडत होती. भाऊनें दिलेलें चित्र ती म्हणे. तिला थप्पड मिळे. रंगा शून्य मनानें बसला होता.

मोटार लॉरी आली. सारें सामान तिच्यांत चढवण्यांत आलें. अमृतराव पत्नी नि मुलगी घेऊन निघाले. ताई भाऊजवळ एक शब्द बोलूं शकली नाहीं. लिली भाऊजवळ आऊं शकली नाहीं. रंगा खोलींत दुःखगंभीर होऊन बसला होता. मोटार गेली. शेजारच्या खोलीकडे रंगानें शून्य दृष्टीनें पाहिलें. त्याचे अश्रु आतां धांवून आले. त्याला ताईच्या, तिच्या त्या अल्लड खेळकर लहान मुलीच्या शतस्मृति आल्या. आणि अमृतराव ताईला छळतील का, लिलीनें भाऊ म्हणून आठवण काढताच तिला मारतील का, असे विचार त्याच्या मनांत आले. काय हें जग ! किती हे संशय ! आपणच दुर्दैवी असें त्याला वाटले. मी जेथें जाईन तेथें कोणाचें भलें व्हायचें नाहीं. तो मनात म्हणाला.

रंगा कांहीं करूं शकत नव्हता. त्याचें मन कशांतच रमेना, रंगेना. त्याची स्फूर्ति, प्रतिभा सारी संपली जणूं. सायंकाळ झाली. तो बापूसाहेबांकडे गेला. त्यानें त्यांना सारी हकीगत सांगितली. त्यांनीं त्याला धीर दिला. " जगांत हे असे प्रसंग येतातच. अशावेळेसहि शांत मनानें आपण राहिलें पाहिजे. पुष्कळ-वेळां ताईभाऊ म्हणतां म्हणतां निराळीच नातीं उत्पन्न होतात, असें नाहीं का अनुभवाला येत ? त्या अमृतरावांना तसें का वाटूं नये ? आपल्याला आपला तरी भरंवसा आहे का ? आपण आहोंत का मनाचे स्वामी, इंद्रियांचे स्वामी ? आपण घसरणारीं माणसें. तुकारामांनीं म्हटले आहे :

इंद्रियांचीं दीनें । आम्ही केलों नारायणें ॥

इंद्रियांच्या हातांतील आपण खेळणीं असतों. खरें ना ? म्हणून शान्त हो. ताईची निष्पाप स्मृति जवळ ठेव आणि कामाला लाग. तूं फैजपूरच्या राष्ट्रीय सभेच्या प्रदर्शनासाठीं येणार आहेस ना ? कांहीं दिवसांची रजा घ्यावी लागेल. श्री नंदलाल तुला भेटतील. भारतांतील थोर देशसेवक बघशील. खेड्यांत भरणारें पहिलें अधिवेशन. रंगा ये बरें का प्रदर्शनाची मांडा मांड करायला."

बापूसाहेब त्याच्याजवळ बोलत होते. त्याला शान्त करित होते. रंगा आज जेवलेला नव्हता. तो आज तेथेंच राहिला. रात्रीं जेवला तेथेंच झोंपला. सकाळीं जरा शान्त होऊन तो आपल्या खोलीवर गेला. जगाचे नानाविध अनुभव घेत बाळ रंगाच्या जीवनाला गंभीर रंग चढत होता.



# नंदलालांच्याजवळ : : ९

नाताळांत अधिवेशन भरणार होतें. पावसाळयांतच कामाला सुरुवात झाली. खान्देशांतील स्वयंसेवक गावोगाव जाऊन प्रचार करूं लागले. त्या बघा खान्देशांतील राष्ट्रप्रेमाने उचंबळणाऱ्या तरुण मुली. कांहींचे विवाह झालेले आहेत, कांहींचे नाही. हातांत झेंडे घेऊन, गाणीं गात गांवन गांव जागा करित जात आहेत. त्यांच्या पायांत पादत्राणें नाहींत. कां बरें ? भारतमातेचा संदेश पोंचवण्याचें पवित्र काम होतें तें. ती जणुं थोर यात्रा होती. पायांत कसें घालायचें ? त्या तरुणींच्या पायांना फोड आले. कांहींनीं चिंध्या गुंडाळल्या. आणि प्रचार चालू ठेवला. परंतु दुसरेच प्रश्न उभे राहिले. ज्या मुलींचीं लग्नें झालेलीं होती, त्यांच्या पतिराजांकडून खरमरीत पत्रें येऊं लागलीं. परंतु त्या मुली ऐकत ना. "हें राष्ट्राचें कार्य आहे. फैजपूरचें फजितपूर होतां कामा नये. या खेड्यांतील अधिवेशनास लोक येतील कीं नाहीं याची शहरी लोकांस शंका आहे. आम्हीं जनतेंत, चला चला, अधिवेशनाला चला, म्हणून प्रचाराचा पाऊस पाडला पाहिजे. अधिवेशन यशस्वी झाल्यावरच आम्ही घरीं येऊं." अशीं पत्रें त्या तरुण मुलींनीं आपापल्या पतींना लिहिलीं. कांहीं यजमानांनीं सोडचिठ्ठी दिली. मुली डगमगल्या नाहींत. त्या म्हणाल्या "दुसरा राष्ट्रप्रेमी कोणी आम्हांला वरील. न कोणी भेटला तर राष्ट्राची सेवा करित संन्यासिनी म्हणून राहूं." त्या तरुणींचा निर्धार, त्यांचें तें तेज अपूर्व होतें. पुन्हां त्या मुली फार शिकल्यासवरलेल्या नव्हत्या. पदवीधर नव्हत्या. परंतु म्हणूनच त्यांचा आत्मा अधिक निर्मळ होता.

पाऊस पडेना. शेतें कोरडीं. पीक जळून जाऊं लागलें. राष्ट्रसभेचा द्वेष करणारे म्हणूं लागले "या काँग्रेसचे पांढरे पाय येथें आले म्हणून पावसानें दिला पुकारा." वाटेल त्यानें वाटेल तें बोलावें. सरकार धार्जिण्या श्रीमंतांना खेड्या-

पाड्यांतून निर्भयतेचें, नव विचाराचे वातावरण जाणें नको होतें. त्यांनीं अधिवेशनाला जागा मिळूनये म्हणून खटपटी केल्या. विहिरींचे पाणी दोषी व्हावें व सरकारी परवानगी मिळूं नये म्हणून डुकरें मारून पाण्यात टाकलीं. पाणीच पुरणार नाहीं लाखों लोकांना म्हणून शंका निघाल्या. परंतु ती पहा एक धीर-गंभीर विहार. रात्रंदिवस इंजिन लावून पाणी उपसण्यात येत आहे. परंतु तें कमी होत नाहीं. अपार पाणी. विनोबाजींनी त्या विहिरीचे नाव सत्त्वशीला असें ठेवलें त्या अडचणींत सर्वांना धीर द्यायला विनोबाजी वर्धा सोडून तेथें येऊन राहिले आणि पाऊसहि आला. परंतु इतका आला कीं शेतांतून पाणीच पाणी मंडपाचे, शहर-रचनेचे सामान तरंगू लागले. आतां हें पाणी कधीं वाळणार ? केलेले सारे काम पाण्यात गेलें परंतु पावसामुळे फायदा झाला. धूळ घट्ट दगडासारखी बसली. पुन्हा काम सुरू झालें. मोठे मोठे पुढारीहि बसल्या, वारे उचलित आहेत. नवीन स्फूर्ति, नवा जोम राष्ट्रसभेचे नगर उभें राहूं लागले. ते पहा हजारो बांबू येऊन पडले आहेत त्या बांबूंतून भव्य नगर उभें करायचें होतें

त्या झाडाखालीं कोणाची ती मूर्ति ? साधी मूर्ति. तेच नंदलाल. रवीन्द्र-नाथांच्या विश्वभारतींतील महान् कलाकार. ते सूचना देत आहेत, नकाशा करित आहेत. शेकडो बुरूड कामाला लागले आहेत. बांबूच्या झिलप्या काढून सुंदर वस्तु विणीत आहेत. आणि तिकडे नगर, गोपूर उभे राहत आहे. भारतीय नि ब्रम्ही सौंदर्याचे तेथे मिश्रण होतें चीनमध्ये, ब्रम्हदेशात मोठमोठ्या गोपुरांचे जसे प्रकार असतात, त्यांची छटा त्या नगर रचनेत दिसत होती.

" रंगा, तूं आतां जा. दमलास " नंदलाल म्हणाले.

" तुमच्याजवळ काम करतांना कोण दमेल ? मी काम करतां करतां किती तरी मिळवित आहे. ग्रामीण वस्तु घेऊनच तुम्ही सौंदर्य–समुद्र निर्माण करित आहांत. तुम्ही परवां म्हणालांत की कला सर्वांच्या जीवनांत आहे. परंतु असें कोठें येतें प्रत्ययास ? "

" रंगा, कलेचा शेवटीं अर्थ काय ? कला आनंद देते. कला परिस्थितीवर स्वार होते. अरे एखादा गरीब मनुष्य घे. तो गरीब असला तरी कुडाच्या भिंतींना गेरूचा रंग देईल. त्या शेणानें सुंदर सारवील. घरासमोर चार झेंडूचीं फुलझाडें लावील. घरांतील मडकींच, परंतु त्यांना पांढरा तांबडा रंग देईल. त्या

दारिद्र्यांतहि कलेनें तो सुंदरता आणतो. आपल्या बायका अंगण सारवतात. मग तेथें कमळ, तारे, चंद्र, सूर्य काढतात. याचा अर्थ काय? ती गरीब स्त्री म्हणते "स्वर्ग माझ्या अंगणांत आहे. ते चंद्रसूर्य येथें आहेत. तीं कमळें, ते तारे—सारें सौंदर्य माझ्या या झोपडीसमोर आहे" रंगा, आणि खरें सांगू का मानवांतील कलात्मता प्रकट व्हायला त्याला फुरसतहि हवी. मनुष्याला निरनिराळे आनंद का नको असतात? सर्वांत मोठा आनंद नवनिर्मितीचा असतो. परंतु सारी जनता कांही तरी नवीन निर्मित आहे असें कधीं होईल?"

"समाजरचनाच बदलेल तेव्हा. माझे वामुकाका एकदां असेंच म्हणाले होते. आजची कला ही मूठभर लोकांची. आजची संस्कृतिहि मूठभर लोकांची. श्रमणारी सर्व जनता का कलाविकासांत भाग घेत आहे? त्यांना ते आनंद जणूं माहीतच नाहीत. म्हणून त्यांची सारी शक्ति दोनच गोष्टी निर्माण करण्यांत जाते. श्रम करणें आणि मुलें निर्माण करणें. मुलें ही त्यांची जणूं कलाकृति. ही कलाकृति तुच्छ नाही. सुंदर मूल जगाला देणें ही थोर सेवा आहे. शेतें हिरवींगार करणारा आणि राष्ट्राला मुलें देणारा शेतकरी हाहि कलावानच आहे. परंतु त्याला इतर आनंद मिळाले असते तर? त्याची सर्जनशक्ति त्यांत खर्च झाली असती. त्यानें साहित्य निर्माण केलें असतें. त्यानें संगीताचा अभ्यास केला असता. त्यानें दुर्बीण घेऊन आकाशाकडे पाहिलें असतें. तो शास्त्रसंशोधन करता. मनुष्याची सर्जनशक्ति या अशा अनेक नादांत रंगली म्हणजे मग मुलाबाळांचे लेंढारहि कमी होईल. कारण सर्जनशक्तीला अन्यत्र वाव मिळेल. मी मनांत येईल तें बोलत आहें. परंतु माझ्या मनांत असे विचार येत असतात."

"असाच विचार करणारा हो. परंतु रंगा असें नको समजू कीं श्रमणाऱ्यांजवळ संस्कृति नाहीं. त्यांच्याजवळ सुंदर नाच असतात, सुंदर लोकगीतें असतात. भजनी मंडळें असतात. बांबूची बांसरी वाजवून सारें रान नादमय करतात. संस्कृति म्हणजे केवळ सुखविलास नव्हे. दहा सुखांची यादी नव्हे. शेतकऱ्याजवळ प्रेम असतें, आतिथ्य असतें; तो सुसंस्कृत नाहीं असें कसें म्हणतां येईल? नवीन साधनें त्यांच्या झोंपडीपर्यंत जाऊं नयेत असें नाहीं माझें म्हणणें. परंतु आपण व्यापक दृष्टीनें विचार करायला हवा. मी तर मानतों कीं त्याला अधिक विश्रांति नि फुरसुत मिळायला हवींत. गुरुदेव म्हणायचे कीं सारी संस्कृति फुरसुतीच्या वेळेस निर्माण होते. पोटापाण्याचे उद्योगच रात्रंदिवस करावे लागणार असतील

तर संस्कृतिसंवर्धनासाठीं कोठला वेळ ? आजच्या संशोधनाचा, आजच्या साधनाचा, विवेकाचा उपयोग जर आपण केला तर कामाचे तास कमी करता येतील आणि श्रमणारी जनता अधिक विश्रांति मिळून त्या विश्रांतीच्या वेळाचा उपयोग करून नव संस्कृति निर्माण करण्यात भाग घेईल. तिच्यांतून कवि, चित्रकार, संगीतज्ञ, शास्त्रज्ञ निघतील. अलौकिक देणगी ही एखाद्यालाच असते. परंतु आजूबाजूला सारे वातावरणच संस्कृतिनिर्मितीचे असले म्हणजे त्यातूनच अलौकिक सर्जनकार निर्माण होतात."

रंगा नंदलालांच्या मुखाकडे बघत होता.

"जा आता नंदा, तुमच्या खान्देशची केळी खा. आणि मला काय आणणार ?"

"चिनी बदाम !"

"अरे लबाडा, चिनी बदाम आमचा बंगाली शब्द घेतलास. शेंगा म्हणना. शेंगा भाजून आण. बंगालमध्ये शेंगा नाहीत. तुमचा हा खान्देशी मेवा आहे."

"बंगालमध्ये कमळें आहेत, विशाल नद्या आहेत. आणि तुम्ही आहात, गुरुदेव आहेत."

"रंगा तू चित्रकार आहेस, कविहि आहेस."

"दोघांची वृत्ति एकच नसते का ? एक मुके चित्र काढतो, एक बोलकें. तुमच्या वंगभूमीचे गाणें म्हणूं ?

नमो वंगभूमि ॥
श्यामांगिनि युगे युगे । जननी वो कापालीनी
नमो वंगभूमि ॥

"रंगा, प्रियतम वंगभूमीचे स्मरण होतांच माझें हृदय उचंबळते. परंतु आतां साऱ्या भारताचा मी होत आहे. येथीलहि सृष्टिसौंदर्य पाहून मी आनंदित होतो. ज्या खान्देशने अजिंठा दिला, ज्या महाराष्ट्रानें वेरूळ, कार्ला, घारापुरी ही अमर लेणीं दिली, त्या महाराष्ट्राला प्रणाम. रंगा, आपण सारे भारताचे. सारे प्रान्त जणूं भाऊ भाऊ. आपण एकमेकांचे घेऊं, आनंद निर्मूं. आपले हृदय एकच आहे. तोच अद्वैताचा घोष साऱ्या भारतवर्षाच्या जीवनात आहे, साहित्यांत आहे. रंगा, जा ना रे. शेंगा आण भाजून. मला भूक लागली."

"मला तुमच्या शब्दांची भूक आहे. असे उपनिषद् कधी कोणत्या झाडाखालीं पुन्हां ऐकूं ?"

"विश्वभारतीत ये नि माझ्याजवळ रहा. रंगाचे रंग खुलवीन. येशील ?"

" येऊं ? मी गरीब आहे "

" देवाची देणगी असलेला तूं श्रीमंत आहेस. ये मला आनंद होईल. दोनचार महिने तरी ये. " रंगा सद्गदित होऊन निघून गेला. केळीं, भाजलेल्या शेंगा घेऊन तो आला. कढत दूधहि होते.

" रंगा, तुमच्याकडे गायीचे दूध नाही. बंगालमध्ये म्हशीचे दूध पिणे निषिद्ध मानतात. "

" तुमच्यासाठीं मी गायीचेच आणीत असतो "

" ते खरें रे "

थोड्या वेळाने रंगा गेला. आतां अधिवेशनाला फार दिवस नव्हते रात्रं-दिवस काम होते. सारे नगर उभे राहिले. अपूर्व असे ते साधे सौंदर्य होते. आज पंडितजी यायचे. त्यांची मिरवणूक होती. त्या पहा हजारों स्त्रिया दुतर्फा उभ्या आहेत, हात जोडीत आहेत. पंडितजींनी रथातून खाली उडी मारली त्यांनीं मायभगिनींना वंदन केले.

झेंडावंदनाचा दिवस उजाडला. सारे मैदान माणसांनी फुलून गेले होते गांवा-गांव हिंडत ती ध्वज-ज्योतिहि आली. पंडितजींच्या हातीं देण्यांत आली. आता ध्वज फडकायचा. पंडितजी दोरी खेचित आहेत परंतु दोरी तुटली ! आतां ? इतक्या उंच कोण पुन्हां नेणार दोरी ? ७५ फूट उंच तो स्तंभ ! वर वेताच्या काठीसारखा बारीक होत गेलेला. कोण चढेल, कोण तोल सांभाळील ? एक दोघे चढले परंतु उतरले. परंतु तो पहा शिरपूरचा रजपूत वीर किसनसिंग तो चढला वर. लाखों डोळे त्याच्याकडे होते. भारताचे जणूं भाग्य वर चढत होतें. त्यानें कप्पींत पुन्हां दोर अडकवला नि वीर खालीं आला. टाळयांचा कडकडाट थांबेना. जवाहरलालजींनीं त्याला हृदयाशीं धरलें, शंभर रुपये हातीं ठेवले. त्या बाळाला आज केवढा धन्यता वाटला असेल ! फैजपूरची फजीती न होतां फत्ते झाली. महाराष्ट्राची तेथें कसोटी होत होती.

आज रंगा लौकर उठला. आज गांधीजी सरहद्दगांधींसह आजूबाजूच्या खेड्यां-मध्यें पायींच हिंडायला जाणार होते. स्वयंसेवक रस्ता साफ करित होते. रंगा-नेंहि आज प्रेमानें हातांत झाडू घेतला. महापुरुषांना जाण्यासाठीं रस्ता स्वच्छ कर-ण्यांत त्याला परम आनंद होत होता. कुंचला धरणारा रंगाचा हात आज केरसुणी घेऊन सौंदर्य निर्मित होता, स्वच्छता फुलवीत होता.

त्या पहा दोन अलौकिक विभूति आल्या. सभोंती मुलाबाळांची गर्दी. बादशहा खान आणि महात्माजी. जणूं पृथ्वीवर उतरलेले चंद्रसूर्य, हरिहरांची जणुं जोडी. एक उंच धिप्पाड, एक कृश लहान. परंतु दोघांचें आंत हृदय एकच.

रंगा दुरून त्यांच्याकडे बघत होता. त्याचे डोळे भरून आले. भारताच्या त्या पुण्याईला, त्यागतपश्चर्येला, त्या महान् सेवेला त्यानें भक्तिमय प्रणाम केला.

अधिवेशन संपलें. पुढारी जाऊं लागले. थर्डी मी म्हणत होती. सारा पसारा लौकर आवरण्यांत आला. आज नंदलाल जाणार होते. रंगा त्यांच्या पायां पडला.

"ये माझ्याकडे. मी वाट बघेन."

"ही तुमची शाल."

"अजून थंडी आहे. तुला असूं दे. तूं अशक्त आहेस. रंगा प्रकृतीला जप. जगांत अपार दुःख आहे म्हणून चिंता नको करू. आपल्याला देतां येईल तो आनंदाचा कण आपण द्यावा. खरें ना." नंदलालांनीं रंगाला जवळ घेतलें. त्याच्या मुखाचें त्यांनीं अवघ्राण केलें. गेले. ते साधे थोर कलावान् गेले. किती साधे! झाडाखालीं बसत. शेंगा चार खात. सत्य साधेंच असतें. नाहीं का?

रंगा मुंबईस नाहीं गेला. मुंबईस जायला त्याचे मन तयार नव्हतें. त्याला ताईची, लिलीची आठवण येई. तो दुधगावला गेला. सुनंदा, वासुकाका यांना त्यानें सारे अनुभव सांगितले.

"रंगा, तूं भाग्याचा. थोरामोठ्यांना पाहिलेंस."

"काका, नंदलालांनी मला तिकडे बोलावलें आहे."

"तर जा."

"मुंबईचें शिकणे?"

"तूं का परीक्षेसाठी शिकत आहेस? नंदलालांच्या चरणापाशीं बसून शिकलास हें केवढें प्रशस्तिपत्र होईल. मी तुला पैसे पाठवीन. शिकवण्या करीन, कांहीं करीन. तूं जा. संधि गमावूं नकोस."

"मुंबईचें सामान घेऊन येऊं?"

"हो. मग कधी जायचें तें ठरवूं. ये निघून मुंबईहून. तुला मानवतहि नाहीं ती मुंबई."



# निष्ठुर दैव : : : १०

रंगा मुंबईस आला. त्याला तेथें शून्य वाटत असे. शेजारच्या खोलीत दुसरें बिऱ्हाड आलें होतें. कोठें आहे ताई, कोठें आहे लिली? ताईनें मला पत्र कां पाठवूं नये, पत्ता कां कळवूं नये? परंतु पतीनें माझा अपमान केला तर? तेथें त्यानें तमाशा मांडला तर? माझी ताई संयमी, सहनशील, विवेकी आहे. नाहींतर पत्र पाठवल्यावांचून ती राहती ना. त्याच्या ट्रंकेंत ताईला भाऊबीजेच्या दिवशीं देण्यासाठीं म्हणून काढलेलें तिचें चित्र होतें. परंतु दिवाळी भाऊबीज फैजपूरच्या नगररचनेंतच गेली. आता मनांत भाऊबीज. मनांतच ताईला भेटायचें, ओवाळायचें.

एके दिवशीं रंगा बापूसाहेबांकडे गेला.

"बरेच दिवसांनी आलास रे. कॉंग्रेसच्या प्रदर्शनांतील कामामुळे थकलास. खरें ना? घरीं राहून आलास."

"हो, घरीं होतों चार दिवस. मी आतां विश्वभारतींत जाणार आहें. येथलें सारें सामान नेण्यासाठीं व तुम्हां सर्वांचा प्रेमळ निरोप घेण्यासाठीं म्हणून आलों. तुमचें, आईचें माझ्यावर किती प्रेम. तुम्ही धीर दिलात, सारें दिलेंत.

"तुम्हि देव दिला दिवा दिला
तुम्हि मातें हितपंथ दाविला
करुणा विसरेन का असा
उतराई प्रभु होउं मी कसा"

असे चरण म्हणून रंगा सद्गदित झाला. गंभीर वृत्तीचे बापूसाहेब परंतु तेहि गहिंवरले.

"रंगा, कोठले रे हे चरण, कोणाची कविता?"

"वासुकाकाच्या तोंडूनच मी ऐकले होते. ते हे चरण पुष्कळदा गुणगुणतात."

"सुरेख आहेत"

"मलाहि आवडतात. खरेच बापू, तुम्ही मला हे सारें दिले जो दिवा विझणार नाहीं असा ध्येयवादाचा दिवा मला तुम्ही दिला आहे. ज्याला जीवनाचें ध्येय मिळाले त्याला देव मिळालाच"

"रंगा, देव या शब्दाचा अर्थ प्रकाशणे असाच आहे. प्रकाशमय व्यक्ति म्हणजे देव ज्याना जीवनाच्या पथावर प्रकाश दिसत आहे, ज्याच्या दृष्टीसमोर नैराश्याचे धुकें नाहीं, अंधार नाहीं, ते देवच त्याना देव मिळाला देवमय ते झाले."

रंगा आंतल्या खोलीत जाऊन आईजवळ बोलत बसला. त्यांनीं त्याला खायला दिले शेवटीं सर्वाचा निरोप घेऊन तो निघाला.

"रंगा, पत्र पाठवित जा. विश्वभारतींत तूं जाणार मोठा हो. भारताची कीर्ति दिगंतात नेणारा थोर चित्रकार हो"

"तुमचे आशीर्वाद मला तारतील, मोठा करतील." रंगा गेला. बापुसाहेब पत्नीला म्हणाले "किती निर्मळ व उदार वृत्तीचा प्रेमळ मुलगा!"

मुंबईहून सारे सामान घेऊन रंगा दुधगावला आला. मुंबईस त्याचें लक्षच लागत नव्हतें ताई व लिली याची त्याला आठवण यायची. नाहीं तर दोनतीन महिन्यांनी एक परीक्षा आणखी झाली असती. परंतु परीक्षेकडे त्याचें लक्ष नव्हते. तो घरी आला दोन महिन्यांनी विश्वभारतींत जायचे या विचारानें तो मस्त होता.

तो वासुकाकांजवळ होता. दोन महिन्यांनीं लांब जाणार होता. वासुकाका सकाळीं, रात्रीं शिकवण्या करित. रंगाला पुढे पैसे लागतील. त्याची ते तरतूद करित होते. परीक्षा झाल्या. शाळांना सुट्या लागल्या वासुकाकाहि आतां घरींच असत. ते रंगाला भारतीय इतिहासांतील अनेक प्रसंग रंगवायला सांगत. ध्येयवादी भारत म्हणून एक चित्रसंग्रह पुढे तूं कर असे ते म्हणत. प्राचीन काळापासून, ध्रुव प्रल्हादांच्या काळापासून तों आतांच्या काळापर्यंतचे शेपन्नास उदात्त प्रसंग त्यानीं त्याला सांगितले. रात्र झाली म्हणजे वासुकाका, सुनंदा, रंगा वरतीं गच्चींत बसत. आणि वासुकाका त्या थोर गोष्टी शब्दांनी रंगवून सांगत. जणूं तीं

भारतीय संस्कृतीवरचीं प्रवचनें होतीं. रंगा रंगून जाई. ते अनेक प्रसंग वर्णिलेले ऐकतांना तो रोमांचित होई.

आनंदांत दिवस जात होते. परंतु प्रभूच्या मनांत निराळेंच होतें. या विश्वरचनेंतील त्याच्या योजना कोणाला कळणार ? वासुकाका आजारी पडले. भयंकर उन्हाळा होत होता. एक उष्णतेची लाट त्या टापूंत येऊन गेली. परंतु तो उष्णतेचा प्रहार नव्हता. त्यांना ताप आला नि ते निपचित पडून राहिले. मानेच्या पाठीमागचा भाग दुखे. डोकें दुखे. स्मृति नाहीं असें वाटे. तो मेंदूचा ताप ठरला. गंभीर दुखणें.

" दुधगांवच्या डॉक्टरांनीं उपाय चालविले. परंतु यश येईल असें वाटेना. वासुकाकांनीं खरी परिस्थिति ओळखली.

" रंगा, तुला आतां देवाचा आधार. सुनंदाला तूं आहेस. तुझी आईच ती. मोठा हो. ध्येय कधीं सोडूं नको. "

" असा कसा तुमचा तो देव ?"

" तो देव तुझा नाहीं का ? अरे आपण मानव स्वतःला फार मोठें समजतों. आणि मानवाचें मरण म्हणजे गंभीर घटना समजतों. परंतु तुम्हां आम्हांला पायाखालीं मुंग्या चिरडल्या जातात, त्याचें कांहीं वाटतें ? केरसुणी घेतों. झुरळें, मुंग्या, ढेंकूण, मुंगळे सारें झटकतों, झाडतों. आपल्याला त्याचें कांहीं वाटत नाहीं. तुम्ही आम्ही जीवजंतूला महत्त्व देतों त्यापेक्षां अधिक महत्त्व देवानें तुम्हां आम्हांस कां बरें द्यावें ? या विराट् विश्वाकडे पाहिलें म्हणजे मुंगी इतकें तरी महत्त्व आहे का आपल्याला ? देव माना किंवा मानूं नका. परंतु मरणाला इतकें महत्त्व देऊं नये. कर्तव्य करावें. निघून जावें वेळ येईल तेव्हां. बाळ, तुझ्याबद्दलच्या माझ्या केवढाल्या आशा ! परंतु आतां कोण मदत करील ? विश्व-भारतींत कसा जाशील ? हिचेंच पालनपोषण आतां तुला करावें लागेल. "

" तुम्ही चिंता नका करूं. रंगाच्या बोटांतील कला जोंवर आहे तोंवर दुदात नाहीं पडणार." वासुकाका थकले. त्यांना बोलवेना. डोळेहि नीट उघडत ना. सुनंदा व रंगा जवळ बसून होतीं. इतरहि मित्र, विद्यार्थी येत जात. परंतु वांचण्याचें चिन्हच नव्हतें. रंगाला विश्वभारतींत पाठवूं म्हणणारे वासुकाका विश्वंभरांत विलीन झाले.

कांहीं दिवस गेले. तें लहानसें घर वासुकाकांनीं विकत घेतलें होतें. दुधगांव त्यांना आवडलें होतें. त्यांच्याजवळ जी जुनी पुंजी होती, तिनें तें घर त्यांनी घेतलें. परंतु आता रंगाला पैसे कोठले ?

" रंगा हें घर आपण विकून टाकूं. ते पैसे तुला होतील. विश्वभारतींत जा. मी येथे एखादी लहानशी खोली भाड्यानें घेऊन राहीन."

" आई, हे घर विकायचें नाहीं. घर असूं दे. काकांनीं किती आवडीनें हे घर घेतलें ते का विकायचें ? मी नाहीं विश्वभारतीत जात. या शाळेंतच मला नोकरी देणार आहेत मी येथला विद्यार्थी. काकांविषयीं शाळेंत आदर आहे."

" परंतु तुझी कला ? तुला अजून शिक्षण घ्यायचें आहे खरें ना ? एव्हांपासून नोकरी कशाला ? एकदा मनुष्य नोकरींत गुंतला म्हणजे निर्जीव होतो, यंत्रवत् होतो. तूं घर वीक. माझें ऐक. नाहींतर कोणाकडे गहाण ठेवूं हे घर नि त्यावर पैसे मागूं. तूं पुढें मोठा हो. पैसे मिळव. घर सोडव. दुसरें काय करायचें बाळ ? दागदागिना असता तर मोडला असता. येऊन जाऊन ही कुडीं आहेत. परंतु ती किती पुरणार ? यांना दागदागिने आवडत नसत. म्हणत सद्गुण हेच अलंकार. मी आरंभी रागवत असे. परंतु पुढे मलाहि तें पटलें दागदागिने म्हणजे रानटीपणा वाटू लागला. लहान मुलांना घालावे दोन दागिने. परंतु मोठ्या बायकांना काय करायचें ? अरे इथल्या मुलींच्या शाळेंत एक पोक्त बाई आहेत. त्या अजून कानांत एरिंग घालतात ! "

" त्यांत आई काय बिघडलें ? त्या पोक्त झाल्या तरी मुलींची वृत्ति त्यांची असेल. कांहीं माणसें चिरतरुण असतात. जीवन असेंच असावें. जडजरठपणा कधींहि येऊं नये. नंदलाल सांगायचे, गुरुदेव म्हणत की प्रत्येक दिवस जुनाच असला तरी नवीन वाटतो. फुलासारखा ताजा, घवघवीत नि टवटवीत. आई, मग काय करायचें ?"

" माझें ऐक. माझी तडजोड छान आहे. विकूं नये घर म्हणतोस. परंतु तूं नोकरीहि करूं नयेस. तेव्हां उपाय म्हणजे घर गहाण ठेवणे. म्हणजे मला घर सोडून जायला नको. पैसेहि तात्पुरते होतील. मरणाच्या आधीं तुझ्या विश्वभारतींतील वास्तव्याचीं स्वप्नें ते रंगवीत. त्यांचीं तीं स्वप्नें पुरीं नाहीं का करायचीं ? रंगा, ते काय म्हणतील ?

त्यांचा देह गेला. त्यांचीं स्वप्नें, त्यांचे विचार या घरांतील अणुरेणूंत भरून राहिले आहेत. मला ते विचार ऐकूं येतात. आपण त्या विचारांची पूजा केली पाहिजे. मी एक वेळ जेवेन, कोठें काम करीन, येथें मुलींच्या शाळेंत काम मिळेल का पाहीन; नाहींतर शिवणकामाचें यंत्र घेऊन तें काम सुरू करीन. परंतु तुझें शिक्षण पुरें झाले पाहिजे. जा विश्वभारतींत. जा मच्छलिपट्टणच्या कलाभवनांत. दक्षिणेकडे जाऊन नटराज वगैरे बघून ये. भारतीय कलांचा आत्मा आत्मसात् करून तो नवीन स्वरूपांत जगासमोर रंगरूपाने मांड. नव्या जुन्या भारताचा तूं समन्वय करणारा. जुन्या भारतांतून नव भारत कसा येत आहे तें दाखव. समाजवादाला शंकराचार्य आशीर्वाद देत आहेत असें रंगा चित्र काढील ते म्हणत. समाजवाद म्हणजे प्रत्यक्ष वेदांत असें ते म्हणत."

"होय आई. काकांची ती वाणी अजून माझ्या कानांत घुमत आहे. आपण गच्चींत होतों. अनंत तारे चमचम करित होते. काका शंकराचार्यांचे जीवन सांगत होते. समोर उत्तुंग हिमालय आहे, धवल शुभ्र. आणि दक्षिणेकडून तो बालसंन्यासी निघाला आहे. सभोंवतीं ज्ञानप्रभा फांकली आहे. अद्वैताचा प्रकाश सर्व विश्वाला द्यायला महापुरुष भारतयात्रेला निघाला आहे. आणि बोलतां बोलतां काका म्हणाले 'ते शंकराचार्य, हरिजनालाहि गुरु मानणारे शंकराचार्य, हिंदुस्थानांतील नद्या पाहून उचंबळणारे शंकराचार्य, ते असते तर आज काय करते? ते समाजवादी झाले असते. म्हणाले असते अद्वैत आतां कृतींत आणूं. द्वैत म्हणजे माया. स्वतःलाच महत्त्व देणें म्हणजे माया. आसपासची सारी चराचर सृष्टि स्वतःची मान; ती सुखव, हंसव, सुरंगी सुगंधी कर.' आई, काका कसे भावनावश होऊन त्या दिवशीं बोलत होते! परंतु ती वाणी आतां कधीं ऐकायला मिळणार? ती कायमची लोपली. असे कसे काका एकदम गेले? दोन दिवसांचें दुखणें नि ते गेले."

"परंतु त्यांची वाणी अमर आहे बाळ. ती वाणी त्यांची नव्हती. तूं येथें नव्हतास. एकदां ते जेवतांना म्हणाले—कधीं कधीं हजारों वर्षांचा भारतीय आत्मा माझ्या रोमरोमांत नाचत आहे असें मला वाटतें. आणि हातांतील घांस हातांत राहिला. पुन्हां म्हणाले, सुनंदा मी म्हणजे मी नाहीं. हा मी नाहीं जेवत. भारतीय जनता जेवत आहे. या देहांत माझा आत्मा मावत नाहीं. हा देह पडेल, फाटेल असें वाटतें ग. आंत आत्मा वाढत आहे. हें

अश्रु आंत कोठें भरूं ? यांला आंत जर्णू जागा नाहीं सुनंदा. आणि असें म्हणून ते उठले. बाहेरच्या खोलींत जाऊन बसले. शांत होऊन शाळेंत गेले. रंगा, अशीं भव्य दर्शनें मला घडत; अशीं भव्य प्रवचनें मी त्यांच्या तोंडून ऐकायची. माझें भाग्य थोर. त्यांनीं माझें जीवन कृतार्थ केलें. उगी, रडूं नको. ते आपल्याजवळ आहेत. अधिकच आतां आपल्याजवळ असतील. त्यांचीं स्वप्नें पुरीं कर. नवभारताचीं स्वप्नें. विश्वाला मिठी मारणारा भारत. महान् भारत. ती दृष्टि तूं देशाला दे, जगाला दे. तुझे रंग यासाठीं आहेत. तुझी कला यासाठीं आहे. ऊठ बाळ. चिंता नको. हे घर, त्याची आसक्ति कशाला ? ध्येयाचें मंदिर उभारण्यासाठीं अशीं घरें होमावीं लागतात. जेथें हे देह होमावे लागतात, तेथें या दगडाविटांचें काय घेऊन बसलास. जा शिकायला. मी वाटेल तें काम करीन. तूं मोठा हो. मनानें, विचारानें, दृष्टीनें, ध्येयानें मोठा हो." असें म्हणून तिनें रंगाला जवळ घेतलें. दोघें डोळे मिटून बसलीं होतीं. पावन, गंभीर, मंगल दृश्य!



या सर्व आपत्तीत रंगाला कधीं कधीं पंढरीची आठवण येई. वामु-काकांच्या निधनाची करुणवार्ता त्यानें त्याला लिहिली. मी विश्वभारतींत जाणार होतों. आतां काय करायचें? माझ्या मनात कोठेतरी नोकरी करावी असें येत. परंतु सुनंदा आई नको म्हणतात. त्या विश्वभारतीत जायला मला आग्रह करित आहेत. त्यांचें मन कसें दुखवूं? परंतु माझ्यासाठीं त्या काम करणार, लोकांचे कपडे शिवणार. अरे, घर विकून टाकावें असेंहि ही माउली म्हणाली. पंढरी, कोठें हे उपकार फेडूं? मी कोठला कोण? परंतु हे दोन जीव माझ्यावर मायेची पाखर घालित होते. एक थोर जीव देवाघरीं गेला. दुसरा या जगात कर्मयोग आचरित आहे. मी विश्वभारतींत गेलोंच तर तुला कळवीन. मी सध्यां दुःखी आहे. तूं मोठें पत्र पाठव. मला आनंदवील, सुखवील असें पत्र पाठव. किती तरी दिवसांत आपण एकमेकांना पत्रें लिहिली नाहींत. परंतु स्मृति अखंड असतेच.

अशा अर्थाचें पत्र रंगानें पंढरीला पाठवलें. थोडया दिवसांनीं भला मोठा लखोटा पेशावरच्या बाजूनें आला. पंढरीचा होता तो. लांबलचक होतें पत्र. रंगानें फोडलें. आणि तें सुंदर, सविस्तर पत्र तो बराच वेळ वाचित बसला. तें पत्र वर्णनात्मक होतें, कथात्मक होतें. त्यांत भावनांचा ओलावा होता. आपण सारेंच वाचूं या:

—वंदे मातरम्—

प्रिय रंगा,

तुझें दुःखी पत्र पाहून मी अस्वस्थ झालों. तुझा एक आधार गेला. इतके दिवस तो पुरला याबद्दलच कृतज्ञ रहा. पुढें तो उरला नाहीं म्हणून दुःख

नको करूं. वासुकाकांचें जीवन म्हणजे यज्ञरूप होतें. ते तुला नव्हते वाढवित. ते एका ध्येयाला वाढवित होते. तुझ्यामध्ये ते नवभारताचा आत्मा बघत.

मी या बाजूला आहे. कधीं वेळ असला म्हणजे दूर जातों. बर्फाच्छादित शिखरें दिसतात. किती आनंद होतो सांगूं. सूर्याचे किरण त्यांच्यावर पडले तर चांदीच्या फुलपात्रांत लालपिवळीं फुलें ठेवावीं तसे दिसतें.

तूं मला काढून दिलेलें भारतमातेचें चित्र माझ्या खोलींत टांगलेलें आहे. अनेकांना तें आवडलें. " कोण हा चित्रकार ? " मला विचारतात.

" माझ्या बाळपणाचा मित्र रंगा " असें मी अभिमानानें म्हणतो.

रंगा, तुला एक गंमत सांगूं ? अरे अमानुल्ला नव्हता का अफगाणिस्तानचा राजा. त्याला शेवटीं पळून जावें लागलें. बच्चाइसाकूनें बंड केलें. परंतु नादीरशहानें त्या बंडाचा पाडाव करून स्वतःच राज्यपद घेतलें. अमानुल्लाच्या बाजूच्या सरदारांना प्राणसंकट होतें. अमानुल्लाचा राजबिंडा तरुण मुलगा १५।१६ वर्षांचा. त्याला घेऊन काहीं सरदार हिंदुस्थानच्या बाजूला यायला निघाले. अफगाणिस्तानांतून ते बाहेर पडले. पोतीं भरभरून त्यांनीं रुपये बरोबर घेतले. बंदुका घेऊन त्या युवराजाला घेऊन निघाले. एका उंच पहाडावर त्यांचा मुक्काम होता. अमानुल्लाचा मुलगा दमून गेला होता. तेथें एक गुहा होती. गुहेंत तो राजपुत्र झोंपला. पाय गुहेंत होते, तोंड गुहेच्या तोंडाजवळ होतें. हवा स्वच्छ मिळावी हा हेतु. बरोबरचे सरदार झोपले. परंतु हा कसला आवाज ? हा घोरण्याचा. तो राजपुत्र घों घों करून घोरत होता. आणि दुसरा आवाज कोठून येतो ? एक फणाधारी महान् भुजंग वरच्या बाजूने खालीं येत होता. त्याची फणा खालीं होती. खालून राजपुत्र घोरण्याचे घों घों करीत होता वरून येणारा भुजंग फों फों करित होता. त्या सर्पाला वाटलें माझ्या राज्यांत हा दुसरा सर्प कोण ?

एक सरदार जागा झाला. त्याने तें रक्त गोठून टाकणारें दृश्य पाहिलें. तेथें चर्चेला, विचाराला वेळ नव्हता. त्यानें बंदुक रोंखली. गोळी सूं करीत त्या फणेंतून गेली. साप मरून पडला. फणेंतील रक्त राजपुत्राच्या अंगावर पडलें. तो उठला. तें रक्त पुसून टाकण्यांत आलें. केवढा प्रसंग !

रंगा, अशा रोमहर्षण कथा मला कोण सांगतें ? अरे अमानुल्लाचे जे लोक इकडे आले त्या सर्वांना ब्रिटिश सरकारनें राजबंदी केलें. नागपूर, रंगून इत्यादि ठिकाणीं त्यांना नजरकैदेंत ठेवलें. त्यांना दरमाहिन्याला भत्ता देण्यांत येतो. जे

सरदार इराण, तुर्कस्थान, इटली वगैरे देशांत गेले तेथें ते स्वतंत्र आहेत. परंतु ब्रिटिश अमानुल्लाचे शत्रु. त्यांना नादिरशहा जवळचा वाटतो. म्हणून नादिरशहाविरोधी लोकांना त्यांनीं नजरकैद केली. हे लोक अति दुःखी आहेत. अफगाणिस्तानांत त्यांचीं मुलें बाळें, सगेसोयरे. परंतु कधीं चिठीचपाटी पाठवतां येत नाहीं. यांच्याजवळ संबंध आहे असा आरोप ठेवून तिकडील आप्तांना गोळ्या घालायचे ! नेम नाहीं.

पेशावरलाहि असे कांहीं नजरबंदीलोक आहेत. ते मोठे लष्करी अंमलदार होते. एकजण रिसाल्यावरचा मुख्य होता. त्यांना मोटारींतून सायंकाळीं फिरायला नेण्यांत येतें. एकेदिवशीं गंमत झाली. मी एकटाच फिरायला गेलों होतों. माझी जिवलग मैत्रीण बांसरी माझ्याजवळ होती. मी आतां छान वाजवतों बांसरी. संगीत हा मन शान्त करायला मोठा उपाय आहे. मी सायंकाळीं बांसरी वाजवित होतों. आसपासच्या दऱ्याखोऱ्यांत ते आवाज घुमत होते. मी तन्मय होतों. डोळे मिटलेले होते. थोड्या वेळानें मी डोळे उघडले. तों समोर एक अफगाण बसलेला. मी घाबरलों. पुंगी ऐकून नाग यावा त्याप्रमाणें का हा लालबुंद अफगाण आला ?

तो अफगाण उर्दू मिश्रित हिंदींत बोलूं लागला.

" घाबरूं नको. वाजव. मला आवडतें संगीत. माझा मुलगा बांसरी वाजवी. कितीं वर्षांत त्याची भेट झाली नाहीं. तो मोठा झाला असेल. तुझ्या-इतका असेल. वाजव बाळ, वाजव "

मी पुन्हां सूर आळविले. तो सरदार खुश झाला, उचंबळला. त्याच्या मोटारचें शिंग वाजलें.

" हम् कैदी हैं. कल आईए. यहां मै फिर आऊंगा " तो हस्तांदोलन करून गेला. त्याची मोटार गेली. अफगाण आणि प्रेमसिंधु ! परंतु रवीन्द्रनाथांनीं काबुलीवाल्याची नाहीं का गोष्ट लिहिली ? वात्सल्य सर्वत्र आहे. प्रेम सर्वत्र आहे. त्या अफगाणाला आपल्या मुलाची आठवण झाली. मी विचार करित घरीं गेलों. आणि रंगा, दुसऱ्या दिवशीं मी पुन्हां तेथें गेलों. बांसरी वाजवित बसलों. आणि पों करित मोटार आली. प्रेमसिंधु अफगाणाला घेऊन ती आली. मोटार रस्त्यावर थांबली. तो सरदार दौडत टेकडीवर आला. त्यानें माझ्या मुखाचें चुंबन घेतलें. त्यानें मला हृदयापाशीं धरलें.

" बेटा, बजाव तेरी बांसरी " तो म्हणाला आणि मी भावनामग्न होऊन बांसरी वाजवली. आम्ही दोघे दिक्काल विसरलों. एका भावसिंधूंत आम्ही डुंबत होतों.

" अच्छा, बहुत अच्छा. जरा ठरीये. " मी थांबलों आणि किती वेळ गोष्टी बोलत होतों. तो म्हणाला " तूं जा अफगाणिस्तानांत. मी चिठी देईन. द्राक्षें खा. लठ्ठ होऊन ये. मांडवावर द्राक्षें वाळत घातलेलीं असतात. आम्ही खिसे भरून शाळेंत जायचे. अफगाणिस्तानांत वक्फ जमिनी म्हणजे धर्माला दिलेल्या जमिनी खूप आहेत. तेथें हंगामांत तीन तीन महिने फकीर राहतात. पोटभर द्राक्षें खातात. त्यांनीं विकायला नेऊं नये. " रंगा, द्राक्षांच्या १०८ जाती आहेत! द्राक्षांचें अपार वैभव तिकडे आहे. आणि तो सरदार म्हणाला " बेटा, अरे प्रेम पशुपक्षियोंमेंहि मौजूद है. हमारी बडी दादी थी. उनका हाथ हमारी गो पछानती, और वह उसकेपास जाती तो दो शेर जादा दूध देती." एकदां गाय दूध देतनाशी झाली. परंतु गांवाला गेलेली आजी आली नि ती पुन्हां दूध देऊं लागली. अफगाणिस्तानांत कोणी काळाबाजार केला तर त्याच्या कानांत खुंट्या ठोकतात! क्रूर शिक्षा! परंतु काळाबाजार करण्याची छाती नाहीं. किती तरी गोष्टी ते सांगत होते. एक गंमत सांगूं का? पहाडांत एकेठिकाणीं परीस आहे अशी दंतकथा. चारचार महिने बकऱ्या पहाडांत चरायला नेतात. पुढें गुराखी त्यांना घरीं परत आणतात. बकऱ्या पाठवतांना त्यांच्या खुरांना नाल मारतात. हेतु हा कीं परीस नालाला लागला तर नाल सोन्याचा व्हावा! महिनेच्या महिने रानांत राहून जेव्हां कळप पुन्हां खालीं येतात, घरीं येतात तेव्हां जो तो बकऱ्यांच्या खुऱ्या बघतो. सोनें झालें आहे कीं काय?

रंगा, खरा परीस जगांत एकच आहे. चांगल्या दृष्टीनें पाहिलें तर सारें सोनेंच सोनें. सूर्याचे किरण ढगांवर पडतात. सारे सुवर्णमय दिसतात. आपल्या जीवनांतील सहानुभूति, प्रकाश, सेवा, आनंद यांचे अखंड किरण सर्वत्र विखुरित जावें. आतां हा अफगाणच बघ. आपण पठाण अफगाण म्हणजे दुष्ट समजतों. परंतु भावना, हृदय, प्रेमळपणा सर्वत्र आहे. दुष्टता नाहीं कोठें? एक सुरा भोंसकून पटकन् मारील, एक रक्तशोषण करित राहील. एकाची स्थूल हिंसा दिसते, एकाची सूक्ष्म परंतु अहोरात्र चाललेली दिसत नाहीं. रंगा, त्या दिवशीं तो अफगाण गेला. दोनचार दिवस तो आला नाहीं. मी त्याला भेटायला अधीर असें.

मला मातृप्रेम, पितृप्रेम मिळालें नव्हतें. तो अफगाण तें मला देत होता. आणि एके दिवशीं तो आला. तो कांहीं तरी घेऊन आला.

"बच्चा, हम यहांसे जानेवाले है दूर बेलगांवके तरफ हमको भेजनेवाले है. तुमारा मुल्क वहांहि है न ? मैं देखूंगा. आज लो ये अंगूर. खा बेटा. और यह सुंदर छोटासा गालीचा तुमारे वास्ते. और यह तेल तुमारे माथेपर मैं आज डालूंगा. तू मेरा बच्चा है न."

त्यानें माझ्या डोक्यावर सुगंधी तेल ओतलें. तो म्हणाला, ही बाटली तूं घेऊन जा. त्याच्या डोळ्यांत पाणी आलें.

"बजाव तेरी बांसरी"

मी बांसरी वाजवली. भैरवी शेवटी आळवली. मोटारीचे शिंग वाजलें. तो उठला.

"हमारा कैदखाना मौततक है. क्या करना. यहा कोई रिस्तेदार नहीं, सगा साथी नहीं. सबसे दूर दूर ठीक. खुदा की मर्जी. हमारा किस्मतहि बुरा होगा. बच्चा, याद रखोगे ना ? भूलो मत. अफगाणभी अच्छे होते हैं ऐसे तुमारे लोगोंको कहा जाना. हम सब बूरे नहीं भलाईबुराई से बिनी गयी है यह दुनिया. अच्छा बेटा. अल्ला तेरा भला करे."

त्यानें मला हृदयाशीं धरलें. तो गेला. तो धिप्पाड पहाड पाझरला होता. त्याच्या तुरळक रुपेरी दाढीवर अश्रु मोत्याप्रमाणें चमकत होते. त्याची मोटार गेली. पुन्हां त्याचें दर्शन नाहीं. बेळगांवला नेलें का नागपूरला नेलें प्रभूला ठाऊक. कारण सांगत नसतात खरें.

रंगा, म्हणून जगांत कोठेहि जा, तुम्हांला माणुसकी आढळेल. विश्वाचें माझें घर. मी तर अनिकेत आहें. घरदारविहीन आहें. परंतु मला जाईन तेथें घर मिळत आहे.

जगांत युद्ध पेटेल असें म्हणतात. आमची काय शाश्वती ? वेळ आली तर कारकुनांनाहि सैनिक व्हावें लागेल. मी सर्व गोष्टींना सिद्ध आहें. कशाची आसक्ति, कशाची भीति ? कोठेंहि गेलों तरी भारतमातेचें चित्र खिशांत असतें, हृदयांत असतें.

रंगा, तूं मला प्रेम दिलेंस. तूं पुरणानें भरलेली पुरणपोळी नाहीं दिलीस, तर माधुर्यानें भरलेलें स्वतःचें हृदय दिलेंस. रंगा, रडूं नको. आनंदी रहा. अश्रु

पूस. विश्वभारतींत जा. मीहि तुला ५।१० रुपये दरमहा पाठवीत जाईन. अधिक काय लिहूं रे माझ्या हृदया, माझ्या प्रेममूर्ते ? पुरे आतां. मला जायचें आहे रंगा.

तुझा पंढरी.

रंगानें तें पत्र कितीदां तरी वाचलें. त्यानें सुनंदा आईलाहि तें वाचून दाखविलें.

" लष्करी कारकून परंतु कविहृदयी आहे. "

" होय आई. त्याच्या चुलत्यांच्या आग्रहामुळें त्याला लष्करांत जावें लागलें. "

" पुन्हां खरेंच का रे युद्ध सुरू होणार ? "

" निरनिराळ्या ठिकाणीं छोटीं युद्धें सुरूच आहेत. यांतूनच जगभर वणवा पेटेल. पुन्हां कोट्यवधि माणसें मरतील. मागच्या महायुद्धांतून राशियन क्रान्ति वर आली. या युद्धांतून काय निष्पन्न होईल ? चीन, हिंदुस्थान हे तर प्रचंड देश. हे का गुलामच राहतील ? आई काय होईल सांगतां येत नाहीं "

" तूं विश्वभारतींत कधीं जायचें ठरवतोस ? "

" तुला सोडून जावें असें वाटत नाहीं "

" ध्येयासाठीं, कर्तव्यासाठीं जायचें. जा. तुझा मित्रहि मदत पाठवणार आहे. मीहि कामधाम करीन. घर गहाण ठेवूं. तुझ्याजवळची कला वृद्धिंगत करून ये. आतां वेळ नको दवडूं हो रंगा " ती थोर माउली म्हणाली.



## सुनंदाची तपश्चर्या : : : १२

सुनंदानें रंगाला विश्वभारतीत पाठविलें. आणि त्याला मदत करतां यावी, त्याला पैसे कमी पडूं नयेत म्हणून ती नानाप्रकारचे उद्योग करी. ती एकदांच जेवे. स्वतःचा खर्च तिनें कमी केला. घर गहाण ठेवलें होतें. अर्थात् अजून मालकी तिचीच होती. घरांत एक भाडेकरू तिनें ठेवला. लहानशा खोलींत ती राही. रंगाला ददात नसो हें तिचे स्वप्न, हा तिचा ध्यास रंगामध्ये ती पतीचें ध्येय बघे. रंगा जणूं त्यांचें ध्येयबाळ.

तिनें एक शिवणकामाचें हातयंत्र घेतलें. ती शिवणकाम शिकलेली होती ती काम करी. तिनें दारावर पाटी लावली. 'येथें बायकांचे, लहान मुलांचे कपडे शिवून मिळतील' अशी ती पाटी होती. आणि मुलींचे झंपर, पोलकीं, परकर ती शिवी. मोठ्या बायकाहि आपल्या अंगचीं पोलकीं वगैरे शिवून नेत. सुनंदा छान शिवी. तिला कलात्मक दृष्टि होती. कधीं मुली आल्या म्हणजे त्यांच्याजवळ ती बोलत बसे. त्यांना देशाच्या गोष्टी सांगे. कोणी कोणी मुली विलायती कापड घेऊन यायच्या. सुनंदा म्हणायची "खादी नाहीं तर नाही. निदान देशी तरी कापड घ्यावें. स्वदेशी हा धर्म आहे. त्यात परकीयांचा द्वेष नाही. आपण जवळच्या माणसास मदत देऊं शकतों. स्वदेशी म्हणजे शेजारधर्म."

कधीं ती मुलींना विवेकानंदांच्या गोष्टी सांगे, तर कधी सीतासावित्रींच्या चरित्रांतील उदात्तता सांगे. सुनंदाची ती लहानशी खोली म्हणजे जणूं आश्रम होता. तेथें कर्मयोग होता, ध्येयवाद होता.

सुनंदा रिकामी नसे. कांहींना कांहीं उद्योग चालूच असे. दर आठवड्यास ती रंगाला पत्र पाठवी. त्याला उत्साह देई, प्रेरणा देई.

परंतु सुनंदाला तो अपार श्रम सोसला नाहीं. भरपूर काम आणि आराम मात्र नाहीं. खाणेंहि एकवेळ. पतिनिधनानंतर ती जणुं संन्यासिनी बनली होती.

दूध पीत नसे, तूप घेत नसे. कधीं भाकरी आणि पाणी एवढ्यावरच राही. ती अशक्त दिसूं लागली, फिक्कट दिसूं लागली. तरी तिचा उद्योग चालूच असे.

एकेदिवशीं तिला काम करतां येईना.

"झालीं का झबलीं शिवून ?" एका मुलीनें येऊन विचारलें.

"नाहीं झालां. उद्यां देईन"

"कितीदां खेपा घालायच्या ? तेवढाच का आम्हांला उद्योग"

"बरं बसा हो जरा आता देते पुरी करून" असे म्हणून सुनंदा उठली परंतु तिच्या डोळ्यासमोर अंधेरी येऊन ती पडली ती मुलगी घाबरली. तिनें बिऱ्हाडांतील लोकांना हांका मारल्या.

सुनंदा शुद्धीवर आली.

"उद्या दिलीं झबली तर नाहीं का चालणार ?" तिनें करुणेनें विचारलें.

"तुम्हाला बरें नसेल वाटत तर घाई नाहीं." ती तरुणी निघून गेली. सुनंदा आंथरुणावर पडली.

एके दिवशीं वासुकाकांचे एक शिक्षक मित्र सुनंदाकडे आले. ते चकित झाले.

"तुम्हांला काय होतें ?"

"कांहीं नाहीं. जरा थकवा वाटतो"

"रंगाला कळवलेत का ?"

"त्याला नका कळवूं. त्याला शिकूं दे, मोठा होऊं दे. रंगा भारताचे नाव दिगंत नेईल असें ते म्हणत. रंगाला उत्साह देणें हें माझें कार्य"

"तुम्ही प्रकृतीला जपा" ते शिक्षक म्हणाले. ते निघून गेले. परंतु त्यांनीं रंगाला लिहिलेंच. रंगा तिकडे चित्रकलेच्या उपासनेत रंगला होता. भारताचीं ध्येयें समजून घेत होता. एकेदिवशीं तो रवींद्रनाथांच्या पिताश्रींच्या समाधीजवळ बसला होता. इतक्यांत त्याला एकानें पत्र आणून दिलें. त्यानें तें वाचलें. तें पत्र हातांत होतें. त्यावर त्याच्या डोळ्यांतील पाऊस पडत होता.

"रंगा, काय आहे पत्रांत ? हेमन्तानें विचारलें.

"हेमन्त, माझी आई आजारी आहे"

"आई ? तुझी आई नाहीं ना ?

"जन्म देणारी गेली, परंतु देवानें दुसरी दिली. जिनें मला मायाममता सारें दिलें. तिचे पति वारले. माझ्यासाठीं ती कष्टत असते. मला मदत पाठवते. मला जायला हवें"

दोघे मित्र गेले. रंगा सर्वांचा निरोप घेऊन निघाला. त्याला नंदलालांनीं प्रशस्तिपत्र दिलें.

"परंतु पुन्हां येथें ये" ते त्याला म्हणाले.

"प्रभूची इच्छा तसें होईल" तो दुःखानें म्हणाला. रंगाची गाडी निघाली. मनानें तो कधींच सुनंदा आईच्या चरणापाशीं पोंचला होता. देवा, कां रे असें होतें? काका गेले, आतां आईहि जाणार का? जन्म देणारे मायबाप नेलेस. माझ्या मनोबुद्धीला रंगरूप देणारे मायबाप, तेंहि तूं नेत आहेस. मला कोण? मी का नेहमीं एकाकी राहणार? अनेक विचारांत रंगा बुडून गेला होता.

बुधगांवला तो आला. पहांटेची वेळ होती. पुढच्या भागांत भाडेकरू होता. रंगानें दार ठोठावलें.

"कोण आहे?" एका आजीबाईनें दार उघडून विचारलें.

"मी रंगा."

"तुमची आई पाठीमागें राहते. तुमची आठवण काढते."

रंगा पाठीमागें गेला. सुनंदा आंथरुणांत होती.

"देवा, रंगा सुखी ठेव." असें ती म्हणत होती. तों दारावर आवाज झाला.

"कोण आहे?"

"आई, मी."

"रंगा? तूं एकदम कोठून आलास बाळ?" दार उघडीत तिनें विचारलें.

"आई, तूं किती वाळलीस? किती थकलीस? तूं कां नाहीं मला कळवलेंस? मास्तरांनीं कळविलें म्हणून आलों. तुझ्यापासून मी आतां दूर जाणार नाहीं. येथल्या शाळेंतहि नोकरी मिळेल असें त्या मास्तरांनीं लिहिलें आहे."

"आतां जरा पड. जागरण असेल. नीज माझ्याच आंथरुणावर. मी उठतें आतां. चूल सारवतें."

"आई, तूं निजून रहा. तुझे पाय मी चेपतों. मी चूल सारवीन, सारें करीन. तूं आतां विश्रांति घ्यायची."

परंतु सुनंदानें रंगालाच निजविलें. आणि त्याला झोंप लागली. तिनें चूल सारवली. कोको केला.

"बाळ, ऊठ आतां. कोको घे. मग आंघोळ करून झोंप" सुनंदा त्याला म्हणाली. रंगा उठला. प्रातर्विधि उरकून तो तेथें आईजवळ बसला.

"तूं आतां श्रमूं नकोस. नको शिवण काम, नको कांहीं. तूं आई कांहीं घेत नाहींस"

"काय घेऊं रंगा ?"

"थोडें दूध घेत जा. घेशील उद्यांपासून ? मला कोण आहे आई ? तूंहि का मला सोडून जाऊं इच्छितेस ? रंगासाठीं रहावें असें नाहीं तुला वाटत ? तुम्हीं सर्वांनीं माझ्यासाठीं श्रमून श्रमून जायचें. आणि मी जगायचें. काय त्या जगण्यांत आनंद ? आई, माझ्या मनाचा, भावनांचा कांहीं विचार कर. तूं जग. रंगाची कीर्ति ऐकायला जग. उद्यां माझें यश कोणाजवळ सांगूं, कोणाला ऐकवूं ?"

"रंगा, नको दुःखी होऊं. तुझ्यासाठीं मी जगेन. सारें करीन."

सायंकाळीं रंगा त्या शिक्षकांकडे गेला. बराच वेळ ते बोलत होते.

"मला ड्रॉईंग टीचर परीक्षेचें सर्टिफिकेट नाहीं. शाळा मला नोकरी कशी देऊं शकेल ?"

"अरे नंदलालांजवळ तूं शिकला आहेस. त्यांचे प्रशस्तिपत्र आहे. याहून मोठी परीक्षा कोणती ? मी मुख्य शिक्षकांजवळ बोललों आहे. ते तुला नोकरी देतील."

रंगाला त्या शाळेंत नोकरी मिळाली. सुनंदाला तो आतां कामधाम करूं देत नसे. शाळेंतहि तो मुलांत प्रिय झाला. विद्यार्थ्यांना नवीन नवीन कल्पना देई. त्यांच्याकडून सुंदर चित्रें काढून घेई.

परंतु ड्रॉईंगचे इन्स्पेक्टर आले. त्यांनीं त्याच्या नेमणुकीला आक्षेप घेतला.

"ते नंदलाल वगैरे आम्ही ओळखीत नाहीं. मुंबईच्या परीक्षेचें आहे का सर्टिफिकिट ?"

"नंदलालांना ओळखीत नाहीं म्हणणारा ड्रॉईंगचा इन्स्पेक्टर म्हणून येतो हें देशाचें दुर्दैव" असें रंगा म्हणाला

" इन्स्पेक्टराचा अपमान नका करूं "

" इन्स्पेक्टरानींहि भारताला भूषण झालेल्या थोरांचा अपमान करूं नये." बोलाचाली झाली. सरकारी पत्रव्यवहार सुरू झाला. शेवटीं रंगाची नोकरी गेली. सरकारी प्रशस्तिपत्र असेल तरच पात्रता कितीहि ज्ञानसंपन्न, कलासंपन्न एखादी व्यक्ति असली, परंतु जर हें प्रशस्तिपत्र नसेल, सरकारमान्य प्रशस्तिपत्र नसेल तर सारें फुकट.

रंगा बेकार झाला घर गहाण होतें कर्ज झाले होतें. नोकरीचाकरीहि नाहीं. रंगा चिंतेत होता.

" आई, मी मुंबईला जातो. उद्योगधंदा बघतो. तेथें चित्रकार लागतात. वर्तमानपत्रें मासिकें असतात. बघेन कोठेतरी काम फावल्या वेळांत ध्येयवाद. इतर वेळां धंदा "

" काय सांगूं बाळ ! "

" आई, तूं येथे पुन्हां एकटी. परंतु कष्ट नको करूं. मी तुला पैसे पाठवित जाईन. रंगासाठीं जग. दूध पीत जा थोडे तूप खात जा. कबूल कर. हो म्हण. "

" तूं सांगशील तशी वागेन. परंतु तुझ्या गुणांचे चीज होंवो. तुझे गुण शेवटीं फुकट का जाणार ? भारताची कीर्ति वाढवणारा तूं होशील असें ते म्हणत. "

" आई, धडपड करीत रहायचें. प्रभूची मर्जी असेल तर माझ्या हातून अमर कलाकृति कदाचित् निर्माण होतील. जीवनाच्या धडपडीतून जाणाऱ्या कलावंताच्या कलेंत गंभीरता येते, करुणा येते, खोलपणा येतो. हे अनुभव आई फुकट नाहीं जायचे. उथळपणा, उल्लूपणा जातो आणि मनुष्य वेदनांतून गेल्यानें निराळा बनतो. मी मुंबईत गेलों तरी ध्येय नाहीं विसरणार. आणि तेथें नवीन नवीन पहायला सांपडेल, ऐकायला सापडेल. हें लहानसें दूधगांव ! येथें मीच तज्ज्ञ, मला अधिक येथें कोण शिकवणार ? मुंबईस बापूसाहेब आहेत. कोठेंतरी खोली मिळेल. तूं चिंता नको करूं. तूं नीट रहायचें. तुझा आशीर्वाद मला नेहमीं हवा. त्यांत माझी सारी शक्ति तुझा प्रेमळ आशीर्वाद म्हणजे माझा आधार.

"रंगा, ध्येयासाठीं कोठेंहि जा. मी तुझे पंख बांधणार नाहीं. माझ्या मनांत येतें हें घर विकावें नि तुला परदेशांत पाठवावें. चिनी जपानी कला बघून ये. डचांची चित्रकला, फ्रेंचांची पाहून ये. जगांतील उत्कृष्ट चित्रसंग्रह पाहून ये. कशाला हे घर ठेवायचे? ते ध्येयासाठीं होमूं दे."

"नको आई. हें घर नाहीं विकायचें. हा आधार आहे. डोकें ठेवायला मठी असूं दे. परदेशांत नाही जातां आलें तरी नमुने येथेंहि पहायला मिळतील. बडोद्याला मोठा चित्रसंग्रह आहे. लाखलाख रुपयांचीं तेथें चित्रे आहेत"

"रंगा, भारतांतील चित्रकारांचीं लाखलाख रुपयांची चित्रे युरोप अमेरिकेंतील संग्रहालयांत केव्हा टांगलीं जातील?"

"तुझ्या रंगाचीं टांगलीं जातील तुझा आशीर्वाद दे, माते, आशीर्वाद दे."

रंगानें सुनंदाच्या चरणांवर मस्तक ठेवलें. तिनें आपला हात त्याच्या डोक्यावर ठेवला. मोठें पावन असें ते दृश्य होते!



रंगाला पुन्हां पूर्वीच्या खोलींत जागा मिळाली. तेथें त्याच्या ओळखीचे कांहीं लोक होते. कोणी नवीन होते. ती खोली म्हणजे धर्मशाळा होती. ज्यांचे अभ्यासक्रम संपत ते जात, नवीन ओळखीचे दुसरे विद्यार्थी येत. असें चाले.

" रंगा, तूं चित्रकलेची येथील परीक्षा कां नाहीं देत ? "

" आतां परीक्षा नको. नंदलालांजवळ शिकून आल्यावरहि येथें चित्रकलेच्या शिक्षकाची परीक्षा देत बसूं ? मी ही गोष्ट सहन नाहीं करूं शकत. "

" परंतु व्यवहार नको का बघायला ? जीवनाला मर्यादा असतात. कांहीं तरी एक प्रमाण ठेवावें लागतें, ठरवावें लागतें. उद्यां जर सारेच असें म्हणूं लागले तर ? माझ्याजवळ आहे कला, मी कशाला परीक्षा देत बसूं असें का सर्वांनीं म्हणायचें. तुम्हांला परीक्षा जड नाहीं. हातचा मळ. पहिला येशील. बघ विचार करून. "

" आतां पुन्हां तेथें नांव घालणें नको. माझें मन नाहीं घेत. "

खोलींतील जुन्या मित्राजवळ बोलणें चाललें होतें. कामाची मंडळी हळुहळू सारी गेली. रंगाहि कांहीं वेळानें बाहेर पडला. त्यानें आपले नमुने बरोबर घेतले होते. आज अनेक ठिकाणीं कांहीं काम मिळतें का म्हणून बघायला तो हिंडणार होता. एका चित्रकलासंस्थेंत त्याला नोकरी मिळाली.

"आम्ही अनेक वृत्तपत्रांची, खास अंकांची मागणी पुरी पाडित असतों. प्रकाशकांना पुस्तकांसाठींहि चित्रें हवीं असतात. आम्ही तुम्हांला सांगूं त्याप्रमाणें तुम्ही नमुने करून द्यायचे. कबूल ?"

"मी मधून मधून सूचना केल्या तर चालतीऊ ना ?"

"अवश्य करा. परंतु शेवटीं निर्णय घेणें आमच्या हातीं. आम्ही व्यवहारी माणसें. "

" व्यवहारांतहि सुंदरता नि उदात्तता आणायला हवी ना ?"

" परंतु गिऱ्हाइकाला ती नको असेल तर ? मासिकांच्या मुखपृष्ठावर ठराविक चित्रंच लागत असतात. मागणी तशी पुरवठा."

" खरोखर ज्याच्या डोळ्यासमोर भारत आहे, त्याला अनन्त विषय आहेत. आजचा भग्न परंतु डोकें वर काढणारा भारत आहेच, परंतु दहा हजार वर्षांची सहस्त्ररंगी परंपरा आहे. जो भारताच्या संस्कृतींत रंगला, आजच्या राष्ट्रीय उत्थानांत रंगला, त्याच्या डोळ्यासमोर सहस्त्रावधि प्रसंग उभे राहतात. ग्रामोद्योगी चित्रें, दारुबंदीचीं चित्रें, परदेशी मालावर निरोधन करणाऱ्यांचीं चित्रें, झेंडे घेऊन निघणाऱ्या वानरसेना, लाठीमारानें न दबणाऱ्या मायभगिनी, ग्रामसफाई करणारे सेनापति, गांधीजींचा येरवडामंदिरांतील उपवास, तेथील रवीन्द्रनाथाची नि त्यांची भेट—एक का दोन शतावधि प्रसंग."

" तुम्ही येणार का बोला. तुम्ही तुमच्या कल्पना सांगत जा, येणाऱ्या ग्राहकांना पटवा. त्यांना पटले तर तसें चित्र चितारा."

" ठीक कांहीं दिवस हा अनुभव घेतों. परंतु मी आत्मा विकीत आहे असे वाटलें तर मला केव्हांहि मुक्त करा मला करारानें नका बांधूं. माझा आत्मा मुक्त ठेवा."

" कबूल."

करार झाला. रंगा त्या संस्थेत कामाला जाऊं लागला. परंतु घरीं आल्यावर तो स्वतःच्या कल्पना रंगवित बसे. त्यानें एक फारच सुंदर चित्र तयार केलें होतें. महात्माजी समुद्रतीरावर सत्याग्रहासाठीं उभे आहेत असें तें चित्र होतें. अति भव्य असे तें चित्र होतें. स्वातंत्र्याची उषा फांकत आहे, समुद्र समोर उसळत आहे आणि एक महान् पुरुष गंभीरपणें बंड करायला उभा आहे. डोक्यावर विमानें आहेत. दूर बंदुकवाले आहेत. त्या चित्रांत सारी दृष्टि जरी महात्माजींवर खिळली तरी सभोंवतालची सृष्टीहि पार्श्वभूमीप्रमाणें मोठी परिणामकारक अशी तेथें चितारलेली होती.

खोलींत रंगा एकटाच होता. आज सारे सिनेमाला गेले होते. आठाची वेळ असेल. रंगा तांदूळ निवडीत होता. शेगडी फुलली होती. निखाऱ्यांवर आधण होतें. पलीकडच्या खोलींत त्याचें तें चित्र तेथें होतें. तो शेवटचे कलात्मक स्पर्श करित होता.

इतक्यांत दारांतून कोणी तरी आंत आलें. ती मूर्ति रंगाकडे अनिमिष नेत्रांनीं बघत होती. किती तरी वेळ झाला. रंगाचें तांदूळ निवडणें संपलें. तो उठला. आलेल्या व्यक्तीची नि त्याची दृष्टादृष्ट झाली. दोघें एकमेकांकडे बघत होतीं.

" नयना, केव्हां आलीस तूं, ये बस."

" मी किती वेळ उभी आहें. तूं चित्रांत रंगतोस तितकाच तांदूळ निवडण्यांतहि रंगतोस."

" कलावंतानें सर्वत्र कला न्यावी. तांदूळहि नीट निवडावे."

नयना तेथें लहान चटयीवर बसली. रंगा कसला तरी विचार करित होता.

" नयना, तूं येथेंच जेवशील ? माझ्या हातचें पंढरीला आवडायचें. तो तिकडे दूर पेशावरकडे आहे. बोल लौकर. म्हणजे मूठभर आणखी तांदूळ घेतों."

" एका अटीवर."

" तूं आली नाहींस तों अटी कसल्या घालतेस ग."

" हें जग म्हणजे सामना, अटीतटीचा सामना."

" तुझा माझा तसा सामना नाहीं. तें आधण आलें आहे. बोल पटकन्. जेव नि जा. किती वर्षांनीं भेटलीस. आई गेल्यापासून आजच भेट."

रंगाला आईची आठवण आली. तो सद्गदित झाला. वातावरण जरा गंभीर झालें.

" रंगा मी जेवेन. परंतु मलाच सारें करूंदे. मी करतें भात. कणीक, पीठ आहे का ? पोळी भाकरीहि करीन. तूं येथें बस, बोल. कित्येक वर्षांतील हकीगती सांग."

" तुला का कोळशांत हात भरायला लावूं ? रंगाला संवय आहे."

" काळा रंग का रंगा वाईट ? कृष्ण काळा, आकाशहि काळें सांवळें."

" म्हणून का कोळसा तोंडाला फांसायचा ? काळे झालेले हात धुवावेच लागतात. ते का कपड्यांना पुसायचे ? नयना, तूं वेडी आहेस."

" म्हणून तर येथें आलें या लहानशा जगांत, या लहानशा खोलींत, या चुलीजवळ स्वयंपाक करायला. आण ते तांदुळ. मी सारें करीन. तूं बस."

तिनें त्याच्या हातांतून ताट घेतलें. तिनें ते तांदुळ निवडले. सारे एक करून धुवून आधणांत ओइरले. भात खतखतूं लागला.

"नयना, मी दहीं घेऊन येतों. दहीं भात खाऊं."

"लौकर ये. आणखी कांहीं आणित नको बसूं."

तो वाटी घेऊन गेला. नयना तेथील डबे शोधीत होती. एका डब्यांत भाजणीचें पीठ होतें. तिनें थालीपीठ लावायचें ठरविलें. तिनें भाजणी भिजवली. तिखट मीठ घालून तयारीनें राहिली. भात शिजला. तिनें तवा वर ठेवला. परंतु रंगा कोठें गेला? का पळून गेला मला येथें ठेवून? असें कसें करील तो? तिला हंसूं आलें. तव्यावर थापून चुलीवर ठेवून ती रंगाचीं चित्रें पहात बसली. भिंतीवर एक चित्र होतें. ताईला भेट असें त्या चित्राखालीं लिहिलेलें होतें. ही कोण ताई? रंगाला बहीण तर नव्हती. ती विचार करित होती. त्याची चित्रशाळा तपाशीत होती.

तिकडे रंगा आला. त्यानें तवा उतरला. चुर् आवाज झाला. नयना झटकन् आली.

"केव्हां रे चोरपावलांनीं आलास?"

"तूं कशी चोरपावलांनीं येऊन उभी राहिली होतीस? तुम्हां बायकांनाच चोर होतां येते असें नाहीं. पुरुषांनाहि होतां येतें"

"सारी सृष्टिच चोर आहे."

"एकदम सृष्टीवर कशाला शेरा? स्वतःपुरतें बघावें. आपण कोण तें बघावें."

"स्वतःपुरतें बघावें हेंच का वासुकाकांजवळ शिकलास? ते तर दुसऱ्याचें आधीं बघत. स्वतःचें विसरत."

"नयना, दुसऱ्यांचा विचार तरी कां करायचा? स्वतःचा आत्मा मोठा व्हावा म्हणूनच ना? शेवटीं निःस्वार्थ होणें म्हणजे परमार्थ मिळविणें."

"आऊं दे चर्चा. थालीपीठ बघ. तें जळेल."

"तूं ना सारें करणार आहेस?"

"तर मग तूं दूर हो."

"तुला भाजणी सांपडली तर? संन्याशाचा संसार असा तपासूं नये. अब्रू चव्हाट्यावर यायची. एक आहे तों एक नाहीं. येथलें कांहीं खाल्लें नाहींस ना?"

"काय आहे खायला? शंकरपाळे, लाडू, चकल्या?"

"हे पदार्थ मी कोठून आणूं?"

" मी देऊं आणून ? "

" नको. मला त्यांची फारशी रुचि नाहीं. परंतु येथें एका डब्यांत दाणे आहेत. "

" माझ्या वडिलांना फार आवडतात. "

" सातारकडची मंडळी शेंगाखाऊ. "

" आणि तुम्ही काय खाऊ ?"

" मिळेल-ते- खाऊ ! "

दोन ताटें तयार झाली. पाट नव्हतेच. रंगानें वर्तमानपत्राची घडी बसायला घेतली. लहान आसन नयनाला. रंगाला ताईची आठवण झाली. तो एकदम शून्य मनाने तेथें उभा राहिला.

" रंगा, ये. काय झाले ? "

" आठवण आली. "

" कोणाची ? "

" लिलीची, तिच्या ताईची. या शेजारच्या खोलीत ताई रहात असे. मला कधीं लागलें कांही म्हणजे ताईकडून मी आणायचा. परंतु आज कोठें असेल ताई, तिची ती गोड मुलगी ? "

" तें भिंतीवर चित्र आहे तीच का ताई ? "

" हो. मी तें तिला भाऊबीजेला देणार होतो. परंतु तिच्या नवऱ्यानें एकदम येथली जागा बदलली. कोठें गेली रहायला मला कळले नाही. मीहि पुढें मुंबई सोडली. आतां पुन्हां परत आलों. "

" तूं विश्वभारतींत होतास ना ? "

" तुला काय माहीत ? "

" मी हल्लीं येथल्या आर्टस्कूलमध्यें शिकत आहें. मी मॅट्रिकला नापास झालें. एक वर्ष आजारी होतें. आतां सारें ठीक आहे. आवडीचा अभ्यास करित आहें. तुझ्या हातचीं चित्रें आर्टस्कूलमध्यें आहेत. तेथले एक शिक्षक तुझ्या आठवणी सांगतात. मी ऐकतें. तू एकदां चित्र काढित होतास. वेळ संपली. तूं रागावलास. मला हें चित्र पुरें करूं दे. या वेळची माझी मनोरचना पुढच्या वेळेस कशी असेल ? मनांत रंग जमले आहेत, तेथें मिश्रणें तयार आहेत. मला बसूं दे येथें. परंतु घंटा झाली. तुला सारें गुंडाळावें लागलें. होय ना ? "

" हो, आठवतो तो प्रसंग. काय ग नयना, माझा पत्ता तुला कोणी सांगितला ?"

" कोणी तरी म्हणाले की रंगा मुंबईस परत आला आहे. जुन्या खोलींतच राहतो."

" जुनी खोली तुला काय माहीत ?"

" तूं पंढरीला तो पत्ता कळवलेला होतास. तो नव्हता का पेशावरला जाताना येथें आला ? तूं पुरणपोळी केलीस. पंढरी पुण्याला मला भेटत असे. तुझा तो मित्र म्हणून त्याच्याविषयींहि मला आपलेपणा वाटे. त्यावेळेस त्याच्याजवळून पत्ता मी घेतला होता "

" मग कधीं पत्र नाहीं लिहिलेंस ते ?"

" लिहीत असे, परंतु पोस्टांत टाकित नसें."

" मग कोठे कचऱ्याच्या पेटींत टाकीत असस ?"

" माझ्या ट्रंकेंतच तीं असत."

" आतां कोठे आहेत ?"

" हृदयाच्या पेटींत."

" त्या पेटीची किल्ली कोठें मिळते ?"

" ते सांगावे लागत नाहीं. त्या किल्लीचा पत्ता सर्वांना माहीत असतो."

" नयना, तुला उशीर होईल जायला.'

" मला उशीर होईल म्हणून मामींना सांगून आलें आहे."

" भात संपला, थालीपीठ संपले. आतां काय खायचें ? हे दहीं संपव ना."

" तूंच संपव. मी रोज खातेंच दहीं. रंगा, तूं घेतोस का कधीं दही ? तूं असा कां राहतोस ?"

" आईला, सुनंदा आईला कर्ज आहे. घर गहाण आहे. काकांचें घर. मला तें सारें मोकळें करायचें आहे. नयना, मी पोटभर जेवतो. उपाशी थोडाच असतों."

" रंगा, आज तुला कांहीं विचारण्यासाठीं मी आलें होते."

" काय बरें ?"

" माझ्या बाबांच्या मोठ्यामोठ्या राजेरजवाड्यांशीं ओळखी आहेत. मोठमोठे सरकारी अधिकारीहि परिचयाचे. दिल्लीचा व्हाइसरायांचा बंगला

आहे ना? तेथें अनेक चित्रकारांना काम मिळालं आहे. बाबा तुलाहि तेथें काम देतील मिळवून. तुला एकदम कीर्ति मिळेल. मग मोठेमोठे राजेमहाराजे तुला बोलावतील. तूं होय म्हण. तुझी कला मागें पडून न राहो. एकदम माझा रंगा दिल्लीचा सम्राट् होवो."

रंगा विचारमग्न होता. दोघें मुकीं होतीं.

"सांग ना रंगा!"

"नको, नयना नको. ही खोली दिल्लीच्या राजवाड्याहून मला प्रिय आहे. येथें मी मोकळा आहे, स्वतंत्र आहें."

"तेथें कोण तुला तुरुंगांत घालीत आहे?"

"आपण कायमचेच तुरुंगांत आहोंत. इंग्रजानें गुलाम करून ठेवलेलें आहे. सारें राष्ट्र त्यानें मारलें. आणि माझ्या राष्ट्राचा अन्तर्बाह्य विकास अडवणाऱ्या सत्तेचे दिवाणखाने मी रंगवित बसूं? नयना, स्वतंत्र हिंदुस्थानांतील पार्लमेंट मी रंगवीन. तेथें राष्ट्राचा इतिहास रंगवीन. लोकमान्य न्यायाधीशासमोर गंभीरपणें म्हणत आहेत 'येथल्या न्यायासनापेक्षां श्रेष्ठ असें ईश्वरी न्यायासन आहे. त्याच्यासमोर मी निर्दोषीच आहें. माझ्या हालअपेष्टांनींच माझें कार्य पुढें जाईल.' तो प्रसंग मी चितारीन. आज मला येईल का रंगवतां? मिठाचा खडा उचलतांना हें रावणी राज्य मी समुद्रांत बुडवतों असें महात्माजी निर्धारानें उद्गारले. तें येईल चितारतांना? नयना, माझी कला मी विकणार नाहीं. माझ्या राष्ट्राचा सत्यानाश करणाऱ्याकडून माझ्या कुंचल्यांची प्रशंसा मला नको आहे. कोट्यवधि जनतेच्या संसारांतील सारा रंग ज्यांनीं नाहींसा केला, त्यांच्याकडून माझ्या कागदी रंगाची प्रशंसा मला नको. आमचे राजेरजवाडे, ब्रिटिशांचे पाय चाटणारे कुलुंगी कुत्रे! त्यांची कृपा मला नको. ज्यांना प्रजेविषयीं आस्था नाहीं, घोडे, शर्यती, जुगार, विलायती यात्रा, सतरा लग्नें, कोल्हीं कुत्रीं, खानपान- हे राजेरजवाडे म्हणजे का मानवजातीच नमुने? भ्रष्ट, पतित अशी ही विलास-लोलुपांची जात आहे. त्यांचा स्पर्शहि नको. मी उपाशी राहीन, परंतु यांच्या दारीं जाणें नको."

"रंगा, नयना साधी मुलगी आहे. मला कोठें आहे तुझी देशभक्ति?"

"नसेल तर घे. देशभक्ति नसणें म्हणजे कांहीं भूषण नव्हे. सर्वांना सभोंवतालच्या चराचर सृष्टीचें भान हवें. कलावंताला तर आधीं हवें. मला

दुःखी दरिद्री राहूं दे. म्हणजे मी दरिद्र नारायणाचा चित्रकार होईन. त्यांचा कलात्मक प्रतिनिधि होईन. नयना, तूं वाईट नको वाटून घेऊंस. हें काय तुझ्या मनांत आलें ?"

" नयना वेडी आहे. "

" खरेंच वेडी. आतां शहाणी हो. नवीन भावना शीक. "

" तूं शिकलास भावना ? या नयनाच्या भावना तुला कळतात ? उथळ आहेस तूं. जगाच्या भावना ओळखायला निघालेल्या, तुझ्यासमोर एक मुलगी आहे तिच्या भावना ओळखल्यास ? कां ती आली, कां जेवली, कां चुलीजवळ बसली, कां हक्कानें डबे शोधलेन, कां दिल्लीस चल म्हणते ? ती तुला दिल्लीचा सम्राट् हो म्हणाली. परंतु तिनें तुला आधीं स्वतःचा हृदयसम्राट् केलें आहे. आंधळा आहेस तूं. भावना शिकवायला निघाला. "

रंगा मुका होता.

" रंगा, तुझ्यावर मी प्रेम करतें. गेलीं कांहीं वर्षे मी दूर होतें. तूं दूर होतास. परंतु तूंच माझें जीवन व्यापलें आहेस. तूं कधीं केव्हां माझ्या जीवनांत शिरलास तें कसें सांगूं ? चोराच्या पावलांनीं कसा आलास तें आठवत नाहीं. परंतु अंगणांतून आंत आलास नि अखेर हृदयगाभाऱ्यांत जाऊन बसलास. तुला आहे कांहीं कल्पना ? आहे कांहीं भावना ? तुझें पदक माझ्याजवळ आहे. आईनें शेवटीं हृदयाशीं धरलेला तुझा फोटो माझ्याजवळ आहे. त्या दोन वस्तु म्हणजे माझी इस्टेट. माझे बाबा कुबेर आहेत. परंतु त्या संपत्तींत मला रस नाहीं. "

" मग मला कशाला श्रीमंत करतेस ! "

" रंगा, बाबा आपली मुलगी गरिबाला देणार नाहींत. तूं श्रीमंत हो. मग तुझ्या हातांत ते माझा हात देतील. म्हणून मी बाबांना म्हटलें कीं एका उत्तम चित्रकाराला द्याल का संधि ? म्हणून मी तुला विचारलें. रंगा, जा ना दिल्लीस !"

" तुझें माझ्यावर प्रेम आहे तर माझ्याबरोबर दारिद्र्याचा वसा घे. "

" बाबा काय म्हणतील ? "

" प्रेमासाठीं त्यांचा त्याग कर. "

" रंगा, जीवन इतकें साधें सुटसुटीत नाहीं. अनेक आंतडीं गुंतलेलीं असतात. घाव घाल कर तुकडे असें नाहीं करतां कामा. बाबांची मी एकुलती

मुलगी. आईवेगळी मुलगी. त्यांचें माझ्यावर किती प्रेम ! ते मला लौकरच युरोपांत नेणार आहेत. जगांतील सर्व चित्रशाळा बघून मी येईन. तूं येशील आमच्या बरोबर ?"

"नाहीं. दरिद्री चित्रकार कशाला बरोबर ?

"माझें जीवन श्रीमंत करायला. माझ्या जीवनांत रंग भरायला"

"सुनंदाआईंना सोडून मी कसा येऊं ? तें बरें नाहीं. नयना, तुला कांहीं वाटत असलें तरी तुझ्या वडिलांचे पैसे घेऊन येणे म्हणजे मिंधेपणाच. तुला माझ्याविषयी वाटते, तें त्यांना थोडेंच वाटेल ? तूं ये जाऊन. तुझी कला समृद्ध करून ये. मला तिकडचें ज्ञान दे."

".माझा हात हातांत घे म्हणजे मिळेल."

"परंतु दरिद्री रंगाच्या हातात तुझा हात कोण देणार ?"

"तूं श्रीमंत हो."

"तूं गरीब हो."

"रंगा, गरीब हो गरीब हो म्हणतोस. अरे पत्नी उद्यां आई झाली म्हणजे आपलीं मुलें दारिद्र्यात गारठावीं असे तिला वाटेल का ? मुलांना खाऊ द्यावा, खेळणीं द्यावीं, सुंदर आंगडी त्यांना घालावीं असें नाही वाटत ? तूं माझें ऐक. तूं दिल्लीचा कलावान् हो. कीर्तिमान् हो, संपन्न हो. मग माझे बाबा नाहीं म्हणणार नाहींत. ही नयना तुझी आहे, तुझीच मग होईल. रंगा, म्हणना होय. दे ना रुकार !"

"नको नयना. दिल्लीचा मोह नको. दिल्लीला सर्वांचा नाश होतो. तेथलें वैभव क्षणभर शोभतें नि धुळीस मिळतें. दिल्ली दुर्दैवी जागा आहे. भाऊबंदकीची, स्पर्धेची, सत्तेची, मारामारीची जागा. दिल्लीच्या जवळच कौरवपांडव लढले नि गेले. पठाण आले, मोगल आले, मराठे आले सारे आले; नि गडप झाले. इंग्रजहि जाईल."

"रंगा, अरे जगांत सारेच जायचे असतात. कोणी खेड्यांत राहिला म्हणजे मरत नाहीं असें नाहीं ? आणि रोमचें वैभव का राहिलें ? बाबिलोन, निनवी, बगदाद, गझनी, कोठें आहे त्यांचे वैभव ? विजयनगर, द्वारका, राजगृह, कोठें आहे तेथलें वैभव ? तू दिल्लीला कशाला नांवें ठेवतोस ? उद्यां स्वतंत्र हिंदुस्थानची राजधानी दिल्लीच होणार. का नागपूर करणार ? दिल्लीच्या भोंवतीं विध्वंस नि

विनाश असले तरी तेथें एक तेजोवलयहि आहे. तूं असा अंध श्रद्धाळू असशील अशी नव्हती कल्पना. जाऊं दे या गोष्टी. रंगा, तूं मला रुकार दे. दिल्लीचे बंगले रंगव. एखादे चित्र भिंतीवर रंगव. मग त्याची स्तुति सातासमुद्रांपलीकडच्या पत्रांतून येईल. या खोलींत बसून भारताचें नांव दिगंतात कसें नेणार तूं? संधि शोधली पाहिजे, मिळत असेल तर पकडली पाहिजे आणि माध्याच्याजवळ गेलें पाहिजे. रंगा, सांगना.

"लहानशा खोलींत बसूनच मी भारताचें नांव दिगंतांत नेईन. लहानशा खोलींतील मलमलीच्या विणकरांनीं जगभर भारताचें नांव नेलें. प्रभूची इच्छा असेल तर रंगाला तें शक्य होईल परंतु इंग्रजी अधिकाऱ्यांचे बंगले रंगवायला मी येणार नाहीं."

"रंगा, कलावान् का द्वेषाचा पुजारी असतो? तूं इंग्लडांत गेलास तर तेथली कला नाहीं पाहाणार? इंग्रजी पुस्तकें वाचना. त्यावेळेस नाहीं म्हणत कीं आम्हाला गुलाम करणाऱ्यांचें काहीं नको असें. तुला तुझी कला संकुचित न बनवो."

"नयना, कलेने विशाल क्षितिजें दाखवावी हें खरें. कलावानच जगाचा ऐक्यकर्ता. खरी कला सर्वांना जोडील. मी इंग्रजव्यक्तींचा द्वेष नाहीं करीत. परंतु गुलामगिरीचें प्रतीक ठरलेल्या बंगल्यात मी ध्येयवादी चित्र कसें रंगवूं! आणि तेथे सहन तरी कोण करील? मी तेथे माझ्या इच्छेप्रमाणें थोडेंच रंगवूं शकणार आहे? त्याच्या इच्छेचा गुलाम."

"आज येथे तूं ज्या संस्थेत नोकर आहेस तेथे नाहीं का गुलाम? जगांत केवळ निरपेक्ष, निरुपाधिक स्वातंत्र्य रंगा नाहीं. थोडेफार तरी आपण कशाचे-तरी गुलाम असतो."

"नयना, उशीर होत आहे. मला नको दिल्ली. स्वातंत्र्य येऊं दे. मग मी दिल्लीला रंगवायला जाईन. तूं ये युरोपांत जाऊन. पत्र पाठवीत जा."

"तूं सारखा उशीर होईल उशीर होईल म्हणत आहेस. मी जावें अशी का इच्छा?"

"नाहीं नयना. तूं बस. जन्मभर येथें बस. मी कंटाळणार नाहीं. परंतु दिल्लीची बात नको. मला दिल्लीचा सम्राट् नको बनवूं; तुझ्या खोलींतील झाडूवाला बनव. तो माझा मोक्ष आहे."

बराचवेळ तेथें मूकता होती. शेवटीं नयना उठली.

"रंगा, नयना साधी मुलगी आहे. मला ना ध्येयवाद, ना राष्ट्रवाद, ना कांहीं. मी साधी सांसारिक दृष्टीची मुलगी. क्षमा कर. तूं मोठा हो. स्वतंत्र भारतांत तुझी कला फांको, चमको. तोंपर्यंत ती अधिक अर्थवाही कर; खोल, गंभीर, समृद्ध कर. स्वतंत्र भारताला तुझी थोर कला अर्पण कर. येतें मी. रंगा, नयनाला विसरून जा. मी जमीनीवरून चालणारी. दारिद्र्यांतील वैभव मला दिसत नाहीं. शंकराच्या विभूतींतील वैभव गौरीशंकरावरील गौरीलाच कळणार, तितक्या उंचीवर जाणाऱ्या स्त्रीलाच कळणार. तूं महान् आहेस, मी लहान आहें. येतें रंगा. सुखी अस. पोटभर जेवत तरी जा. माझी शपथ आहे तुला. तुझ्या आईची शपथ. येतें रंगा. रागवूं नको. क्षमा कर मला" असें म्हणून नयना गेली.



# ताईची भेट : : : १४

“त्याच्यावर होतें कीं नाहीं तुझें प्रेम? बोल. कबूल कर. त्याच्याबरोबर पळूनहि गेली असतीस. गुलगुल गोष्टी करीत त्याच्याजवळ बसस. होतें कीं नाहीं तुझें प्रेम त्याच्यावर?”

तो तिला असें विचारायचा, छळायचा, मारायचा. तिला जीवन असह्य झालें. एका बाजूला तीं जागा होती ना आधार, ना विसांवा. लहान लिलीकडे बघून ती जीवन कंठी. तीहि भाऊ भाऊ म्हणायची. परंतु पित्याच्या देखत ती भाऊ भाऊ हाक मारीत नसे.

लिली तापानें फणफणत होती. ती आईच्या मांडीवर होती.

“भाऊ, आई, भाऊला बोलव. कोठें आहे भाऊ” असें ती तप्त मुलगी विचारी. मातेच्या नयनांतील पाणी उत्तर देई.

“देवा घरीं जा नि भाऊच्या पोटीं ये. तुला मग भाऊ मिळेल. तो तुला मग घेईल. हो लिले. येथें नाही भाऊ यायचा. येथे कोण त्याला येऊं देईल? आणि तो तरी कोठें असेल तें देवालाच माहीत. त्याची काय स्थिति असेल तें आपल्याला कोठें आहे ठाऊक?”

ताई लिलीजवळ बोलत बसे. लिली वांचेल असें वाटत नव्हतें.

“आज जरा अधिक आहे मुलीचें. तुम्ही घरींच रहा.”

“ऑफिसला गेलेंच पाहिजे. आणि ती वातात भाऊ भाऊ म्हणते. मला नाहीं सहन होत. तें भाऊ भाऊ बंद होऊं दे.”

“आतां बंद व्हायला वेळ नाहीं.”

“मी येतोंच कचेरींतून.”

तो गेला. ताई जेवली नाहीं. लिलीचीं शेवटचीं घटकापळें होतीं. आई मुलीला घेऊन बसली होती.

"लिली, बाळ, जा हो देवाघरीं. आईलाहि बोलावणें पाठव. भाऊ भाऊ नको करूं. या जन्मीं नाहीं आतां तो भेटणार."

ती मुलगी तडफडत होती. डोळे एखादेवेळेस स्थिर करी. तिला का भाऊ समोर दिसे? आणि एकदम तिनें मान टाकली. तें सुकुमार फूल आईच्या मांडीवर कोमेजून पडलें. आईचे डोळे तिला शेवटचे स्नान घालित होते. मांडीवर मुलीचा देह घेऊन ती माता दगडाप्रमाणें अचल अशी तेथे बसली होती. तिच्या जीवनांत अंधार होता. आणि आतां बाहेरहि अंधार येऊं लागला. ताईच्या डोळ्यांतील अश्रु वाळले होते. ती तेथे पाषाणवत् बसली होती. पति घरीं आला, त्यानें बटण दाबून दिवा लावला. परंतु विजेचा प्रकाश जीवनांतील अंधार दूर करूं शकत नव्हता.

"लिली गेली वाटतें." त्याने विचारलें. तिच्या डोळ्यांतील उरल्या-सुरल्या अश्रूंनी उत्तर दिलें. त्याने मुलीचा देह घेतला. तो बाहेर निघून गेला. त्या मुलीच्या देहाची शेवटची व्यवस्था लावायला तो गेला.

ताई बसून होती. शेवटीं ती उठली. तिनें चूल पेटवून पिठलें भात करून मग जमिनीवर आंग टाकलें. तिला कोठली खाण्याची इच्छा? तिच्या साऱ्या इच्छा अस्तास गेल्या होत्या. परंतु पतीला जेवायला लागेल, आल्यावर पान वाढ म्हणायचा म्हणून त्या मातेनें हंडी शिजवून ठेवली. लिलीचे कपडे हृदयाशीं धरून ती पडली होती. देहाचें वस्त्र स्मशानांत गेलें. परंतु हीं वस्त्रें घरांत होतीं. तीं ताईच्या थंडगार जीवनाला ऊब देत होतीं.

सारें आटोपून तो आला. ती उठली. तिनें पाट ठेवला, पान वाढलें. तो मुकाट्यानें जेवला. पतीची गादी तिनें झटकून दिली. तो पडला. तीहि स्वयं-पाक घरांत एक चटई टाकून पडली. अंधार, सारा अंधार. तिला मधून मधून रडूं येत होतें. काय हें जीवन असें तिला वाटलें.

परंतु कांहीं दिवस गेले. तिच्यांत आतां क्रान्ति दिसूं लागली. ती निर्भय, निःस्पृह बनली. ती गरीब गोगलगाय राहिली नाहीं. ती तेजस्वी ज्वाला बनली. ती करुणमूर्ति आतां नव्हती. ती वज्राप्रमाणें कठोर बनली. ती अबला नाहीं राहिली, थरथरणारी वेल नाहीं राहिली. ती धैर्यमंडपाचा स्तंभ बनली.

"होतें कीं नव्हतें त्या पोरावर तुझें प्रेम?" त्या रंगाऱ्यावर, त्या चिताऱ्यावर?"

" पुन्हां असें विचाराल तर याद राखा. अंगावर निखारे ओतीन. तुम्हांला नीट जगायचं असेल तर असें बोलत जाऊं नका. आपल्या गांठी दुर्दैवानें पडल्या आहेत खऱ्या. दोन वेळां जेवा नि स्वस्थ रहा. नागिणीला डिवचूं नका. खबरदार कांहीं बोलाल तर."

तो चकित झाला. तिच्याकडे तो बघत राहिला.

" दुर्दैवानें गांठी पडल्या याचा काय अर्थ ? याचा अर्थ हाच नाहीं का तुला त्याच्या प्रेमाचें, त्याच्याजवळ गुलगुल गोष्टी करण्याचें सुदैव हवें होतें ? बोल. खरें सांगायला काय जातें ? तूं एवढी धीट नि उर्मट होऊन बोलत आहेस तर या प्रश्नाचें उत्तर कां नाही देत ! सांगून टाक कीं होते त्याच्यावर प्रेम "

"तुम्हांला लाज नाहीं वाटत पुन:पुन्हां असें बोलायला ! आपला संसार आठवा. किती प्रेमानें मी तुमचें सारे करी. लिली, हा तुमच्या माझ्या जीवनांतील आनंद. परंतु रंगामुळें तुम्ही संशयी झालांत. मला भाऊ नाहीं कोणी नाहीं. माहेरचें कोणी नाही. आम्हा बायकाचे हृदय कळतें का तुम्हांला ? तो मुलगा शेजारीं आला. घरची गरीबी. त्याची आई नाही. बाप तर लहानपणीच गेला. तो हातानें स्वयंपाक करी. लिलीला फिरायला नेई. मित्र येणार म्हणून पहाटे उठून पुरणपोळी करणारा. मला त्याचे कौतुक वाटे. त्याला कधीं भाजी द्यावी, चटणी द्यावी. शेजारधर्म म्हणून असतो. बहीणीला भाऊ हवा असतो. तो मला दिवाळीला एक चित्र भाऊबीजेची ओवाळणी म्हणून देणार होता. रात्रं-दिवस काम करी, तो थके. आजारी होता त्या दिवशीं. त्याच्याजवळ नको का जरा बसूं, नको का धीर देवूं ! तुमचीं मनेंच पापी; संशयखोर. जेथें तेथें तुम्हांला विषयवासना दिसते. किडे मेले. आणि तुम्हीं. पाप्यांनीं आम्हांला येतां जातां बोलावे ? तुम्ही का जीवनांत निर्मळ आहांत ! मी समजा पापिणी, दुसऱ्यावर प्रेम करणारी. तुम्ही सर्वस्त्रियांकडे माता म्हणूनच बघतां ना ? कधीं दुसरी भावना नाहींना मनांत आली ? बोला, स्पष्ट बोला."

तिचें बोलणें ऐकून तो थंडगार झाला. कधीं न बोलणारी बायको फाड-फाड बोलूं लागली. तो जरा भ्यायला, जपून वागूं लागला. घरांत आतां दोघांचा अबोलाच असे. कांहीं दिवस गेले. एके दिवशीं तो कचेरींतून आजारी होऊन आला. घरीं येऊन आंथरुणावर पडला. तिनें कांहीं विचारलें नाहीं.

"चहा दे थोडा करून" तो म्हणाला. तिनें कपभर नेऊन दिला. तो पडला. परंतु तिनें तापबीप आहे का पाहिलें नाहीं. रात्र झाली. तिनें स्वयंपाक केला.

"पान वाढूं का" तिनें विचारलें.

"तापानें मरतों आहें आणि पान वाढूं का विचारतेस? तूं आहेस कोण हडळ? चांडाळीण?"

"तुम्ही कोण आहांत समंध, पिशाच? माझ्या मांडीवर लिली तापानें फणफणलेली असे. तरी तुम्ही कचेरींत विडा चघळीत जात असां? तिचा देह कचरा उचलावा तसा उचललात नि नेलात. आल्यावर राक्षसाप्रमाणें जेवलेत? तुम्ही कोण? कोणती तुमची जात? बोला. आतां का दांतखिळी बसली? मी आतां पोटभर जेवतें. मला काय म्हणून तुमच्याविषयी कांहीं वाटेल? माझें रंगावर ना प्रेम? तुमच्यावर नाहीं ना? तुम्ही परपुरुष ना? तुमच्या अंगाला हात लावून ताप आहे कीं नाहीं कसें बघूं? हा हात का तुम्हांला आवडतो? या हाताला तुम्ही टांचण्या टोंचल्यात. रंगा तुझ्या हातावर चित्रें काढी असें म्हणून या तळहाताला टांचण्या टोंचल्यात आठवतें का? का मेली स्मृति? मी चित्र काढित होतें, हाताला रंग लागला म्हणून सांगितलें. परंतु तुम्हांला कावीळ झालेली. माझें बोलणें खोटें! पडा फणफणत तापानें. त्या मुलीला मारलेंत. भाऊभाऊ तापांत म्हणे तर तिच्या थोबाडींत मारलीत! मला चांडाळीण म्हणतां? आपण कोण? मी आज चांडाळीण असेन तर ती तुम्ही बनवलीत. मी मूळची तशी नव्हतें. तुमच्या दुष्टपणान मला आकार दिला आहे. तुमच्या संगतीनें मीहि चांडाळीण बनलें. जें पेरावें तें उगवतें. माझ्या जीवनांत निखारे कांटे पेरलेत. आतां खा निखारे नि कांटे."

ती स्वयंपाकघरांत गेली. आणि ती खरंच जेवली. तिनें त्याची वास्तपुस्त घेतली नाहीं ती आंथरुणावर पडली. तिनें दिवा मालवला होता. तो तापानें विव्हळत होता.

"थोडें पाणी देतेस का?"

ती उठली. तिनें त्याला पाणी दिलें. परंतु एक शब्द ती बोलली नाहीं. उजाडलें. ती डॉक्टरकडे गेली नाहीं. तिनें त्याला चहा दिला. तो जें मागे तें ती देई. ती जवळ बसली नाहीं. तिनें पाय चेपले नाहींत. ती स्वयंपाकघरांत बसे.

त्याच्या कचेरींतील त्याचा एक मित्र आला.

" कायरे आजारी का ? "

" ताप येतो. "

" औषध "

" निघेल ताप. डॉक्टर तरी कोण आणणार ? "

" मी आणतों "

त्या मित्रानें डॉक्टर आणला. येताना कांहीं फळें आणलीं. डॉक्टरानें तपासलें. मित्र डॉक्टरांबरोबर गेला नि औषध घेऊन आला.

" औषध घे मी जातों " असें म्हणून तो गेला. मोसंबीं कोण सोलून देणार ? आणि हात धरून मोरींत कोण नेणार ? बेडपॅन कोण देणार ?

" माझा हात धरून नेतेस का ? "

" रंगानें ना रंगवला हा हात ? हा हात चालेल का ? हा माझा अमंगल हात ? "

" नको छळूंस. नको वाभाडे काढूंस. "

एके दिवशीं तो तिला म्हणाला:

"मला रंगाला पत्र लिहायचें आहे. त्याची क्षमा मागतों. मेलों तर मनाला रुखरुख नको. लिलीची क्षमा देवाघरीं मागेन."

"तुम्हांला का देवाच्या घरांत घेतील ?"

"तो सर्वांचा आहे. देवाच्या घराबाहेर मनुष्य कोठें राहील ? ही खोलीहि त्याचीच. येथेंहि तो आहे. ही जाणीव ठेवून वाग. आपण जणूं नेहमीं देवघरांत असतों."

" ही बुद्धि आज बरी सुचली ? "

" प्रभूची कृपा."

तिनें त्याला कार्ड दिलें. त्यानें लिहिलें.

"यावर पत्ता लिही. तुला कांहीं लिहायचें असलें तरी लिही" तो म्हणाला.

परंतु तिनें कांहीं लिहिलें नाहीं.

"प्रिय रंगा

मी तापानें अव्यवस्थ. वांचेन असें नाहीं. तुमची क्षमा मागूं इच्छितों. मरणशय्येवर असणाऱ्याची इच्छा पूर्ण करा."

अशा अर्थाच्या त्या दोन ओळी होत्या. तिनें पत्ता लिहून कार्ड टाकलें. तिच्या मनांत अनेक शंका येत होत्या. रंगा त्या खोलींत असेल का? त्यानेंहि खोली बदलली असेल. त्याला तेथे आमच्या आठवणी येत असतील. कसा राहील भाऊ तेथें? आणि त्याच्या घरीं काय अवस्था असेल? घर, कोठें आहे त्याला घर? वासुकाकांचें घर. सुनंदा आईचे घर. कोठे असेल रंगा? किती दुःखीकष्टी असेल? परंतु असला तर येईल का? ज्यानें अपमान केला, नाहीं नाहीं तें जो बोलला, त्याच्याकडे येईल का तो स्वाभिमानी मुलगा?

रंगाला पत्र मिळालें. तो बुचकळ्यांत पडला. त्याला सर्व आठवणी आल्या. ताई, लिली सारीं डोळ्यासमोर आलीं. ते भिंतीवर तेथे चित्र होतें. जावें का ताईकडे? खरें असेल का पत्र? तो उठला. कपडे करून बापूसाहेबांकडे गेला.

"काय रे रंगा, बरेच दिवसांनीं आलास. जेवायला थांबणार का? मल्हार आहे आज"

"बापू, मला जायचे आहे. काम आहे" असें म्हणून त्यानें हकीगत सांगितली. तें पत्र त्याने त्याना दाखविलें.

"रंगा, जायला हवें बाळ. कसले मानापमान? सर्वांना एक दिवस मातींत जायचे आहे. तुमचे आमचे अहंकार, त्यांची चिमुटभर राख व्हायची आहे. जा. त्यांची शुश्रूषा कर. आत्मा सर्वत्र ना आहे? तें अशा वेळेमच अनुभवायचें असतें. जा. तुझ्या ताईला धीर दे. लिलीला भेट. यांनाहि बरे कर. त्यांचा पुनर्जन्म होत आहे."

थोडी पोळी उसळ खाऊन रंगा निघाला.

"आला का ग रंगा" त्यानें विचारलें.

"नाहीं आला."

"किती वाजले?"

"नऊ वाजून गेलें."

"अजून येण्याची अवधि आहे. तो येईल. कलावान् सहृदय असतात. तो येईल. तूं त्याच्यासाठीं स्वयंपाक करून ठेवला आहेस? तो येथेंच राहूं दे

चार दिवस. हें घर त्याचेंच. तो येथें राहील. परलोक ज्याला दिसूं लागला त्याची इच्छा तो मोडणार नाहीं."

तो डोळे मिटुन पडला. आणि थोड्या वेळानें दारावर कोणी तरी टकटक केलें.

"भाऊ आला" ती म्हणाली.

लगबगीनें उठून तिनें दार उघडलें. रंगाची धीरगंभीर मूर्ति आंत आली.

"ताई, बरी आहेस ? यांचें कसें आहे ?"

"बघ तूंच"

तो त्यांच्या उशाजवळ बसला. ताप खूप होता. ते डोळे मिटून होते.

"थर्मामीटर आहे का ?"

"नाहीं"

"ताप बराच असावा. मी एक थर्मामीटर आणतों. औषध कोणाचें ? कोण डाक्टर ?"

त्यानें औषधाची बाटली पाहिली. तिच्यावर सारें होतेंच. तो बाहेर पडला. थोड्यावेळानें थर्मामीटर वगैरे घेऊन आला.

"कोण रंगा ?" एकदम उठून अमृतरावांनीं विचारलें.

"पडून रहा हां. आतां बरे व्हाल."

"आतां कायमचें बरें व्हायचें. नको इथली यातायात. ती बघा लिली. मला बोलवते आहे. मरतांना भाऊ भाऊ म्हणे. मी तिला मारलें. ते पहा तिचे गाल. मी मारल्यामुळें लाल झाले आहेत. लिले, क्षमा मागायला येतों हां बाळ. तूं पित्याचा हात धर व त्याला देवाजवळ ने. रंगा, तुमची क्षमा मागतों. तुम्ही जेवा जा. यांना वाढ ग. भूक लागली असेल त्यांना."

"तुम्ही बोलूं नका."

"बोलूं दे. मनांतील वेदना बाहेर ओतूं दे. आतां सारा खेळ संपणारच आहे. हिला मी छळलें. क्षमा कर म्हणावें. रंगा, तिला तुम्ही आधार द्या. देवाचा सर्वांनाच आहे."

"तुम्ही बरे व्हा. सुखाचा संसार करा."

तो उठला नि स्वयंपाक घरांत गेला.

"ताई, लिली कधी ग गेली?" त्याने स्फुंदत विचारलें. तिनें बिऱ्हाड बदलल्यापासून सारा वृत्तान्त सांगितला.

"रंगा, मी त्यांची सेवाचाकरी करित नाहीं. माझें नाहीं मन एवढें मोठें."

"ताई, मन मोठे करायला हवे. अपर्णाहि का पाषाण व्हायचे?"

"नवऱ्यांनींच अहिल्येसारख्या सतींचे पाषाण केले. स्त्रियाचा काय दोष?"

"परंतु त्या पाषाणांना इतकी जाणीव, इतकी संवेदना नि जागृति कीं रामाच्या चरणांचा जरा स्पर्श होतांच त्यांतून त्या पुन्हा अहिल्या होऊन उभ्या राहिल्या. ताई, पुनःपुन्हां मनुष्य पाषाणयुगात जात असतो. पुनःपुन्हां त्यानें रामराज्यांत जायची धडपड करायची असते. पाषाण युगातून सुवर्णयुग आणायचें असते."

"रंगा, थोडें जेवतोस ना?"

"लिलीला जवळ घेऊन जेवेन असे मनांत म्हणत आलो."

"जेव हो दोन घांस. तूं येशील असेंच वाटत होते तुझ्या आवडीची भाजी केली आहे."

"ते तिकडे आजारी असतां मी का आवडीची भाजी खात बसूं? ताई, तूं कठोर झाली आहेस."

"तुझ्या बाबतींत नाहीं".

"परंतु अमृतरावांना रस तरी काढून दिलास?"

"ज्यानें माझें जीवन नीरस केले, कुस्कुरले, त्याला कशाला रस देऊं?"

तो उठला. त्यानें मोसंब्यांचा रस काढला.

"थोडा रस घेता ना?" त्यानें प्रेमानें विचारलें.

"कोण रंगा? द्या. तुमचे थोर हात क्षमाशील आहेत. देवाकडे जातांना माझें जीवन सुंदर रंगवून पाठवा बरें का?"

"पश्चात्ताप झाला कीं जीवन सुंदर होतेंच."

त्यानें रस दिला. तो पाय चेपीत बसला.

"तुम्ही जेवा जा. उशीर झाला आहे. बरीच रात्र झाली. जा जेवा."

तो उठला नि आंत गेला.

"ताई वाढ पान. तुझ्याहि भावना मी ओळखायला हव्यात. वाढ भाजी भरपूर."

तिनें पान मांडलें.

"तूंहि माझ्याबरोबरच बस. मागून कशाला?"

"रंगा, आपण एकाच ताटांत जेवू."

"तूं वेडी आहेस ताई. आपण का लहान बाळें?"

तिनें आपलें ताट वाढून घेतलें. दोघें जेवलीं. तिनें त्याच्यासाठीं स्वच्छ आथरुण घालून दिलें. धुतलेली चादर, स्वच्छ अभ्र्याची उशी.

"ताई, त्यांच्या आथरुणावरची चादर कधीं बदलली होतीस, त्यांच्या उशीचा अभ्रा कधीं बदलला होतास?"

"रंगा, त्यांची सेवा करण्याइतकें मोठें मन माझें नाहीं. मला त्यांचा वीट आला आहे. त्यांचे शब्द मी कसे विसरूं? केलेले छळ कसे विसरूं? लिलीचें मरण कसें विसरूं?"

भाऊ बोलला नाहीं त्यानें अमृतरावांना हळूच कुशीवर केलें. इकडची चादर गुंडाळून घेतली. पुन्हा इकडे करून तिकडून काढून घेतली. मग स्वच्छ चादर त्यानें घातली. उशीला नवा अभ्रा घातला.

"ताई, धुतलेला शर्ट आहे?"

"आहे."

"दे आणून."

त्यानें त्याच्या अंगांत स्वच्छ सदरा हळकेच घातला.

"रंगा, तुम्ही मला नवीन करित आहांत, निर्मळ करित आहांत, देवाकडे सुंदर करून, सुंदर कपडे घालून पाठवित आहांत. होय ना? तुम्ही आतां निजा. दमलांत. मी आतां बरा होईन. कायमचा बरा. पुन्हां नको आजारीपण."

रंगानें आंथरुणावर आंग टाकलें. ताई स्वयंपाकघरांत पडली. मधूनमधून रंगा उठे. जवळ बसे. असें चाललें. उजाडले आतां.

"ताई, मी रजा घेऊन येतों चार दिवसांची."

"येथूनच अर्ज टाक पोस्टांत. नको जाऊंस. मला एकटीला येथें भय वाटत."

"बरें तर. आणि बर्फ आणायला हवा. तूं आणतेस? मी त्यांचें स्पंजिंग करतों."

ताई बर्फ आणायला गेली. रंगानें अमृतरावांचें अंग कढत पाण्यानें पुसून काढलें. त्या रोग्याला किती प्रसन्न वाटलें.

" रंगा, छान केलेंत. सारी घाण धुवून टाकलीत. आतां देवाघरीं मान उंच करून जाईन. जगांत मान खालीं झाली तरी चालेल परंतु देवासमोर तरी नको. सांगेन त्याला कीं बरबटलों होतों परंतु पुन्हां अंतर्बाह्य शुचि होऊन आलों आहे. ती बघा लिली. हातांत माळा घेऊन माझ्या स्वागतासाठीं उभी आहे. तिच्या हातांत तुम्ही काढलेलें एक चित्र आहे. मरतांना तिच्या आईनें चोरून ठेवलेलें एक चित्र तिच्या हातांत दिलें होतें. तुमची आठवण करी ती. मी सांगे कीं भाऊ खुशाल आहे. त्याला भेटून आलों. लिली, बाबा निर्मळ होऊन, पुण्यवान् होऊन येत आहेत हें तिलाहि कळलें. नाहीं का ही ? नाहींतर हार घेऊन स्वागताला कशी उभी राहाती ? ती बघा. रंगा, दिसते का तुम्हांला ? नाहीं ना ? तुम्ही चित्रकार ना ? एक डोळा मिटून बघा. नाहींतर दोन्ही मिटा. म्हणजे अगदीं छान दिसेल. माझे डोळे मिटत आले म्हणून तर ती दिसूं लागली. जगांतले डोळे मिटूं लागले म्हणजे केवढें विश्व दिसूं लागतें, केवढी अदृश्य दुनिया दिसूं लागते. लिले, येतों हां बाळ. "

तो बोलत होता. ताई बर्फ घेऊन आली. त्यानें डोक्यावर पिशवी धरली. परंतु लक्षण ठीक नव्हतें. नाडीचे ठोके १४० ! तो डॉक्टरांकडे गेला व त्यांना घेऊन आला.

" कठिण आहे " ते म्हणाले.

त्यांनीं एक इंजक्शन दिलें. ते गेले. रंगा बसून होता. त्या धडपडणाऱ्या जीवाची वेदना बघत होता. शारीरिक वेदना नि मानसिक.

" रंगा, मुक्त झालों मी. सारे व्रण बुजले, सारी घाण गेली, सारें पाप भस्म झालें. "

तो निपचित पडून होता.

" क्षमा करा दोघें मला. " सारें शान्त.

दुपारची बाराची वेळ. अमृतरावांनीं राम म्हटला. अमृतस्वरूपी परमात्म्यांत ते मिळून गेले.



रंगानें मृताचें सारें केलें. तो आतां ताईकडे नसे रहात. पहिल्या दिवशीं होता. नंतर येई जाई. ताईचें काय करायचें हा प्रश्न होता. तें बिऱ्हाड मोडायचें का? ठेवूं म्हटलें तर भाडें कोठून द्यायचें? ताईचें फार शिक्षण नव्हतें झालेलें. लिही वाची. परंतु शेवटची परीक्षा कुठलीच नाहीं.

"ताई, तूं दुधगांवला जातेस? सुनंदाआईजवळ रहा. त्याहि एकट्या असतात. आजारी असतात. त्यांना बरें वाटेल. येथें मुंबईत कशी राहशील? येथील जीवन खर्चाचें. मी तिकडे तुम्हां दोघींना पैसे पाठवीन. रहा दोघी शान्तपणें."

"रंगा, कांहीं दिवस इथेंच राहूं दे. हा सारा पसारा आटपायचा. हें सामान"

"तें मालगाडीनें दुधगांवला पाठवून देऊं. उगीच माशा मारीत येथें कशाला रहायचें? तुला शिकायची इच्छा आहे का? परंतु बापुसाहेबांना भेटून कांहीं खटपट करायला हवी. आतां पुढील वर्षींच. शिकायचें आहे का तुला?"

"तुझी इच्छा असेल तर मी शिकेन."

"तुझी इच्छा हवी."

"मला इच्छा नाहीं. माझी सारी इच्छा मी तुला दिली आहे."

समोर समुद्र उचंबळत होता. केवढी भरती! रंगा सागराकडे बघत होता नि ताई रंगाकडे बघत होती. कोणी बोलत नव्हतें. एकदम रंगानें ताई-कडे पाहिलें. त्याचे डोळे खालीं झाले.

"रंगा, बघ ना माझ्याकडे. माझे डोळे वाईट नाहींत. ते प्रेमळ आहेत. बघ, माझ्याकडे बघ. खालीं नको बघूं. तो समोर समुद्र उचंबळतो आहे ना तसें

माझें हृदय उचंबळत आहे. काय सांगूं कसें बोलूं? रंगा, तूं रागावलास? बघ माझ्याकडे."

त्यानें तिच्याकडे पाहिलें नि समोरच्या समुद्राकडे तो शून्य दृष्टीनें पाहूं लागला.

"तो समुद्र तुला आवडतो, माझा हृदयसमुद्र नाहीं आवडत? धाडधाड लाटा या हृदयांत उसळत आहेत. तुफान आहे हृदयांत. तूं ये नि शान्त कर. रंगा, रंगा, काय सांगूं? तूं का मला सोडून जाणार? रंगा, तूं माझा हो. माझा संसार पुन्हां मांड. बिऱ्हाड मोडायचें कशाला? पुन्हां मांडूं. छान मांडूं. माझें जीवन रंगव. लिली आपल्या पोटीं येईल. रंगा, मला निराश नको करूं. माझें जीवन तूं व्यापलें आहेस. माझ्या अणुरेणूंत तूं आहेस. माझा श्वासोच्छ्वास तुझा. या माझ्या देहांत तुझा आत्मा, तुझा प्राण मला अनाथ नको करू. एका अबलेच्या जीवनांत आनंद आण. तिच्या जीवनाचें वाळवंट फुलव. माझी बाग उध्वस्त झाली होती. तेथें साप विंचू, दगडधोंडे. तूं ये नि बाग फुलव. पुन्हां प्रेमाचीं कारंजीं उडव. प्रीतीचे ताटवे फुलव. आनंदाचे झोके बांधूं. तू नि मी त्यांवर झोके घेऊं. उंच झोके. गगनाला भिडूं. भय ना भीति. तूं बरोबर असलास म्हणजे कोणाचें भय? रंगा, तूं कां नाहीं बोलत? तूं रागावलास? तूंहि का माझ्यावर आग पाखडणार? भाजून निघालेलीला आणखी भाजणार? मी आतां तुझी ताई नाहीं. ताई मेली, कधींच मेली. मी निराळी आहें. निराळ्या नात्याची, निराळ्या वृत्तीची.

"तर मग अमृतराव म्हणत ते खरें? ते उगीच नाहीं रागावले? तूं का माझ्यावर असलें प्रेम करित होतीस? या भावनेनें माझ्या आजारांत मला थोपटलेंस?"

"त्या वेळचा माझा स्पर्श तुला बहिणीचा नाहीं वाटला? तुला ओळखतां आला असता तो स्पर्श. त्या वेळेस तूं माझा भाऊ होतास, मी ताई होतें. परंतु मला आतां निराळा रंग चढला आहे.

मी माणूस आहें. रंगा. गेले कित्येक दिवस, कित्येक महिने येतां जातां ते मला म्हणायचे कीं त्याच्यावर होतेंच तुझें प्रेम. कर कबूल. सारखी तुझी मूर्ति ते माझ्या डोळ्यांसमोर उभी करायचे. ते मला टोंचण्या टोंचीत नि विचारीत. जणूं टोंचण्या टोंचून तुझी मूर्ति माझ्या रोमरोमांत ते गोंदित होते. आम्ही कायमचा गोंदून घेतों.

सुईनें ललाट टोंचतों व आत रंग भरतो. गाल टोंचतो नि रंग भरतों. त्यानीं तुझी मूर्ति माझ्यांत गोंदली रात्रंदिवस ते ऐकून ऐकून तुझी ताई मेली नि निराळी तरुणी जन्माला आली. दगडावरहि संतत धार धरली तर त्याला बदलावें लागतें. मी तर मनुष्य. कुंभारगा किड्याला टोंचते नि तो किडा निराळा होतो. तसें माझें झालें. त्यांच्या बोलण्यांत जे येई तें माझ्यांत भिनूं लागलें. आणि शेवटीं माझ्या हृदयसिंहासनावर तुझी मूर्ति शोभूं लागली. मी तुझी प्रेमपूजा करूं लागले. तूं आलास त्याच्या आजारात, त्या दिवशी तुझें स्वच्छ आथरुण घातलें, तुझ्या आवडीची भाजी केली, एका ताटांत जेऊं म्हटलें. मी तुझी आहे रंगा तुझी. त्यानीं मला तुझा रंग दिला आता मी कोठें जाऊं? हें बिऱ्हाड सोडून कोठे जाऊं? या बिऱ्हाडाचा आता तू धनी, तूं राजा. मला नको दूर लोटूं. माझ्या जीवनात अमृताचे झरे वाहव. त्या अमृतरावांनीं विषवन्हीनें सारें जाळलें. तूं शीतलता आण. ये, रंगा ये. माझ्या जीवन कुंजवनातला तूं गोपाळ. वाजव तुझी मुरली, प्रेमाची बांसरी. मला भूतकाळ विसरूं दे. केवळ उज्ज्वल भविष्य दिसूं दे. प्रेमाची नगरी उभी राहूं दे. सुंदर, शोभायमान. रंगा, हा घे माझा हात. धर हा हात. घे ना. कायरे यांत पाप आहे? यात ना दंभ ना पाप. या सागरासमक्ष, या आकाशांत उगवणाऱ्या तारकांसमक्ष, माझा हात हातांत घे. माझें खरें लग्न लाव."

तिनें आपला थरथरणारा हात त्याच्या हातांत घुसडला. तो स्तब्ध होता.

"ताई, हें अशक्य आहे. तूं माझी ताईच आहेस. ताईच रहा. लिलीची तूं आई. अमृतरावांची पत्नी."

"मी त्यांची पत्नी उरल्यें नाही. त्यानींच माझें तुझ्याशीं लग्न लावलें. कशाला काढतोस त्यांचें नांव? परंतु काढ. त्यांनींच ना तुला माझ्या जीवनांत रंगवलें. तेहि महान् चित्रकार. तूं कुंचल्यांनीं रंगवतोस, ते टांचणीनें रक्ताच्या रंगानें रंगवीत. अमृतराव, होय, ते महान् चित्रकार होते. तुझी मूर्ति माझ्या जीवनांत अनंत रंगांनीं भरणारे चित्रकार! त्यांना माझे प्रणाम. रंगा, माझी इच्छा पूर्ण कर."

"अशक्य. मी तुझा भाऊ तो भाऊ."

"मी तुझी राणी आहे, तूं माझा राजा. तूं माझा प्रियकर, मी तुझी प्रिया.

तूं गोपाळ, मी राधा. तुझें माझें आतां निराळें नातें. सर्व रीतीनें एकरूप होण्याचें नातें."

"तूं सुनंदाकडे जा."

"तिची सून म्हणून जाईन. आपण दोघें जाऊं. त्यांचे आशीर्वाद घेऊं. मी त्यांची सेवा करीन. तुझा आनंद तो माझा. परंतु मी तेथें तुझी म्हणून राहीन."

"माझी बहीण म्हणून, ताई म्हणून."

"नाहीं, तुझी प्रेममयी पत्नी म्हणून, तुझ्या जीवनाशीं एकरूप झालेली तुझी जीवनसखी म्हणून, सहधर्मचारिणी म्हणून."

"ताई, काय हें बोलतेस? तूं मला काय समजतेस? मी का असा छचोर, थिल्लर बनूं? उथळ, भ्रष्ट बनूं? मी जर तुझा भाऊ असेन तर हें तुला करूं देणार नाहीं. तुझ्यावर निराळे संस्कार झाले. माझ्यावर नाहीं झालेले. एका क्षणांत का भावाचा पति होतो?"

"मी वाट बघेन. चार वर्षांनीं हो. माझ्यावर 'तूं रंगाची आहेस, रंगाची आहेस असे घाव घालून त्यांनीं मला हा नवीन आकार दिला. मीहि तुला नवीन आकार देईन. तूं माझा आहेस, भाऊ म्हणून नाहीं, पति म्हणून आहेस, जीवनाचा स्वामी आहेस, असें मी सारखें तुला ऐकवीन नि तुला रंगवीन."

"मी तुला म्हणत जाईन 'तू माझी ताईच आहेस. माझी बहीण.' हा तुला क्षणभर भ्रम झाला आहे. तुझें माझें खरें नातें बहीणभावाचें. ती लिली काय म्हणेल? ती मला भाऊ म्हणे. प्रथम मामा म्हणे. पण तूं तिला भाऊ म्हणायला लावलेंस. तो भाऊ शब्द तुला आवडे. तुला भाऊ नाहीं, मला बहीण नाहीं. तें नातें किती थोर, किती निर्मळ! मी माझी इच्छाशक्ति तुझ्यावर लादीत जाईन. माझी इच्छा विजयी होईल कारण ती पवित्र आहे. म्हणून मला आत्मविश्वास आहे. तुझ्या मनावर आलेलीं हीं अभ्रें जातील. आंतील शुद्ध चंद्रमा शोभेल. तूं सध्यां दुधगांवला जा. सुनंदाआईजवळ रहा."

"तुझी पट्टराणी म्हणून."

"मला कोठलीच राणी अजून नाहीं."

"म्हणूनच ही घे. मी का वाईट आहें रंगा? हे बघ हात. हे का कोमल सुकुमार नाहींत? मी तुझें जीवन सुखाचें करीन. माझ्या जीवनाचें खत तुझें जीवन फुलावें म्हणून निःशंकपणें घालीन."

" नको असें बोलू. "

" मनांत उगीच कशाला ठेवूं ?"

" चल आतां जाऊं. तूं घरीं जा. "

" तूं नाहीं माझ्याकडे येत ? "

" नाहीं. "

" मग या समुद्रांत मला बुडव, या वाळूंत मला तुडव. "

तिनें त्याचे हात धरले. ती पुन्हां म्हणाली :

" ने मला समुद्रांत. तुझ्या हातानें हें जीवन संपव. तुझ्या हातून येणारें जीवन वा मरण दोन्ही अमृतमयच आहेत. तुझ्या हृदयसिंधूंत डुंबायचें माझें भाग्य नसेल तर या समोरच्या सागरांत मला फेक. का कचरतोस ? हो कठोर. "

तो तेथें स्तब्ध उभा होता. वारा जोरानें वाहूं लागला. अकस्मात् ढग आले. पाऊस येणार की काय ? टप् टप्.

" ताई जा घरीं, मी दादरला जातों. "

" मी येथेंच बसतें, सागरांत शिरतें; तूं जा. माझें प्रेम तुला मुक्त करित आहे. जा, रंगा सुखी हो. "

" तूं घरीं जा. "

" मला घर ना दार. मला सर्वत्र स्मशान आहे. "

" स्मशानांतच मृत्युंजय राहतो, कल्याण करणारा शिवशंकर राहतो, हालाहल पिणारा, जगाला वांचवणारा नीलकंठ राहतो. "

" काव्य पुरे. "

" तूं घरीं जा. वादळ होणार आहे. "

" वादळ किती दिवस जीवनांत घों घों करित आहे. आतां या वादळांत जीवनाचें हें लहानसें घरटें उध्वस्त होवो हीच इच्छा. "

" ताई मी जातों. "

" मी येतें तुझ्याबरोबर. "

" माझ्या खोलींत चार मित्र. तेथें कोठें येणार तूं ?"

" तर मग माझ्या खोलींत चल. "

" मी चाललों. "

तिचा हात दूर करून तो गेला. त्यानें मागें वळून पाहिले नाहीं. ती तेथेंच उभी होती. वादळ घोंघावूं लागलें. मुसळधार पाऊस आला. ती तेथें उभी. ती पुढें पुढें कोठें जात आहे? पाण्यांत शिरली. कडाड् कडाड् वीज गरजली. आणि कांही दिवे विझले. अंधार! समोर लाटा हंसत होत्या. ये, तुला पोटांत घेऊं, म्हणत होत्या. परंतु ती मागें गेली. पावसातून भिजत चालली. डोळ्यांतून अश्रुधारा वहात होत्या. सभोतीं वादळ, पाऊस, विजा: अंतःसृष्टीत तोच प्रकार. ती घरीं आली. तिने लुगडें बदलले. तिनें केस पुसले. ट्रंकेतील रंगाचा फोटो काढून तो हृदयाशी धरून ती पडली.



ताई दुधगांवला सुनंदाआईकडे रहायला गेली होती. ती तेथें सारें काम करी. सुनंदाआईना विसांवा देई. एक दिवस आपण रंगाचें मन जिंकूं अशी तिला आशा होती. माझी सेवा, माझी तपश्चर्या फळेल असें तिला वाटत होतें. चित्रं रंगवणारा रंगा, तो का माझें जीवन भकास ठेवील? त्याला माझी करुणा नाही येणार? परंतु करुणा म्हणजे का प्रेम? मला हवें आहे तें निराळें प्रेम आहे. संताला सर्व जगाविषयीं करुणा वाटते. परंतु त्याची ती करुणा म्हणजे आसक्त प्रेम नसतें. तें निरपेक्ष प्रेम असतें. मी का तशा प्रेमाची भुकेलेली आहें? मला देहाचें प्रेम हवें आहे. मी अजून साधी सांसारिक स्त्री आहे. माझ्या सामान्य भुका. असामान्य माणसें सामान्य जीवासाठीं खालीं नाहीं का येणार? ताई अनेक विचार करित असे. ती रंगाला पत्रें लिहायची. तीं पत्रें म्हणजे प्रेमाच्या श्रुतिस्मृति होत्या. कधीं कधीं रंगाला वाटे की वाचूं नये तीं पत्रें. तोच त्यांत विषय असावयाचा, तीच अनन्त आळवणी. परंतु तो तीं वाचित असे. तो दोन चार ओळींचें पुढीलप्रमाणें उत्तर लिही:

" प्रिय ताई

तूं सुनंदाआईची सेवा करित आहेस. धन्यवाद. तुझा भाऊ तुझा चिरऋणी आहे. तुझ्यासारखी बहीण मला देवानें दिली. माझें केवढें भाग्य! सुखी अस. सुनंदाआईना जप. तुझें मन शान्त होवो. शेवटीं निरपेक्ष प्रेम हेंच खरें. निरपेक्ष झाल्याशिवाय खरें प्रेम करतांच येत नाहीं. आज तुझें प्रेम माझ्यावर नाहीं. स्वतःच्या वासनांवर आहे. त्यांतून मुक्त होशील तेव्हां आजच्या पेक्षांहि रंगा तुला सुंदर दिसेल. मी भाऊबीजेला घरीं येऊं? तूं ओंवाळणार असलीस तर येईन."

रंगा.

असें तो लिहायचा. ती रागानें रुसून संतापून लिहायची. माझ्या मनांतील आगडोंब विझव, विझव असें प्रार्थायची. असे दिवस जात होते.

परंतु एक निराळीच घटना घडली. दुधगांवला नदीतटाकीं एका लक्षाधीशानें एक नवीन मंदीर बांधलें. तें मंदीर फार प्रचंड नसलें तरी रमणीय होतें. रामरायाचें मंदीर. अति सुंदर अशा मूर्ति होत्या. ते मंदीर सर्वांना मोकळे होतें. कोणीहि यावें, बघावें, तेथें बसावें. त्या श्रीमंताला मंदिराच्या आंतील भिंतीवरून भारतीय संस्कृतींतील प्रसंग चितारून हवे होते. त्यांना रंगाचें नांव कोणी तरी सांगितलें. एके दिवशीं तो भला मनुष्य सुनंदाआईकडे आला. रंगा कोठे म्हणून विचारित आला. सुनंदाने त्याचें स्वागत केलें. बोलणें झाले.

" आम्ही गरीब आहोत. मुंबईची नोकरी सोडून तो कसा हो येणार ?" सुनंदा म्हणाली.

" मी त्याचे श्रम वायां जाऊं देणार नाहीं. प्रसंग सारे रंगवून होईपर्यंत मी त्यांना महिना दोनशें रुपये देईन. आणि सर्व भिंती रंगवून झाल्यावर कांहीं तरी प्रेमभेट देईन."

" तुम्ही त्याला स्वातंत्र्य द्याल ना ? तुम्ही तुमच्या कल्पना, इच्छा त्याला सांगा. परंतु प्रसंग कोणते रंगवायचे हे शेवटीं त्याला ठरवूं दे. त्याच्या प्रतिभेला, कल्पनेला बंधनें नका घालूं."

" कलावंताला कोण बांधील आई ?"

" आजकाल तर सारे बांधतात व कलावानहि अगतिक होऊन बद्ध होतात."

" मी तसा नाहीं. दुधगांवचें हें मंदीर सुंदर होवो. तेथील प्रत्येक वस्तु स्फूर्ति देणारी होवो. माझ्या मनांत अनेक गोष्टी येतात. परंतु आज नाहीं बोलत. माझे विचार समजणार तरी कोणाला असें कधीं मनांत येतें."

" रंगाला समजतील. तो फार उदार व थोर मनाचा मुलगा आहे."

" त्याला बोलवा येथें. असा ध्येयवादी चित्रकार आम्हांला लाभला तर आणखी काय हवें ? मी त्यांचे श्रम वायां नाहीं जाऊं देणार."

" लिहितें."

तो श्रीमंत मनुष्य निघून गेला. कोठला तो, कोठून आला ? दुधगांवचाच का ? असे कसे त्याचे विचार ? तो भांडवलदार नव्हता वाटतें ? परंतु

भांडवलदार का मंदीरें बांधित नाहींत? दिल्लीला बिर्लांचें सुंदर मंदीर आहे. भांडवलदार कामगारांजवळ नसतील नीट वागत. त्याना तें कळतच नाहीं. श्रमणाऱ्याचा संपत्तीच्या उत्पादनांत केवढा भाग असतो तें समजण्याइतपत त्यांच्या बुद्धीची व हृदयाची वाढ झालेली नसते. ते लाखों रुपयांच्या देणग्या देतील, धर्मशाळा बांधतील, मंदीरें उभारतील. सोन्याचे कळस बांधतील. सारेच भांडवलदार चंगीभंगी नसतात. परंतु त्याचें सारें वैभव ज्याच्या घामांतून निर्माण होतें त्याला ते विसरतात. कामगाराना सुंदर चाळी बांधून देणें, त्यांच्या जीवनांत आनंद येईल असे करणें, ही गोष्ट मंदीर बांधण्याहूनहि पवित्र आहे. तेथे हजारो कामगार, हीं देवाचीं चैतन्यमय रूपें, देवाच्या प्रत्यक्ष मूर्ति आनंदानें नांदतील ही कल्पनाच त्यांना येत नाहीं. कामगारांच्या चाळीतून अंधार आणि ज्ञानस्वरूप परमेश्वराच्या मूर्तीजवळ त्या मंदिरांत विजेच्या दिव्यांचा झगमगाट. इकडे श्रमणाऱ्यांना खायला नाहीं तर देवासमोर अन्नकोट रचले जातात! असो. शेवटीं अज्ञानाचा हा परिणाम आहे सर्वांचा विकास सारखाच होतो असे नाहीं. कोणाची कशी वाढ, कोणाची कशी. कोणाच्या या वृत्तींचा विकास, कोणाच्या त्या. कोणी कोणास नांवे ठेवावीं? मंदिर बांधणाऱ्यासहि वाटत असेल येथे हजारों लोक येतील, क्षणभर प्रभुसमोर उभे राहतील, विनम्र होतील, थोडा प्रकाश नि आनंद जीवनांत घेऊन जातील. चाळी बांधून जीवनांत थोडें सुख आणतां येईल. परंतु शेवटीं ज्याला आंतरिक विकास म्हणतात, एक थोर नैतिक वा विश्वव्यापक सहानुभूतीची भावना म्हणतात, ती कोठून येणार, कोठें मिळणार? ती केवळ पोटभर भाकर देऊन, अंगभर कपडा देऊन, चार वेळां सिनेमा दाखवून येईल का! केवळ सुखांची रास मिळाली म्हणूनहि मानव मानव या अर्थानें सुधारेल असें नाहीं. परंतु हें सुखांत लोळणाऱ्यांनीं म्हणणें शोभत नाहीं. पैसा म्हणजे माया हें वाक्य भांडवलदारांच्या तोंडीं शोभत नाहीं. सर्वांच्या जीवनाच्या गरजा तर भागायलाच हव्यात. बुद्धदेव म्हणत कीं उपाशी मनुष्याला अन्नाच्या भाषेंत, अन्नाच्या प्रत्यक्ष चवीच्या द्वारेंच धर्म शिकवायला हवा. आणि आजचे बुद्ध महात्माजीहि म्हणाले कीं जोंवर पोटभर अन्न मला सर्वांना देतां येत नाहीं, तोंवर रामनाम तरी कोणत्या तोंडानें शिकवूं? ज्ञानं ब्रह्म या व्याख्ये इतकीच अन्नं ब्रह्म ही व्याख्याहि अर्थगंभीर आहे. आम्ही लोकांना ज्ञानं ब्रम्ह शिकवित राहिलों. परंतु त्याचा पाया जो अन्नं ब्रह्म तो मात्र

शिकवला नाहीं. जग या अशाच धडपडींतून, क्रियाप्रतिक्रियांतून पुढें जायचें आहे.

सुनंदानें रंगाला तें सारें वृत्त कळविलें. तिनें त्यांत त्याला आणखी लिहिलें:

"तूं येथें आलास तर किती छान होईल! मुंबईच्या कोंदट हवेंत तुला रहावें लागते. ती दुसऱ्यांची ताबेदारीची नोकरी. कलावंताला जर कोणती गोष्ट मरणप्राय वाटत असेल तर ती दुसऱ्याची गुलामगिरी आपल्या कलेला दुसऱ्याच्या लहरीवर नाचवणें म्हणजे खरोखर मरण. रंगा, तूं इकडेच ये. आपण एकत्र राहूं. तुझी प्रकृति बरी नसते असें ताई म्हणाली. प्रकृति बरी तर सारें बरें. तुला त्यांची स्वप्नें पूर्ण करायचीं आहेत. भारताचें नांव दिगंत करायचें आहे. यासाठीं तूं प्रकृतीची काळजी घेतली पाहिजेस. येथें सारे नीट जमेल. घरचें अन्न नि शुद्ध हवा. त्या मंदिरांतील हृदयानुसार केलेली कलेची मुक्त पूजा. तुला आनंद होईल ये. ते शेटजी ध्येयवादी दिसतात. ते धगांवला रहायला आले आहेत. ते साधक दिसतात. त्या राममंदिरांत ते मूर्तीसमोर बसतात नि त्यांच्या डोळ्यांतून अश्रु येत असतात. ते तुला कांहीं कमी नाहीं पडूं देणार. म्हणून नाहीं म्हणूं नकोस. तूं संमति कळव."

आणखीहि कांहीं गोष्टी सुनंदानें लिहिल्या होत्या. रंगाला तें पत्र मिळालें. त्याला अलीकडे जरा बरें वाटत नसे ही गोष्ट खरी. तो खिन्न व सचिंतहि असे. सुनंदाआईजवळ रहायला त्याला मिळालें असतें. परंतु ताईचा प्रश्न होता. तो तिच्यापासून दूर होता म्हणून सारें ठीक होतें. तरी तिची तीं पागल पत्रें येतच असत. दुधगांवला कसें व्हायचें? परंतु मला तिची ही भावना जिंकून घेतलीच पाहिजे. माझी भावना निर्मळ नि प्रभावी असेल तर मी तिला ताई करीन, माझी बहीण करीन. तिची भ्रान्त मनोवृत्ति दुरुस्त होईल. मोहाजवळ राहून त्याच्यापासून अलिप्त असणें यांतच खरा पुरुषार्थ.

त्यानें जायचें ठरविलें. मुंबईचा गाशा त्यानें गुंडाळला. अनेक मित्रांना भेटला. त्यांना तो म्हणाला "दुधगांवच आतां माझी कर्मभूमि, मृत्युभूमि. तेथेंच जगेन, मरेन. माझीं ध्येयें तेथें बसून मूर्तिमंत करण्याचा आमरण उद्योग करीन. तेथें माझ्या लहानशा घरांत महान् संस्था सुरू करीन. माझी खोली म्हणजे माझ्या ध्येयाचें मंदीर. 'भारत–चित्रकला–धाम' अशी संस्था मला निर्मायची आहे. ती माझ्या मनांत आहे. दुधगांवला ती स्थापीन. बरावर पाटी लावीन, तुम्ही या

मधून दुधगांवला. तुमच्या शहरीं नवनवीन कल्पना घेऊन या मला भेटायला. दुधगांवचा धबधबा, तेथील राममंदीर, मंदिरांतील मी आतां काढीन तीं चित्रें—सारें बघायला एकदा या. रंगाला विसरूं नका."

सर्वांचा निरोप घेऊन रंगा गेला. तो घरीं आला. सुनंदा आईजवळ आला. सुनंदाला किती आनंद झाला !

"रंगा, आपण एके ठिकाणीं राहूं. आतां कोठें जाऊं नकोस. येथेंच शान्तिनिकेतन, येथेंच विश्वभारती, येथेंच अजिंठा, येथेंच घारापुरी. भारतांतील सारी कला आतां येथें येईल. तूं नको कोठें जाऊंस."

"जशी आई तुझी इच्छा. तुझा आनंद तो माझा"

रंगा राममंदिरात गेला ते श्रीमंत गृहस्थ तेथेंच होते. दोघांचें संभाषण झालें. रंग, कुंचले सारे सामान तेथे होतें. कशाची उणीव नव्हती.

"जें लागेल तें मागा. या भिंती सजीव करा, भारताचीं ध्येयें पुकारणाऱ्या करा. तुमच्या बोटांत ती जादु आहे. माझ्या स्वप्नांत रामचंद्रप्रभु आले. म्हणाले दुधगांवला जा. तेथें मंदीर बांध. काय असेल तें असो. मी येथें आलों. हे लहानसें मंदीर बांधलें. येथेंच प्राण जावोत."

"तुम्हांला आणखी कोण कोण आहेत ?"

"मोठें आहे कुटुंब. परंतु मी सर्वांचा निरोप घेऊन आलों आहे. मुलें पसारा सांभाळतात. तुम्ही उद्यांपासून आरंभ करा. रामनवमीच्या आंत पुरे करा."

"मी रात्रंदिवस श्रमून पुरें करीन."

कामाला आरंभ झाला. तें मंदीरच रंगाचें घर झालें. तो घरीं फारसा जात नसे. तेथेंच नदींत स्नान करी. ताई त्याचें जेवण घेऊन येत असे. कधीं सायंकाळीं सुनंदा त्याचीं चित्रें बघायला येई. गांवांतील मुलें येत, कामगार येत. इतर मंडळी येई. रंगा रंगलेला असे. त्याला कोणाचा त्रास नसे होत. त्याचें लक्षच नसे. त्याची त्या त्या चित्राशीं जणूं समाधी लागे. अपूर्व चित्रकार !

एके दिवशीं सायंकाळीं थकून रंगा नदीतटाकीं बसला होता. सायंकाळ संपून रात्र पसरली. त्याला भान नव्हतें. त्या अंधारांतच तो होता. जणूं ध्येयाची देदीप्यमान सृष्टि बघत होता.

"रंगा" कोणी तरी हाक मारली.

परंतु तो जणूं निराळ्या जगांत गेला होता. का भारताच्या अमर परंपरेंत बुड्या मारित होता ? कोणी तरी त्याचे डोळे धरले. परंतु ते आधींच मिटलेले होते. तो भानावर आला.

"कोण आहे ?"

"मी"

"ताई, येथें अंधारांत कशाला आलीस ?"

"प्रकाश मिळवायला. मी नेहमींच अंधारांत आहें. तुझ्याजवळ प्रेम-प्रकाशाची मी भीक मागत आहें. नकोरे मला दूर लोटूं."

तिनें त्याच्या खांद्यावर मान ठेवली. कढत श्वास, कढत अश्रु. परंतु तो स्तब्ध होता.

"ताई, अशक्य तें मला सांगूं नकोस."

"तर मग या नदीच्या डोहांत मला लोट."

"लोटणारा मी कोण ? कां तू मला दुःख देतेस ?"

"तूं नाहींना मला दुःख देत ? रात्रंदिवस माझ्या जीवनांत घुसून कोण मला सतावित आहे ?"

"तूं मनाचें दार बंद कर. तेथून मला घालव."

"मला ती शक्ति नाहीं. माझ्या मनाला दारें नाहींत. सर्वत्र तूंच भरून उरला आहेस. नको कठोर होऊं."

"ती बघ आरती सुरू झाली. आपण जाऊं."

तो उठला. ती तेथेंच होती. ती जीव देणार नाहीं त्याला खात्री होती. तो मंदिरांत जाऊन प्रभूच्या मूर्तीसमोर सद्गदित होऊन उभा राहिला. उघड्या डोळ्यांनीं बघतां बघतां शेवटीं डोळे मिटून उभा राहिला. आरती संपली. तीर्थ-प्रसाद झाला. लोक गेले.

"रंगा, जेवतोस ना ?" ताईनें विचारलें.

"तूं आरतीला नाहीं आलीस ?"

"मी माझ्या देवाची आरती बाहेर करित होतें. माझा देव तूं, तुझा देव प्रभु रामचंद्र. ज्यानें त्यानें आपल्या देवाची पूजा करावी. जेव मी वाढतें."

"तूं आतां घरीं जा. आई वाट बघत असेल."

"मी नाहीं घरीं जात. जेथें तूं तेथें मी. मी येथेंच राहीन."

" ताई, नको ग त्रास देऊं. हें राममंदीर का विलासमंदीर करायचें आहे ? काय बोलतेस ? घरी जा. "

ती रडूं लागली. तो उठला. त्यानें आपले कुंचले घेतले. तो चित्र रंगवूं लागला. तें सूरदासाचें चित्र होतें. सूरदाससमोर वेश्या उभी आहे. सूरदासाच्या हातांत काढून घेतलेले स्वतःचे डोळे आहेत. डोळ्यांतून रक्त त्या नेत्रकमलांवर पडत आहे.

" ज्या माझ्या डोळ्यांनीं तुला मोह पाडला, रामाची आठवण द्यायच्या ऐवजीं कामाची आठवण दिली, ते डोळे कशाला ठेवूं ? " असें सूरदास विचारित आहे.

" रंगा हा कोणता प्रसंग ? " ताईनें विचारलें. सूरदासाचे डोळे पाहून भाळलेल्या त्या वेश्येची कथा त्यानें सांगितली. डोळे काढून सूरदास तिच्याकडे जातो व सांगतो कीं " माझ्या हातांनीं हे भुलवणारे डोळे दूर केले. आतां तूं रामाकडे वळ." ताई ऐकत होती. इतक्यांत सुनंदा तेथें आली.

" अग घरीं नाहीं का यायचें ? मी म्हटलें आली नाहींस तर रंगाला बरें नाहीं कीं काय ?"

" यांना जेवा जेवा म्हणत आहे. परंतु ऐकतील तर"

" कायरे रंगा, जेवायचें नाहीं का? रात्रंदिवस काम करून तुलाहि का मरायचें आहे ? काय ही प्रकृति ! कितीदां सांगितलें कीं घरीं येत जा, झोंपत जा. दिवसभर काम करावें, रात्रीं आराम घ्यावा. ऊठ. जेव. सारें निवून गेलें असेल अन्न. उद्यांपासून तूं घरींच येत जा सायंकाळीं. रात्रीचें काम बंद."

" रामनवमीपर्यंत पुरें व्हायला हवें सारें."

" होईल पुरें. "

" आई, मी मरणार नाहीं. राम काम पुरें करून घेईल. चिंता नको. जा तुम्ही दोघी."

" तूं हट्टी आहेस. तुझी आई म्हणायाची. "

सुनंदा नि ताई गेल्या. रंगानें जेवण केलें. मध्यरात्रींपर्यंत तो रंगवित होता. मग बाहेर पडला. थंडगार वारा वहात होता. सारी सृष्टि त्याला जणूं स्पर्श करित होती. आकाश किती फुललें होतें. धबधब्याचा मंत्रजागर कानीं

येत होता. सृष्टींतील विश्वसंगीत तो ऐकत होता. त्या विराट् मूक संगीतातील तोहि एक तान बनून गेला. तेथेंच नदीतटाकीं एका शिलाखंडावर तो झोंपला.

तो जागा झाला तों त्याच्या चरणाशीं त्याला फुले आढळलीं. जवळच फुलांचा एक हार होता. ताई का येऊन गेली? तो उठला. तो मंदिरांत गेला. तेथें ताई प्रभूसमोर उभी होती. तोहि शेजारीं उभा राहिला. दोघांनीं डोळे उघडले.

"ताई, रामाची भक्त हो."

"मी आधीं तुझी पूजा केली मग या रामाची."

"तूं त्याच्याजवळ काय मागितलेस?"

"मागितले कीं रंगा मला दे. तूं काय मागितलेस?"

"ताई माझी बहीण कर."

ती न बोलतां निघून गेली.

रंगा मंदिरांत चित्रसृष्टींत रंगला होता. आज घरी एक मोठें पत्र आलें होतें. तें मुंबईहून इकडे परत पाठवण्यांत आलेलें होतें. पत्र युरोपातून आलें होतें. ताईच्या तें हातीं पडले कोणाचे पत्र? तिला शंका आली. तिनें ते पत्र फोडलें, वाचलें. कोणाचें पत्र?

"प्रिय रंगा

तुला मी परत भेटलें नाहीं. मीं साधी सामान्य मुलगी. मी दुरून तुझी प्रेम-पूजा करित असतें. बाबांबरोबर युरोपच्या प्रख्यात चित्रशाळा बघत हिंडत आहें. तूं बरोबर असतास तर? परंतु तुला मिंधेपणा वाटला. तुम्ही पुरुष मोठे स्वाभिमानी असा. स्त्रिया प्रेमाला सर्वस्व देतात. आज एका सरोवराच्या तीरावर मी आहें. अद्भुत दृश्य. परंतु मी तुझ्या प्रेमसरोवरांत विहरत आहें. येथलीं सुंदर फुलें तोडून मी पाण्यांत सोडित बसतें. तुझें नांव घेतें नि फूल पाण्यांत सोडते.

युद्धाचें वातावरण सर्वत्र आहे. केव्हां भडका उडेल नेम नाहीं. बाबा परत फिरायचें म्हणत आहेत. मीहि यायला उतावीळ आहें. तुला बघायला भेटायला येऊं? पुन्हां दहींभात जेवूं घालशील? परंतु त्यावर कितीदिवस समाधान मानूं? तूं माझ्या हातचा दहीभात खाणारा नाहीं का होणार?

बाबांजवळ मी अजून बोललें नाहीं. परंतु माझी जीवनगंगा तुझ्या जीवन-सागरांत विलीन व्हायला अधीर झाली आहे. बाबा तिला रोखूं शकणार नाहींत.

त्याचे प्रेम, त्यांची संपत्ति, सारें सोडून नयना तुझ्याकडे येणार. गरिबाकडे गरीब होऊन येईल. 'मी आवडत असेन तर गरीब होऊन ये. मला श्रीमंत करण्यापेक्षां तूंच कां नाहीं दारिद्र्याला वरीत?' असे तूं म्हणाला होतास. येतें आतां. दारिद्र्याला वरून मग तुला वरायला येते. बाबा काय म्हणतील? त्यांची मी एकुलती मुलगी. ते का कठोरच राहतील? त्यांचे वात्सल्य त्यांना शेवटीं विरघळवील.

रंगा, माझे जीवनचित्र रंगवणारा तूंच हो.

तुझी नयना

ताईच्या हातांत तें पत्र होतें. शेवटी तिनें त्या पत्राचे तुकडे तुकडे केले. त्या पत्रांत एक फोटो होता. तो तिनें फाडला. तुकडे करून ती रडत बसली. मागून ते जुळवूं बघत होती!

रंगाचीं चित्रे संपत आलीं होतीं. रंगपंचमीच्या दिवशीं रात्रीं ते शेवटचे चित्र तो रंगवित होता. रात्रभर कर्ममग्न होता. कुंचल्याचा शेवटचा स्पर्श करून तो उठला. प्रभूच्या समोर दंडवत् त्याने लोटांगण घातलें. एक जीवनकार्य पार पडलें होते. तो हेलावला होता. त्यानें ती सारी चित्रसृष्टि पाहिली. वसिष्ठ-विश्वामित्रापासून तो महात्माजीपर्यंतचा भारती इतिहास तेथें होता. ठळक ठळक दिव्य प्रसंग.

परंतु इतक्यांत दुष्ट वार्ता कानी आली कीं शेटजींची हृदयक्रिया बंद होऊन ते अकस्मात् देवाघरीं गेले. रात्रीं निजले ते निजले. सकाळीं नोकर उठवायला गेला तों सारा खेळ खलास. डॉक्टरांनी [redacted] थांबलें म्हणून निर्वाळा दिला. रंगा लगबगीनें गेला. त्यानें त्या साधकाला प्रणा[redacted] केला. रंगाचें शेवटचें चित्र तिकडे संपले नि इकडे जीवनखेळ संपला! विचित्र योगायोग.

मुंबईहून शेटजींची कौटुंबिक मंडळी आली. सारे विधि झाले. शेटजीनी मृत्युपत्र केलें होतें कीं नाही कोणास ठाऊक? त्यांच्या मुलाने मंदिराची कांहीं व्यवस्था केली. रंगा त्यांना भेटला. त्यांनीच बोलावलें होतें.

"तुमचें कांही देणे आहे का? तुम्ही काढलींत ती चित्रें?"

"मीच काढलीं.

"तुम्ही मुंबईस याल चित्रें काढायला?"

"नाहीं. मी धंदेवाईक नाहीं."

" पोटाला नको का ? धंदा काय वाईट असतो ? आमचा तर दिवसरात्र धंदा असतो. "

" म्हणून तर लक्षाधीश होतां. "

" तुम्ही व्हाल लक्षाधीश. मुंबईस चला. आम्ही सांगूं तशीं काढा चित्रें."

" नको. "

" ठीक. तुमचें कांहीं देणें ? "

" सारें चुकते झालेलें आहे.

" तुमच्याकडे अधिक दिले आहेत कीं काय ? शिल्लक नाहीं ना रक्कम ? "

" तें मृताला विचारा. "

" मेलेला का बोलणार ? तुम्ही सांगाना खरी वार्ता "

" मी येतों. बसा आपण. "

रंगा निघून गेला. त्या धनपूजकांचा वारा त्याला सहन होईना. शेटजी शवटीं प्रेमाची देणगी देणार होते. परंतु रंगाच्या तोंडून शब्दहि बाहेर पडला नाहीं. तो रामभक्त गेला. या माकडांना कशाची किंमत ?

अपरंपार श्रमानें रंगा आजारी पडला. सुनंदा त्याच्याजवळ बसे. कांहीं दिवसांनीं त्याला बरें वाटलें. त्यानें घरावर " भारत चित्रकलाधाम " म्हणून स्वतःच्या हातानें रंगवून लिहून पाटी लावली. एका खोलींत भिंतीवर त्यानें स्वतःचीं व इतर कांहीं चित्रें लावलीं. कांहीं बोधवाक्यें होतीं.

अमेरिकेंत चित्रकलेचें एक जागतिक प्रदर्शन भरणार म्हणून त्यानें वाचलें. आपणहि त्याच्यासाठीं चित्रें तयार करावीं असें त्याच्या मनानें घेतलें. भारत-दर्शन म्हणून त्यानें एक योजना तयार केली. भारतांतील रम्य ग्रामीण जीवन; भारतांतील निसर्ग; भारतांतील ध्येयें; भारतांतील दारिद्र्य; नवभारताचीं समाजवादी स्वप्नें; अनेक कल्पना त्यानें मनासमोर मांडल्या. नवभारताच्या निर्मात्यांचीं कांहीं चित्रें. ती महान् योजना होती. तो त्या योजनेवर खपूं लागला.

परंतु ते श्रम त्याला झेपत ना. त्यानें पुन्हां आंथरूण धरलें.

" रंगा, किती रे श्रमायचें. हळूहळू नाहीं का करतां येणार ? "

" आई, जगांत हळूहळू करून कसें चालेल ? मृत्यु तर झपाट्यानें येत असतो. त्याच्या आंत आपलें कार्य पुरें व्हायला हवें. "

" आपणच मृत्यूला ओढून आणतों."

अलीकडे ताई रंगाजवळ बोलत नसे. ती दूर असे, दूर बसे. ती गंभीर झाली होती रंगाला त्यामुळें बरें वाटे. परंतु तिनें बोलावें, आनंदी असावें, असें त्याच्या मनांत येई. मनांत प्रसन्नता फुलण्यापूर्वीची ती वेदना असेल असा तो तर्क करी; पहांटेपूर्वीचा तो अंधार असेल असें मनांत म्हणे.

जगांतील महायुद्ध पेटलें. ठिणगी पडली. भराभरा घटना घडूं लागल्या. रशिया जर्मनचा करार झाला. इंग्लंड, फ्रान्स, पोलंड-सर्वत्र मारणमरण सुरू झालें. अमेरिका तटस्थ होती. हिंदुस्थानचें काय? तो युद्धाच्या आगींत ओढला गेला.

नयना कोठे होती? ती परत आली असेल का?

"काय रे रंगा, तिचें पत्र नाहीं आलें ना तुला? तूंच म्हणाला होतास कीं ती युरोपांत गेली आहे म्हणून."

"तिचें पत्र नाहीं. रंगावर रुसली रागावली असेल. परंतु तिचे बाबा थांबणार नाहींत. ते तिला घेऊन निघाले असतील."

रंगाला फारच थकवा आला. तो वेळ जात नसे म्हणून थोडें काम करी. परंतु लगेच थके. पुन्हां पडून राही.

एके दिवशीं अकस्मात् पंढरी आला. रुबाबदार लष्करी पोषाखांत तो होता.

"काय रे, मरत पडलास वाटतें."

"तूंहि मरायला चाललास ना?"

"मरायला नि मारायला. जगांत दुसरें आहे काय!"

"पंढरी, तुला कोठें पाठवणार आहेत?"

"अरे तें का आम्हांला सांगतात! कोणी म्हणतात इराणांत, कोणी म्हणतात आफ्रिकेंत. हरि जाणे. तुला शेवटची मिठी मारायला आलों आहें. रंगा, हें तूं दिलेलें भारतमातेचें चित्र. हें खिशांत असतांना मरण येऊं दे. कोठेंहि मेलों तरी भारतमाता जवळ आहे. या कोण!"

"ही ताई. तुला पुरणपोळी केली होती. यांच्याकडचाच पाटावरवंटा आणला होता."

"त्यांची ती छोटी लिली. मोठी गोड मुलगी."

"ती मुलगी गेली. ताईचे यजमान गेले. ती येथें असते. भावाजवळ बहीण आहे. दुर्दैवी बहीण."

" रंगा, जगांत कोण सुदैवी आहे ? अरे तुला मी गालिचा आणला आहे. त्या अफगाणानें दिलेला. तो तुझ्याकडे ठेव. तुला सर्व जगाचे प्रेम हवे असतें. होय ना. मी साऱ्या वस्तु तुझ्याकडे घेऊन आलो आहे. सुंदर सुंदर कलात्मक वस्तु. मला तूंच एक आहेस. तुझे घर तेच माझें. जिवंत कधी आलों परत तर भेटूं. "

" माझाहि काय नेम पंढरी ? "

" जगांत कशाचाच नेम नाहीं. "

पंढरी रंगाचा हात हातांत घेऊन बसला.

" उतर तुझे खोगीर. "

पंढरी उठला. त्यानें लष्करी पोषाख उतरला. धोतर शर्टमध्ये तो किती सुरेख दिसत होता.

" पंढरी तुझी प्रकृति सुधारली. जरा गोरा झालास. "

" थंड हवा. फळांचा आहार. निश्चिन्त जीवन. "

सुनंदानें पंढरीसाठीं मेजवानी केली.

" शेवटची मेजवानी " तो म्हणाला.

" परत सुखरूप ये " सुनंदा म्हणाली.

सायंकाळीं ताईबरोबर पंढरी राममंदीर, धबधबा सारें बघायला गेला. मंदिरांतील चित्रें पाहून तो तन्मय झाला.

" रंगा जादुगार आहे " तो म्हणाला

" तुमच्या मित्राची तुम्ही करालच स्तुति. "

" तुम्हीहि त्याची स्तुति कराल. बहिणीला भावाची स्तुति का आवडत नाहीं ? "

" भाऊ आजारी आहे. तुम्ही पत्र पाठवा. "

" आम्हांला पत्रें कशीं पाठवतां येणार ? "

" ते तुमची आठवण काढीत, नयनाची काढीत. ते फार थकले आहेत. "

" नयना कोठें आहे ? "

" युरोपांतून आली कीं नाहीं कळलें नाहीं "

" तिचें रंगावर प्रेम आहे. "

" तुमचें कोणावर आहे "

"मरणावर"

"शिपायी वाटेल तेथें प्रेम करतो"

"इतका प्रेमवेडा मी नाहीं"

तीं दोघें बोलत येत होतीं.

"तुम्हांला जगांत कोणी नाहीं, मला कोणी नाहीं. आपण समदु:खी आहोंत. मलाहि मरावे वाटतें."

"रंगा आहे. तो तुम्हाला कांहीं कमी पडूं देणार नाहीं."

"माझें आयुष्य प्रभु त्याना देवो."

पंढरी, ताई घरीं आलीं. रात्रीच्या गाडीनें पंढरी जाणार होता, मित्र कडकडून भेटले.

"रंगा, जिवंत रहा. काळजी घे."

"तूं सुखरूप परत ये. राजीनामा कां देत नाहीस?"

"ते गोळी घालतील, तुरुंगात टाकतील. आणि जगण्यांत तरी काय राम आहे?"

पंढरी निघाला. तो सुनंदाआईच्या पायां पडला. त्याचे डोळे भरून आले. सर्वांचेच भरून आले.

"ताई, निराश नका होऊं. रंगा बरा होईल. आनंदी असा."

"मी स्टेशनवर येतें. तुम्हांला निरोप देतें. हे बरे असते तर स्वत:च आले असते."

"भाऊचें काम बहीण पार पाडील" पंढरी म्हणाला.

टांगा आला. ताई पंढरी टांग्यांत बसलीं. सुनंदा रंगा दारांत होतीं. गेला टांगा. रंगाला एकदम घेरी आली. सुनंदानें कसातरी आधार देऊन त्याला आंथरुणावर निजविलें. ती त्याच्याजवळ बसून राहिली. थोड्यावेळानें त्यानें डोळे उघडले.

"बरें वाटतें आतां आई."

"तू थकलास हो रंगा."

स्टेशनांत गाडी आली. दुसऱ्या वर्गाच्या डब्यांत पंढरी बसला. ताईनें डबा बघितला.

"मी दुसऱ्या वर्गाचा डबा कधीं पाहिला नव्हता. पंखा आहे वाटतें."

"साहेबाच्या डब्याला सारें असतें" त्यानें पंखा सुरू केला.

"तुमचा फोटो नाहीं एखादा?"

"आहे. द्यायला विसरलोंच."

त्यानें स्वतःचे दोनचार फोटो काढून दिले. नंतर खिशांतून एक फोटो त्यानें हळूच काढला. तो हातांत लपवून म्हणाला :

"यांत कोण असेल ओळखा."

"एखादी सुंदर काश्मीरी नारी."

त्या फोटोंत रंगा नि तो दोघे होते. तो लहानपणचा फोटो होता.

"हा असतो माझ्या जवळ नेहमीं. आणि भारत मातेचा. रंगा नि भारतमाता. दोनच माझीं नातीं."

गाडीची शिटी झाली.

"जपा, सुखरूप परत या" ती म्हणाली.

"माझ्या रंगाला जपा" तो म्हणाला.

ती खालीं उतरली. तो गाडींतून बघत होता. निघाली गाडी, गेली. ताई एकटीच पायीं चालत आली. घरीं सुनंदा रंगाजवळ होती.

"बरें नाहीं का वाटत?"

"त्याला घेरी आली."

"ते फार थकले आहेत. मी बसूं त्यांच्यावळ?"

"आतां डोळा लागला आहे. नीज तूं. मीहि पडतें."

कांहीं दिवस गेले. दुधगांवच्या स्टेशनवर एक मुलगी उतरली.

"येथें भारत चित्रकलाधाम कोठें आहे" तिनें टांगेवाल्याला विचारलें.

"आहे माहीत, बसा. तो रंगारी ना? राममंदिरांत चित्रें काढणारा. फार छान चित्रें बघा. जो येतो तो बघायला जातो. ते आजारी आहेत म्हणतात. माझा पोरगा त्यांच्याकडून चित्रें आणतो. फार चांगला माणूस. बसा."

टांगेवाल्यानें घराशीं टांगा आणला. ताईनें बाहेर येऊन पाहिलें. ती चकित झाली.

"कोण पाहिजे?" तिनें पुढें होऊन विचारलें.

"रंगा येथें राहतात?"

"होय. या."

सामान आंत आणण्यांत आलें. टांगा गेला. रंगा पडून होता. ती आलेली व्यक्ति एकदम रंगाजवळ जाऊन बसली नि रडूं लागली. अश्रु आंवरत ना.

"रंगा, काय रे होतें ? रंगा."

"कोण, नयना ? तूं आलीस ?"

तो उठूं लागला. तो थरथरत होता. तिनें त्याला झोंपवलें. तो डोळे मिटून पडला होता. ती त्याच्या केसावरून हात फिरवित होती. त्याला थोपटित होती. मध्येंच ती वांकली. तिनें आपलें डोकें त्याच्या डोक्यावर ठेवलें.

"नयना, ये बाळ. रडूं नको. रंगा बरा होईल. तूं युरोपांतून कधीं आलीस ? मला काळजी वाटत होती. पत्र तरी पाठवायचें एखादें !"

"मी पत्र पाठवलेलें मिळालें नाहीं ? फोटो पाठवले होते."

"नाहीं मिळालें कांहीं."

नयना उठून घरांत गेली. जणूं तिचेंच घर. दुपारचीं जेवणें झालीं. युरोपांतून आणलेलीं चित्रें ती रंगाला दाखवित होती. सुंदर फोटो होते. तिकडच्या हकीगती सांगत होती. रंगा ऐकत होता. सुनंदाहि खालीं चटयीवर बसून एकीकडे चरखा कातीत ऐकत होत्या.

ताईनें सर्वांना चहा करून आणला.

"ताई तूं बस ना येथें. नयना कांहीं परकी नाहीं."

"मला ठाऊक आहे."

सर्वांनीं चहा घेतला. सुनंदा राममंदिरांत जायला निघाली. कोणीतरी प्रवचनकार आला होता. त्याचीं प्रवचनें आजपासून सुरू व्हायचीं होतीं.

"ताई येतेस ?"

"येतें."

"नयना तू ?"

"मी रंगाजवळ बोलत बसेन."

"त्याला थकवा नको आणूं."

"मीच बोलेन. तो ऐकेल. ऐकून नाहींना रे थकवा येणार ?"

"नाहीं" तो हसून म्हणाला.

ताई, सुनंदा मंदिरांत गेलीं. रंगा नि नयना तेथें होतीं. परंतु कोणीच बोलत नव्हतें. अखेरीस नयना म्हणाली.

" रंगा, शेवटी मी आलें आहे. नदी सागराकडे आली आहे."

" तुझे वडील काय म्हणाले ?"

" मी अजिंठा पाहून येतें म्हणून सांगून आले. त्याना मी पत्र लिहीन कीं नयना आता तुमची नाही."

" तूं वेडेपणा करित आहेस. नयना, मी आतां फार दिवस वांचणार नाही. मरणोन्मुखाजवळ कशाला लग्न लावूं बघतेस ? पित्याला दुःखी नको करूं. तुझ्या हृदयाच्या कोपऱ्यांत माझी स्मृति ठेव. मुख्य देव दुसरा होवो."

" रंगा, नको असें बोलूंस. मी परत जाण्यासाठी आले नाहीं."

" मी मरणपंथाचा यात्रेकरू."

" आपण सारींच आहोंत."

" माझी यात्रा संपत आली आहे. तूं जग. माझीं ध्येये पुरीं कर. जागतिक प्रदर्शन भरणार होतें. मी कांही सुंदर चित्रे तयार केली आहेत. अजून सारीं पुरीं नाहीं झालीं. थकवा येतो. तूं कर ती पुरी."

" तें प्रदर्शन तहकूब झाले आहे."

" युद्ध कधीं तरी संपेल. त्यावेळेस कोणीतरी पुन्हां जीवनाकडे, कलांकडे, वळतील. मी त्यावेळेस नसेन. तूं ही चित्रे पाठव."

" रंगा, मी तुला बरे करीन. तुला घेऊन जाईन. महाबळेश्वर, माथेरान, उटी, कोठें नेऊं सांग. बाबा मला पैसे देतील. ते रागावणार नाहीत. क्षणभर रागावतील. परंतु पुन्हां मुलीला जवळ करतील. तें उदार पितृहृदय का काय-मचें कठोर होईल, शेवटीं माझ्या कृतार्थतेंतच त्यांची कृतार्थता. रंगा, मी आता येथून जाणार नाहीं. मला तुझी होऊं दे."

" किती तुला समजावूं ? माझी घटका भरत आली आहे."

" ती लग्नघटका आपण समजूं. रंगा, या जगांत तुझी म्हणून मला जगूं दे. तुझा देह जाणारच असेल तर काय उपाय ? परंतु मी तुझ्या देहाजवळ केवळ लग्न लावित नसून तुझ्या थोर आत्म्याजवळ लावित आहे. तो आत्मा अमर आहे. तो कोण हिरावून नेईल ? रंगा, हे तुझे हात माझे होऊं देत. तूं जाणारच असलास तर तुझे हात माझ्या हातांत देऊन जा. तुझी कला माझ्या हातांत, माझ्या बोटांत ठेवून जा. हे हात माझे आहेत. सातजन्मांचे माझे." तिनें त्याचें हात हृदयाशीं धरले. ती ते खाऊं लागली.

" हें काय नयना ? "

" तुझी कला चुंबून घेतें. "

" वेडी आहेस. "

नयना उठून गेली. वरतीं गच्चींत जाऊन बसली. राममंदिराचा कळस दुरून दिसत होता. किती तरी वेळ ती बसली होती. सुनंदा, ताई आलीं तरीं तिला कळलें नाहीं.

" नयना, चल खालीं. गार वारा सुटला आहे. पाऊसहि येईल. "

" पाऊसच मला हवा आहे. सुकलेलें जीवन अंकुरित होईल, हिरवें हिरवें होईल. आई, बसा. तुमच्या नयनाला एक भिक्षा घाला. "

" काय म्हणतेस तूं ? "

" रंगाचें नि माझें तुम्ही लग्न लावा. तुमच्या पवित्र हातांनीं आमचे हात एकमेकांच्या हातात द्या. मला नाहीं म्हणूं नका "

" रंगा आजारी. त्याचा भरंवसा नाहीं नयना. तुझें वाईट व्हावें असें मी कसें मनांत आणूं ? रंगा वांचावा म्हणून मी रामाला रोज आळवतें. परंतु दुखणें असाध्य. क्षय बहुधा. "

" मी रंगाला हवापालट करायला नेईन. तो बरा होईल. तो माझा आहे. मी दुसऱ्या कोणाची नाहीं. जगांत त्याची म्हणून जगेन, त्याची म्हणून मरेन. माझ्या जीवनावर त्याच्या मालकीचा अमर शिक्का असो. मी त्याच्या आत्म्याशी जणूं लग्न लावित आहें. त्याच्यांतील कलेशी, दिव्यत्वाशीं. "

" नयना, ही भाषा झाली. परंतु मनुष्य नेहमीच अशा भावनेंत नसतो. "

" खरं आहे आई. परंतु मी काय सांगूं ? तुम्ही नाहीं म्हणूं नका. रंगा बरा होईल. "

" बरा झाल्यावर मग बघूं. "

" नाहीं. तो स्वार्थ दिसेल. रंगा कसाहि असो. त्याची होईन तेव्हांच आतां माझ्या जीवनांत रंग. आज रात्रीं या आकाशाखालीं तुम्ही आमचें लग्न लावा. ताई साक्षीला. हे अनंत तारे साक्षीला. "

आणि सारें ठरलें. ताई जवळच्या म्युनिसिपल बागेंत रात्रीची गेली. तिनें दोन सुंदर माळा केल्या. पंढरीनें आणलेला गालिचा गच्चींत घालण्यांत आला.

ताईनें रंगाला हळूच धरून वर आणलें. जवळ नयना बसली. सुनंदानें दोघांचे हात मिळवले. दोघांनीं एकमेकांस हार घातले. ताईनें टाळी वाजवली.

" भाऊ, सुखी हो " ती म्हणाली.

" ताई, आज तूं मला पुन्हां भाऊ म्हटलेंस. "

" आज सारीं ग्रहणें सुटलीं. आज मी आनंदी आहें. "

" नयना, मला क्षमा कर. तुझें पत्र मी फाडलें, फोटो मी फाडले. फाडल्यावर जुळवीत बसलें. मला क्षमा करा. मी एक अशान्त स्त्री आहें. "

ताई खालीं निघून गेली. सुनंदा खालीं गेली.

" दमला असशील तूं, माझ्या मांडीवर डोकें ठेवून पड. " नयना हळुवारपणें म्हणाली.

रंगा तिच्या मांडीवर डोकें ठेवून पडून राहिला. दोघें परम सुखसागरांत डुबत होतीं.

" नयना, मी देवाघरीं गेलों तर भारतचित्रकलाधाम तूं चालव. "

" परंतु तूं बरा होशील. मी तुला घेऊन जाईन. "

" कोठें नेशील मला ?"

" जेथें बरा होशील तेथें. "

" देवाघरीं बरा होईन. "

" तेथें नेईन तुला. "

" वेडी हो तूं. "

" कलावान् सारे वेडेच असतात. तूं नाहीं वेडा ? "

" नयना, माझीं चित्रें पाठव. युद्ध थांबेल. भारत स्वतंत्र होईल. जागतिक प्रदर्शन भरेल. स्वतंत्र भारतांतील चित्रांचा जयजयकार होईल. मला विश्वास वाटतो. मी नसलों तरी तूं असशील. आणि भारतमाता तर अनाद्यनन्त आहेच. तिचा महिमा वाढावा, तिची कीर्ति वाढावी, म्हणून तर हीं शरीरें, या कला, ही बुद्धि, खरें ना ?



" आई, मी थोडे दिवस घरीं जाऊन येतें. बाबांना सारें सांगून येतें. आमच्या लग्नाला त्यांचा आशीर्वाद घेऊन येतें. ते प्रसन्न झाले तर प्रभूची कृपा. मग मी रंगाला घेऊन कोठेंतरी दूर जाईन. हवेच्या ठिकाणीं तो बरा होईल. तो इतक्यांत तुम्हां आम्हांला नाहीं सोडून जाणार. त्याच्या कलेचा सुगंध सर्वत्र दरवळेपर्यंत तो कसा जाईल. ? येऊं ना घरीं जाऊन ? "

" ये बाळ. तुझें प्रेम पाहून मला धन्यता वाटली. सावित्रीची आठवण झाली. सत्यवान् मरणार असें जाणूनहि तिनें त्यालाच माळ घातली. तुझी प्रीति, तुझी निष्ठा त्याच तोलाची. ये जाऊन. तुझे वडील तुला दूर लोटणार नाहींत. थोडा वेळ रागावतील, रुसतील. परंतु पुन्हां तुला जवळ घेतील. ये जाऊन. "

नयना आज सायंकाळच्या गाडीनें जाणार होती. हल्लीं घरांत तीच स्वयंपाक करी. कधीं संध्याकाळीं ताई करी. ताई आतां विरक्ताप्रमाणें वागे.

" नयना, लौकर ये परत. रंगाची मला काळजी वाटते. भाऊ वरून आनंदी दिसला, हसला खेळला, तरी त्याचें जीवन पोखरलें गेलें आहे."

" मी त्याला कोठेंतरी नेईन "

" परंतु वडील नाहीं प्रसन्न झाले तर " !

" तर मी कोठेंतरी नोकरी करीन आणि तुम्ही भाऊला घेऊन कोठें तरी सुंदर हवेच्या ठिकाणीं रहा. रंगाच्या बोटांतील दिव्य कला जरी या माझ्या बोटांत नसली तरी मीहि सुंदर चित्रें काढूं शकतें. मुंबईस मुलींचा चित्रकलावर्ग चालवीन. रंगाला मी मरूं देणार नाहीं. तुम्ही कशाची घ्याल काळजी ? मी लागतील तितके पैसे पाठवीन. "

“ मी शिकलेली असतें तर मीच पाठवले असते. तुम्ही रंगाबरोबर गेलां असतां. घरीं जाऊन तर या. ”

“ ताई, मला तुम्ही असें नका म्हणूं. ”

“ अजून एखादेवेळेस तें तोंडांत येतें. नयना, रंगावर किती तुझें प्रेम ! मला वाटे कीं रंगावर माझें प्रेम आहे. ती भूल होती. तो माझा भाऊच आहे. तुमचें पत्र मी फाडले, फोटो फाडले ! माणूस किती द्वेषीमत्सरी असतो. तुम्ही माझ्याजवळ प्रेमानें वागतां. मनांत अढी ठेवलीत नाहीं. रंगा, तुम्ही, सुनंदाआई, सारी थोर माणसे. ”

“ ताई, तूंहि तशीच आहेस. मनाच्या किती धडपडीतून तूं गेलीस. रात्रंदिवस तुझ्या मनांत नाना वृत्तिप्रवृत्तींचा तुमुल झगडा होता. तू त्यांतून पार पडलीस. तुझा मनश्चंद्र निर्मळपणें पुन्हां शोभूं लागला. परंतु ताई दुःखी कष्टी नको असूं. रंगाला त्यामुळें वाईट वाटते. वैराग्यहि हंसणारे असावें, आनंदी असावें. महात्माजींच्या हास्याप्रमाणेच सुंदर वस्तु नाहीं म्हणतात. जवाहरलालांची आत्मकथा मी वाचली. तिच्यांत ते म्हणतात गांधीजींचें मुक्तहास्य ज्यानें पाहिलें नाहीं, ऐकलें नाहीं, त्यानें फारच मोठी गोष्ट गमावली. ताई, वैराग्य दुःखी कष्टी नको. झाडाला वर फूल यावें त्याप्रमाणे धडपडणाऱ्या जीवनाला असें प्रसन्न अनासक्तीचे, विरक्तीचें फूल लागावें. ताई, मी का हें तुला सांगावें ? मी संसारांत रमावें आणि तुला वैराग्याच्या गोष्टी सांगाव्या हें अनुचित आहे. ताई, मी तुला एक विचारूं ? तूं खरेंच का अतःपर संन्यासिनी राहणार ? तुझें माझें वय जवळ जवळ सारखें; चारपांचवर्षांचा फरक असेल. परंतु तूं किती दिव्यांतून गेलीस. ताई, अशी का तूं खिन्न ?”

“ काय सांगूं नयना ? मी एक चंचल स्त्री आहें. ”

“ आपण सारींच अधूनमधून चंचल असतों. तरीहि सर्व जीवनांत एक सुसंगति असते. रस्ता का नेहमीं सरळच जातो ? तो वेडावांकडा गेला तरी एक अखंड रस्ताच. ”

“ नयना, रंगाचे मित्र परवां आले होते ना ?

“ ते लढाईवर गेले ते ?”

“ हो. त्यांना पाहुनहि माझ्या शतस्मृति जणूं जागृत झाल्या. मी का त्यांची कोणी पूर्वजन्मींची होतें ? ”

" तूं रंगाजवळ बोललीस ? "

" नाहीं. कोणाजवळ कशाला बोलूं ? "

" पंढरीला जर प्रेमबंध निर्माण झाला असता तर तो असा मरायला जाताना, बेफिकीर वागताना."

" नयना, कशाला ही फुकट बोलणी ? माझी दु:खे, माझ्या निराशा, माझें चांचल्य, सारें मला भोगूंदे, अनुभवूंदे. माझ्या जीवनाची निःसारता नि भेसुरता मला अनुभवूंदे. तूं घरी जाऊन ये. रंगाला वांचव. तांतडी करायला हवी. या दहा बारा दिवसांत तर तो अधिकच थकला तरी चित्र काढीत बसतो."

" तेंच त्याचें अमृत रसायन. तो त्याचा प्राण."

" नयना, ज्याचे मरण कदाचित् ओढवेल लौकरच, अशाजवळ लग्न करायला तुम्ही कशा तयार झाल्यात ? "

" मला त्यांचे मरण दिसतच नाही. मला अमर अशी त्यांची ववधवित अज अजित मूर्तिच सदैव दिसते. विश्वाच्या रंगाने रंगलेला रंगा मला दिसत असतो."

" तुमचे बोलणेहि मला समजत नाहीं. तुमची ताई एक अडाणी स्त्री आहे. "

" ताई चल. रंगाला कांहीं खायला द्यायला हवे."

दोघीजणी गेल्या. त्यांनीं थोडा सांजा रंगासाठीं केला. नयनानें त्याला भरवला. तो पडूनच होता.

गाडीची वेळ झाली. नयना निघाली. ती रंगापाशी उभी होती. डोळे मिटून व त्याच्या अंगावर हात ठेवून उभी होती. ती का त्याच्या जीवनांत स्वःतचे प्राग ओतीत होती ? शेवटीं सद्गदित होऊन म्हणाली :

" तुला सोडून जातांना वेदना होतात. आतडें दूर करावें तसें वाटतें रंगा, जाऊन येतें हां. मग आपण दूर दूर जाऊं. "

" आकाशांत, स्वर्गांत ? "

" आपला स्वर्ग जेथें आपण असूं तेथें. तो दूर नाहीं. येथें मी उभी आहें. येथें मी स्वर्गसुखच अनुभवित आहें. "

" तूं काव्य-देवता आहेस."

" तूं स्फूर्तिदाता. तूं रंग-देवता आहेस, ध्येयमूर्ति आहेस. माझ्या देवा, माझ्या जीवना, मी येईपर्यंत नीट रहा. "

" लौकर ये. माझा काय भरंवसा ? "

" असें नको बोलूं. "

" तुझें माझ्या आत्म्यावर ना प्रेम आहे ? भीति कशाची ? माझें मरण तर मी समोर पहात आहें. "

सुनंदाताई शेवटीं म्हणाल्या :

" नयना गाडी चुकेल. नीघ आतां. असलीं बोलणींहि नकोत. "

" येतें रंगा, जपा सारीं. "

असें म्हणून नयना निघाली. पोंचवायला ताई गेली होती. बायकांच्या डब्यांत कोणी नव्हतें. नयना त्यांतच बसली. ती निर्भय स्त्री होती. युरोपांतून जाऊन आलेली.

" ताई, मी येईपर्यंत रंगाला जपा, सांभाळा. "

" चिंता नको करूं. "

" मघाचें त्याचें बोलणें ऐकून हृदयाला चर्र झालें. "

" सांभाळणारा प्रभु. "

गाडी गेली. नयना जड मनानें घरीं जात होती. वडिलांच्या हृदयाला पाझर फोडायला जात होती, होतील का ते प्रसन्न, देतील का आशीर्वाद, देतील का मदत ?

नयना गेल्यापासून रंगा अधिकच अशक्त झाला. तो विषेश बोलत नसे. कांहीं दिवस गेले.

" ताई, नयनाचें पत्र आलें का ? कधीं येणार ती ? "

" तुझ्या हवापालटाची सारी व्यवस्था करून येईल. "

" कसली हवापालट ? मी आतां एकदम थेट जाणार आहें. वासुकाकांच्या जवळ, आईबाबांजवळ, देवाच्या घरीं. "

" असें नको बोलूं रंगा. तुझे जरा पाय चेपूं ? "

" नको. तुम्हां सर्वांना माझ्यासाठीं किती त्रास ! मी कोठला कोण ? जन्मल्यापासून मी सर्वांना राबवित आहें. पुरे हें जीवन, निरुपयोगी, निस्सार जीवन. मी कोण भारताची कीर्ति दिगंतांत नेणारा ? व्यासवाल्मीकींनीं, रामकृष्णबुद्धांनीं, महात्माजी, गुरुदेव, पंडितजी, यांनीं ती दिगंत नेली आहे. उगीच मला मूर्खाला कांहीं तरी वाटे. बुडबुड्यानें क्षणभर सूर्याच्या प्रकाशानें रंगून

मिरवावें तसा मी. वासुकाका म्हणायचे आणि मला बावळटाला तें खरें वाटायचें. ते प्रेमानें म्हणत. मी वेडा. कांहीं तरीच मला वाटे. आज मी कोण तें मला कळलें. झाडाचें मी एक पान, पावसाचा मी एक थेंब. गवताची मी एक काडी, वाळूचा मी एक कण."

"रंगा नको बोलूं" ताई म्हणाली.

"बोलूं दे. खेळ खलासच व्हायचा आहे सारा."

"खेळाला आतां तर सुरवात झाली. नयना किती आशेनें आहे. तुला दूर नेईल, बरें करील."

"परंतु प्रभूच दूर नेणार आहे, बरें करणार आहे." सुनंदाआईना आतां राहवेना. त्या पुढें आल्या. रंगाजवळ बसून म्हणाल्याः

"असें कांहीं बोलूं नकोस. तुला त्यांचें स्वप्न पुरें करायचें आहे."

"माझी ती पात्रता नाहीं. माझ्यांतून सारी शक्ति जात आहे असें वाटतें."

"हा भ्रम आहे. सारी शक्ति तुझ्यांत आहे. मातीच्या कणांतूनच नवीन सृष्टि उदयास येते. पावसाचा एक थेंबच हिरवी सृष्टि उभी करतो. झाडाचें एक पान, परंतु द्रौपदीनें एक भाजीचें पानच प्रभूला दिलें. त्याला ढेंकर आली. आणि त्या प्रभूला मरतांनाहि एक पानच आधार देत होतें. तें लहानसें पान तुच्छ नको मानूं. तें छाया करून किड्याला सांभाळतें, दंवबिंदूला पटकन् आटूं देत नाहीं. प्रभूचें वैभव कणाकणांत भरलेलें आहे. त्या विश्वानलाच्या आपण अनंत ठिणग्या, त्या चिदंबराच्या आपण लहान लहान चित्कळा. प्रत्येक वस्तु वा व्यक्ति लहान असून महान आहे असें ते म्हणत. गच्चींतील त्यांची ती अमर वाणी नाहीं का आठवत? पडून रहा. बरा हो. भारताची कीर्ति दिगंत ने."

"दे माझे रंग, दे माझे कुंचले. मी अमर चित्र रंगवतों. मरणाऱ्या चित्रकाराचें अमर चित्र. आणा सारें सामान. मला स्फूर्ति आली आहे. हीं बघ बोटें थरथरत आहेत. त्यांना कळा लागल्या आहेत. त्यांतून चित्र बाहेर पडूं इच्छितें. ताई, दे रंग, दे कुंचले."

"आतां रात्रीं?"

"रात्रीलाच गंमत असते. मला वर गच्चींत न्या. पंढरीचा तो गालिचा आंथरा. काबुली गालीचावर बसून शेवटचें चित्र रंगवतों. अनंत आकाशाखालीं बसून, अनंताचा स्पर्श अनुभवित, वाऱ्याचा संदेश ऐकत चित्र रंगवतों. त्या

गालिच्यावरच आमचे लग्न लागलें. माझा हात आतां एकट्याचा नाहीं. तो बळकट आहे. नयनाची व माझी संयुक्त शक्ति, संयुक्त कला आज या बोटांतून प्रकटेल. पूर्वपाश्चिमेने न कधी पाहिलेले असे सौंदर्य आजच्या चित्रांत येईल. मी आज विश्वाचा झालों आहें. साऱ्या दिशा भेदून पलीकडे गेलों आहें. जणूं विश्वाच्या मुळाला मी हात घातला आहे आज ताई, रंगाचा हा कुंचला आज अनंताला स्पर्श करित आहे. माझ्या समोर सारें विश्वब्रह्मांड या क्षणी पुंजीभूत होऊन उभें आहे. हे बघ, हे बघ अनंत आकार, असीम आकृति ! प्रभु आज माझ्या-समोर सारे भांडार उघडे करित आहे. अर्जुनाला मिळालेली दिव्य दृष्टि आज मला जणु लाभली आहे. विराट् कला, विराट् रंगसृष्टि माझ्या सभोंती आहे. माझ्याभोंवती रंगसिंधु घों घों उसळत आहेत. अनंत आकार नाचत आहेत. आण माझे रंग, माझे कुंचले. हे जें डोळ्यांसमोर दिसत आहे, हें जे क्षणभर समोर चकाकत आहे, लकाकत आहे, तें अमर करून ठेवूं दे या छायाप्रकाशांना ब्रशानें पकडून, कुंचल्यांनीं रंगवून अमर करतो. चित्रकाराचे विश्वरूपदर्शन."

"रंगा, काय बोलतोस तूं?" सुनंदाने विचारले.

"आई, आज मी सांगतो तसें करा. नवबाळाला जन्म देऊं पाहणाऱ्या नव मातेची वेदना मी अनुभवित आहे. मला वर न्या. तेथें रंग, कुंचले, सारे ठेवा. तो मंगल गालिचा आंथरा. सृष्टीशीं समरस होऊन आज मी रंगवीन. विश्वमातेच्या मांडावर लोळत खेळत मी रंगवीन. तुम्ही तेथे कोणी नका बसूं. चिन्ता नका करूं. रंगा आज अमर चित्र रंगवणार आहे. करा सारी तयारी."

ताईनें गच्चींत तो गालिचा आंथरला. तेथें टेकायला लागली तर गादी ठेवली. तेथें स्वच्छ तांब्याभांडें ठेवलें. त्याचें चित्रकलेचें सारे सामान तिनें तेथे मांडलें.

"रंगा, चल वरतीं."

तो हळूच उठला. ती त्याला वर घेऊन गेली. अनंत तारे चमचम करित होते.

"आज अमावास्या कीं काय?" त्यानें विचारलें.

"असेल बहुधा" ताई म्हणाली.

" मला पुनवेपेक्षां अमवास्या आवडते. गंभीर वाटते. पौर्णिमेला चंद्राचें तें पिठासारखें चांदणें. परंतु अमावास्येला अनंत तारकांची द्युति चमचम करित असते. प्रत्येक कण तेजोमय आहे. अणुअणूंतहि अपार शक्ति आहे, अपार वैभव आहे. अमावास्येलाच सारे पूर्वज, सारे पितर भेटायला येतात. जणूं स्वर्ग पृथ्वीजवळ येतो. अनंत तारे जणुं अनन्त आत्मे. त्यांनी ओथंबून आकाश खालीं नमते, वांकतें, पृथ्वीला भेटतें आज अमावास्या. आज बाहेरचा चंद्र नसला तरी जीवनांतील चंद्र षोडश कलानीं फुलतो. खरें म्हणजे पौर्णिमा वा अमावास्या अलग नाहीतच छाया नि प्रकाश एकरूपच आहेत. सारे काळ एक आहेत. सारें विश्व एक आहे. प्रकाशाच्या पोटातहि अंधार असतो. अंधाराच्या पोटांत प्रकाश असतो. डॉक्टरांच्या दवाखान्यात विषेंच अधिक असतात. विषें देऊन ते जगवतात. विषाच्या पोटात, विषाच्या घोटांत अमृत आहे. सारे भेद खोटे, खोटे. मानवांत दानवता आहे, दानवांत मानवता आहे. उभयतांत मधून मधून देवत्त्वहि झळकतें. कोणी त्याज्य नाहीं. सारे वंद्य नि पवित्र. ये अमावास्ये ये तुझ्या गंभीर प्रकाशांत मला रंगवूं दे."

" भाऊ दिवा हवा ना ? "

" लहानसा दिवा ठेव येथे लावून "

मध्यरात्र झाली. त्या मंद प्रकाशांत रंगा रंगवित होता. त्याची सारी कला उचळून आली होती, उचंबळून आली होती. तो तन्मय झाला होता. दिक्कालातीत होता.

मधून ताई येऊन पाहून जाई. सुनंदा येऊन पाहून जाई. परंतु रंगाची भावसमाधि कोणाला मोडवत नसे. पहांट झाली. वारा थंडगार येत होता. कोंबडा हि आरवला. आणि तो मिलचा भेसूर भोंगा झाला. कामाला चला, उठा, सर्वांना सांगत होता. परंतु रंगाचें काम समाप्त होत होतें. त्यालाहि संदेश येत होता, दुरून कोणी तरी हांक मारित होतें. परतीरावरून साद येत होती. वेणु वाजत होती जणूं. तो मंत्रमुग्ध होता.

सूर्य उगवत होता. मंदमधुर प्रकाश येत होता. डोंगरांच्या माथ्यावर, झाडांच्या शिरावर पसरत होता. रंगाने तेथील गादीवर डोकें ठेवलें. त्याच्या मुखावर मंद प्रभा पसरत होती. ते सोनेरी कोवळे किरण त्याच्या केंसाना स्पर्श

करित होते. प्रभू जणूं अनंत हस्तांनीं त्याला कुरवाळित होता, ऊब देत होता. तो त्याला निजवित होता कीं उठवित होता. ?"

स्टेशनांत पहांटेची गाडी आली. नयना लगबगीनें उतरली. ती घरीं आली. ताई नि सुनंदा झोंपलेल्या होत्या. आश्चर्य म्हणजे दार उघडें होतें! नयनानें लोटलें तों उघडलें! जणूं कोणी येणार या कल्पनेनेंच उघडें ठेवलें गेलें. नयना आंत आली. सारें शान्त होतें. ताई, सुनंदा का रात्रभर जागरण करित होत्या? आणि रंगा कोठें आहे? कोठें आहे रंगा? त्याची खाट रिकामीशी? कोठें आहे रंगा? तिचें हृदय चरकलें, मन थरकलें. ती वर गेली. गच्चींत जाऊन उभी राहिली. तों तेथें लोडाकार गादीवर डोकें ठेवून रंगा शान्त पडून होता. हातांत तो रंगानें रंगलेला कुंचला होता. समोर तें विश्वरूपदर्शन होतें. चित्रकाराचें विश्वरूपदर्शन!

परंतु तेथें हालचाल नव्हती. छातीचें खालींवर होणें नव्हतें. नयना जवळ बसली. तिनें रंगाचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें. ती डोळे मिटून बसली. थोड्या वेळानें तिनें डोळे उघडून त्याच्याकडे पाहिलें. "रंगा" ती केविलवाणें बोलली. ती गंभीर झाली. तिनें त्याच्या मुखावर मुख ठेवलें. तिचे अश्रु त्या प्रसन्न शान्त मुखकमलावर घळघळले. तिनें पदरानें ते पुसले. त्या शान्त मुखचंद्राकडे ती बघत होती. संपलें का तें जीवन? कोमेजलें का फूल? ती डोळे मिटून बसली.

ताई नि सुनंदा उठून वर आल्या. तों तें गंभीर, हृदय विरघळवणारें दृश्य.

"केव्हां आलीस नयना?" ताईनें विचारलें.

"केव्हां ग आलीस?" सुनंदा म्हणाली.

"आई, ताई, खेळ संपला. ही चिरनिद्रा. विश्वमातेचा बाळ तिच्या घरीं गेला."

"काय म्हणतेस?"

"काय म्हणूं? नाडी नाहीं, श्वास नाहीं. प्राणहंस निघून गेला."

ताई धांवली. एका डॉक्टराला घेऊन आली.

"संपलें सारें" डॉक्टर म्हणाले व गेले.

त्या तीन स्त्रिया तेथें अगतिकपणें बसल्या होत्या. आणि तें भव्य चित्र तेथें होतें. जीवनाचे शेवटचे रंग ओतून निर्माण केलेलें अमर चित्र! नयना खालीं

वांकून म्हणाली: " रंगा, तुला न्यायला आलें तर देवानेंच आधीं तुला नेलें. शेवटचे शब्दहि आपण बोललों नाहीं. रंगा, माणसाचा काय भरंवसा असें मी जातांना तूं म्हणालास. ती का भविष्यवाणी होती ? रंगा रे, कां असा गेलास ? कां ?"



" आई, मी मुंबईला जातें. कोठें तरी नोकरी चाकरी बघतें. तुमची जबाबदारी आतां माझ्यावर आहे."

" नयना, कशाला तुला कष्ट ? मुंबईस कोठें राहणार, कोठें जाणार ? "

" रंगाच्या बापूंकडे जाईन. "

" ते देवमाणूस. "

नयनाने खरोखरच जायचें ठरविलें. तिनें बापूंना आधी एक पत्र पाठवलें.

" ति. बापूंच्या चरणीं कृ. सादर प्रणाम.

मी रंगाकडून तुमच्याविषयी ऐकत असें. त्याच्या जीवनात अनेकांनीं अनेक रंग भरले. तुम्हीहि त्यांच्यापैकीं एक. रंगाचें रमणीय जीवन एकाएकी संपलें. मी रंगाची पत्नी. माझें नांव नयना. रंगाची मानलेली आई व मानलेली बहीण यांचा सांभाळ आतां मी केला पाहिजे. मी मुंबईला येत आहे. प्रथम तुमच्याकडे उतरायला येऊं इच्छितें. मग कोठें मिळेल जागा. येऊं ना ? मुलींचा चित्रकलेचा वर्ग काढूं इच्छितें. तुमचा आधार द्या. सर्वांस स. प्रमाण

नयना "

बापूसाहेबानी रंगाच्या निधनाची बातमी वाचली होती. दुधगावच्या चित्रकाराचा मृत्यु अशी बातमी वर्तमानपत्रांत आली होती. बरेच दिवसांत त्यांना रंगाचे कांहींच कळलें नव्हतें. दुधगांवला कोणाकडे पत्र पाठवायचें, त्यांना कांही सुचेना. आज नयनाचें पत्र त्यांना मिळालें. त्यांनीं सहृदय पत्र लिहून तिला बोलावलें. विनासंकोच या. आमच्याकडे रहा असें लिहिलें.

" आई, जातें मी. तुम्ही प्रकृतीला जपा."

" आम्हांला देव कशाला नेईल ? तो गुणी लोकांना आधीं नेतो."

"त्याला सारीच प्रिय. देवाचीं ना कोणी आवडतीं ना नावडतीं."

नयना निघून गेली. मागें वडिलांकडे गेली तेव्हां डब्यांत एकटीच होती. आजहि एकटी. ती शून्य मनानें बसली होती एकाएकी तिचे डोळे भरून आले. ती बोलूं लागली: " रंगा, कां रे मला सोडून गेलास? किती माझीं स्वप्नें, किती आशा! कां रे राजा गेलास? मी मुंबईस नोकरी करून तुला आरोग्यधामांत ठेवणार होते. ताई तुझ्याजवळ राहिली होती. मला किती आनंद झाला असता तुझ्यासाठी श्रमतांना, काम करतांना. तूं बरा झाला असतास. शेवटचे दोन शब्दहि तुझ्याजवळ नाहीं बोलतां आले. मी दुर्दैवी. गाडींत मला वाटलेंच कीं काहीं तरी होणार म्हणून. किती लगबगीनें घरीं आलें. तों तूं चिरनिद्रेत गेलेला. रंगा, माझी आठवण काढीत गेलास? त्या तुझ्या अखेरच्या चित्रांत माझाहि एक आकार आहे असे वाटलें. शेवटच्या कुंचल्यानें अनंत आकृतींत तूं माझीहि आकृति रंगवली आहेस. रंगा, तुझें माझ्यावर खूप प्रेम होतें. मी ते जाणत होते. तुझ्यासाठी नाहीं रे काही करता आले बाबा, कठोर बाबा. त्यांना पाझर फुटावा म्हणून इतके दिवस तेथें राहिलें. ते नाहीं म्हणाले त्याचवेळेस निघून आलें असतें तर? तुला घेऊन कोठेंतरी गेलें असते. नव्हती इच्छा देवाची. रंगा, मी तुला म्हणायची तुझ्या आत्म्याजवळ मी लग्न लावले आहे. ते माझे शब्द खरे व्हावेत म्हणून का देह फेंकलास? असो, तुझा आत्मा माझ्याजवळ असो. माझ्या जीवनांत रहा. माझ्या बोटांत येऊन बस. तुझी ती दिव्य कला! दारिद्र्यांत नाहीं रे वाव! इतर देशांत जन्मतास तर तुला डोक्यावर घेते. पुन्हां या गरीब महाराष्ट्रांत जन्मलास. ज्यांच्या कलेचा कोणी गौरव करणार नाहीं. कोण त्यांच्या संबंधीं इंग्रजींत लिहिणार? प्रसिद्धिपराङ्मुख महाराष्ट्र! येथें लहानमोठ्या कला-शाळा का थोड्या आहेत? परंतु कोण त्यांना आधार देणार? स्वराज्यांत तरी मिळेल का? का कांहीं प्रान्त सारें बळकावतील? भारतीय ध्येयांची उपासना ते ते प्रान्त करतील. सर्वांना संधि हवी, सर्वांना साहाय्य हवे. त्याहि वेळेस वशीले येतील का? रंगा, स्वतंत्र हिंदुस्थानांतील पार्लमेंट तूं रंगवणार होतास! स्वतंत्र हिंदुस्थानांत तरी पुढें तुला कोणी बोलावलेंच असतें याचा तरी काय भरंवसा! कोणी तुझी दाद लावली असती, कोणी तुझी कला ओळखली असती? म्हणून तूं गेलास?"

नयना मध्येंच मोठ्याने बोले. पुन्हां डोळे मिटून बसे. मध्येंच तिचे डोळे भरून येत. अशा रीतीनें गाडींतून ती जात होती. वाटेंत तिच्या डब्यांत कांहीं स्त्रिया आल्या. परंतु गर्दी नव्हती. तिनें बॅगेंतून रंगाचीं चित्रें काढलीं. ती त्यांच्याकडे पहात होती. पुन्हां तिनें तीं ठेवून दिलीं. ती पेन्सिलीनें कांहीं काढीत बसली. स्टेशन आलें म्हणजे काढी. पुन्हां बंद ठेवी. नाशिकचें स्टेशन आलें. एक पारशी बाई मुलीसह डब्यांत चढली. नयना चित्र काढीत होती. ती मुलगी तिच्याजवळ येऊन बसली. तेथे खिडकी होती. मुलांना खिडकी हवी. त्यांना प्रकाश, हवा, बाहेरची विपुल सृष्टि हीं हवीं असतात. नयनाच्या चित्राकडे ती मुलगी बघत होती.

"जो जो मा, केटला सारू" ती आनंदून म्हणाली.

"सारू तो छेज" आई म्हणाली.

नयनाला त्या मुलीचें कौतुक वाटलें.

"तुला छान चित्रें दाखवूं?"

"हां. चित्रकलामां मने बहुत रस छे."

नयनानें रंगाचीं कांहीं सुंदर चित्रें दाखवलीं. तिनें स्वतःचींहि कांहीं दाखवलीं."

"आ कोण चित्रकार?"

"एनुं नाम रंगा"

"क्यां छे, क्यां रहे छे?"

"प्रभूना घरे. पृथ्वी छोडी चाली गया"

"अरेरे, केटली सरस कला एनी हाथमां हती"

नयनाचें त्या दोघींना वेड लागलें.

"मुंबईमां आमारे त्यां आवजो. आ लडकीने शिखावजो. आमारे त्यां तमारी रहवानी पण सगवड करवामां आवशे. ना ना पाडजो. मणी, केम बेटी?"

"सारु"

"तमारूं नाम?"

"नयना"

"नयन एटले आंख. तमे तो आंख छो. प्रभूनो आंख. सुंदर नाम. आवजो हां बेन. पूर्वजन्मनी पहछान हशे एम लागे छे."

नयनाला मणीच्या आईनें स्वतःचा पत्ता दिला. मणीला तर तिचें वेड लागलें.

"तुमच्या बॅगेंत काय आहे बघूं? आणखी चित्रें आहेत?"

"बघ आहेत का."

मणीनें बॅग उघडली. सारें पाहिलें. तिनें नयनाला फळें सोलून दिलीं. नयनाचे डोळे एकदम भरून आले.

"आंखमां पाणी शा माटे?"

"आंख दुखे छे"

मणीनें नयनाचे डोळे पाहिले. फुंकर घालूं, कण गेला असेल, असें तिनें विचारलें. नयनानें तिला जवळ घेतलें. आणि ती मुलगी तिला बिलगून बसली. तिच्या मांडीवर डोके ठेवून पडली.

"मणी, सुवानी टाईम नथी बेटी. ऊठ."

"मने सुवादे जरा."

ती निजली. आणि नयना तिच्या केसांवरून हात फिरवित होती. मणीची आई बोलत होती; विचारित होती. नयना थोडें थोडें सांगत होती.

घाट संपला. इगतपुरी, कासारा जाऊन कल्याण आलें. मणी उठली. तिनें हंसून नयनाकडे पाहिलें.

"स्टेशनपर हमारी मोटर आवशे. अमारे त्यांज चालोना नयना"

"ना, एम केम चाले. हूं तमारे त्यां आवीश, पीछे आवीश."

"भूलना नहीं."

"केम भूलूं? मणीनी लागणी छेज ना"

नयना दादरलाच उतरली. तिनें मणीच्या हातांचें चुंबन घेतलें. मणी तिच्याकडे पहात होती. गाडी गेल्यावर नयना बापूसाहेबांकडे गेली. ते घरीं वाटच पहात होते. सायंकाळ झाली होती. नयना थकली होती. मणीमुळें तोंडावर जरी थोडी टवटवी आली असली तरी ती वरवरची होती. जीवनाचे आंतील झरे जणूं सुकून गेले होते. ती तेथें भिंतीशीं बसली. तिचे डोळे भरून आले. तिला हुंदका आला. ती स्वयंपाकघरांत गेली. बापुसाहेबांच्या प्रेमळ पत्नीनें धीर दिला.

"नको रडूं नयना."

" रडूं नको तर काय करूं ? आम्हीं एकमेकांच्या जवळ आलों काय नि क्षणांत कायमची तातातूट होते काय ? विश्वशक्तीचे आई काय हे खेळ ? "

" जो देतो तो नेतो. आपली कशावर आहे सत्ता ? म्हणून नाशिवंताचा शोक करूं नये. जें अविनाशी आहे तें कोण नेणार ? "

" तें अविनाशी साकार पहाण्यांतच मनाला समाधान वाटतें. मी लहान आहें आई; कोठून आणूं आध्यात्मिक समाधान ? "

शोकावेग ओसरला. सर्वांचीं जेवणें झालीं. एकदोन दिवस असेच गेले. नंतर त्या पारशी मातेकडे नयना गेली. तिची त्याची जणूं शतजन्मांची ओळख. तिला तें घर आवडले. तेथील वातावरण आवडले. मणीची आई तिला एक खोली देणार होती. मणीला शिकवावें, रहावे. काय द्यायचें घ्यायचें तेंहि ठरलें.

" तुम्हांला घरीं पाठवायला लागेल ते मागत जा. पन्नास लागोत, दोनशें लागोत " मणीची आई म्हणाली.

नयना बापुसाहेबाकडे आली. तिनें सारी हकीगत सांगितली. जाऊं का म्हणून तिनें विचारलें.

" कांहीं हरकत नाहीं. तेथें राहणें नको वाटल तर हे घर आहेच. केव्हांहि या. ही मुंबई आहे. जपून रहा; नानाप्रकारचीं नाना माणसे. आपण विश्वासानें चालतों. परंतु कधी संकटातहि येतों. रंगाला सारे अ भव आले होते. लहानशा वयांत त्यानें किती भोगलें, किती अनुभवलें. "

" म्हणूनच तो लौकर गेला."

नयना मणीकडे रहायला आली. मणी अक्षै तिच्या खोलीत असायची. नयना तिला सारें शिकवी. चित्रकला विशेष विषय म्हणून शिकवी. कधी मणी-बरोबर ती फिरायला जाई. मणी समुद्राला हात जोडी. नयनाहि जोडी.

" तुमचा का आमचा धर्म ? "

" आमचा धर्म सर्वांशीं अविरोधी आहे. प्रभु सर्वत्र आहे असें आम्ही मानतों. नदी पाहून, दिवा पाहूनहि नमस्कार करणारे, समुद्र पाहून, सूर्य पाहून का नमस्कार करणार नाहींत ? आम्हीहि अग्नीची उपासना करतों. हे अग्ने, आम्हांला यश दे, पापांतून पलीकडे ने असे मंत्र आहेत. माझे बाबा म्हणतात."

" कोठें आहेत बाबा ?

" तिकडे लांब. "

"ते तुम्हांला पत्र नाहीं लिहीत?"

"ते माझ्यावर रागावले आहेत."

"माझे बाबा थोडा वेळ रागावले तरी पुन्हां मला जवळ घेतात."

"तूं दैवाची आहेस. चल आतां घरीं."

जगांत तर युद्ध पसरत चाललें होतें. रशियावर जर्मनीनें अचानक हल्ला केला. इकडे जपाननें तेच केलें हिंदुस्थानवर संकट येणार असे वाटले. हिंदुस्थाननें मुक्त झालेंच पाहिजे असें महात्माजींना वाटले. तडजोडी निष्फळ झाल्या. आणि तो महान् चलेजाव स्वातंत्र्यसंग्राम सुरू झाला. नयना आठ ऑगस्ट १९४२ च्या कॉंग्रेसच्या सभेला गेली होती राष्ट्रपित्याचे तें अडीच तास चाललेले भाषण तिने ऐकले. ती घरीं निराळी होऊन आली.

"नयनाबेन, कोठें गेली होतीस?"

"कॉंग्रेसच्या सभेला. मी महात्माजींचें भाषण ऐकलें. देशासाठीं मरावें असें मला वाटत आहे."

"म्हणजे काय करणार?"

"आपण स्वतंत्र म्हणून वागूं लागायचें. ब्रिटिश सत्ता संपली, ती मानूं नका, असे पुकारीत जायचे. येथील गव्हर्मेंट हाऊसवर राष्ट्राचा झेंडा लावायचा. गोळीबार झाला तर मरायचे. गुलाम म्हणून राहणे पाप आहे मणी."

रात्रीं नयना निजली नाही. ती चित्रे रंगवीत बसली. ब्रिटिशाच्या अन्यायाची चित्रे. सकाळ झाली. तो बातमी आली की सारे राष्ट्रपुरुष गिरफदार केले गेले म्हणून. आणि ज्वलंत बातम्या येऊं लागल्या. सारा देश उठावला. ब्रिटिश सत्ता हादरली. ठायीं ठायीं टापू स्वतंत्र होऊं लागले. भारतमातेचीं मुलें बेफाम झालीं. मरणाचा डर उडाला. तो पहा बिंदु नारायण, तो शंकर, तो नारायण, तो शिरीष, ती तरुलता, तो युसूफ, तो हेमू, तो वसंत, तो विष्णु-लहान लहान भारतमातेचे चिमणे बाळ! मृत्यूला वरित होते. नयना वार्ता ऐके. गंभीर बने. अष्टीचिमूरच्या कथा तिनें ऐकल्या. ती नागिणीप्रमाणें चवताळली. त्या रात्री तिनें पाशवी अत्याचार म्हणून चित्र रंगविलें. लिथोवर गुप्तपणें तिनें हजारों प्रती करून घेतल्या. ती पहांटे उठली. मणीला तिनें पत्र लिहून ठेवलें.

प्रिय मणी,

कदाचित् मी पकडली जाईन किंवा मारली जाईन. माझी बॅग दुधगांवला पोंचवा. तुम्हीं प्रेम दिलेंत, मी विसरणार नाहीं. भेटणें शक्य होईल तेव्हां भेटेन. "

' तीं चित्रें घेऊन गाणें म्हणत ती निघाली. ती चित्रें वाटीत होती. गाणें गात होती. ते पहा पोलीस आले. तिच्या हातांतील चित्रें हिसकून घेण्यांत आलीं. लोकांवर लाठी हल्ला झाला. नयनाला तुरुंगांत स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें. तिनें बापुसाहेबांना, सुनंदा आईला, मणीला पत्रें लिहिलीं. ती तुरुंगांत आनंदानें होती. तेथें तिनें चित्रकलेचा वर्ग सुरू केला. रंगाच्या उरलेल्या कल्पना ती तेथें रंगवूं लागली.

आबासाहेबांनी नयनाला अटक झाल्याचें वाचलें. सरकारदरबारीं त्यांचे वजन होतें. नयना माफी मागती तर ती सुटती. ते तिला भेटायला गेले.

" नयना, कां तुरुंगांत खितपत पडतेस? तुरुंगांत बसून का स्वराज्य येतें? "

" तर का घरीं माशा मारून येतें? "

" मला म्हातारपणीं दुःख नको देऊं. "

" तुम्ही मला अनाथ केलें. माझा रंगा! तुम्ही तुमच्या या मुलीला मदत देतेत तर त्याला मी वांचवूं शकलें असतें. या मुलीला विधवा केलेंत. "

" मरणोन्मुखाजवळ लग्न लावून पुन्हां मला दोष देतेस? "

" परंतु तो वांचला असता. निदान खटपट तरी आपण केली असती. आतां मला कोठले घरचे पाश? भारताचे पाश तोडणें हेंच आतां काम. रंगा म्हणे, भारताचें स्वतंत्र पार्लमेंट रंगवीन. रंगाचा चित्रसंग्रह स्वतंत्र भारताला मी अर्पण करीन. परंतु भारत आधीं स्वतंत्र तर हवा. ज्याला जें करतां येईल तें त्यानें करावें. मला माफी मागायला काय सांगतां बाबा? "

" तूं तुझ्या पित्याला म्हातारपणीं एकटें सोडणार? यासाठीं का तुला प्रेमानें वाढवलें? "

" पर्वत नदीला जन्म देतो. परंतु नदी सागराकडे जाते. म्हणून पर्वताला का राग येतो बाबा? मुली या शेवटीं दुसरीकडेच जायच्या असतात. आणि राष्ट्राच्या कामासाठीं तर सर्वांनीं धांवून यावें. तुम्हीहि तुरुंगांत या. "

" तूं नको मला शिकवायला. मी जातों. माझी मुलगी मेली म्हणून समजतों. "

पिता उठला. तिनें त्याच्या चरणांना प्रणाम केला.

" हें ढोंग कशाला ? "

" माझें हृदय देवाला माहीत. "

तो वृद्ध पिता गेला. नयना आपल्या खोलींत येऊन कातीत होती. ती अशान्त होती, अस्वस्थ होती. इतक्यांत इंदु, विजया, लता तिच्या खोलींत आल्या.

" चला वर्ग घ्यायला " इंदु म्हणाली.

" नयनाताई, मी काढलेलें चित्र दाखवूं ? हंसूं नका हं " लता म्हणाली.

" हंसण्यासारखें चित्र काढायचें नि हसूं नका म्हणायचें " विजयानें चिडविलें.

" लतेला नका चिडवूं " नयना म्हणाली.

" तुम्ही नेहमीं तिची बाजू घेता " इंदू बोलली.

" लतेला आधार लागतोच " नयना हंसून उत्तरली.

" तुमचा आधार तुरुंगापर्यंत. पुढचा बघायला हवा. "

" बघ हं विजया " लता रागावून म्हणाली.

त्या सत्याग्रही मुली जरा गंमत करित होत्या.

" आज नको वर्ग, मला आज बरें नाहीं. तुम्ही जा, वाचा, वादविवाद करा " नयना म्हणाली.

सर्व मुली गेल्या. लता तेथेंच बसली.

" कोण आलें होतें भेटायला नयनाताई ? "

" वडील "

" काय म्हणाले ? "

" माफी मागून सुटून ये "

" त्यांना घरीं कोणी नाहीं ? "

" ते एकटेच आहेत. माझ्यावर त्यांचा जीव. परंतु माफी का मागायची ? त्यांचें म्हातारपण आहे. मी त्यांच्या इच्छेविरुद्ध सारें केलें. परंतु मी वाईट कांहींच केलें नाहीं. प्रभूला का माझें करणें आवडलें नाहीं ? त्यानें रंगाला कां

न्याव ? माझें हृदय शुद्ध आहे. देवाला न आवडणारें मी कांहीहि केलें नाही. लता, तूं पुढें काय करणार ?"

"मी तुमच्या भारतचित्रकलाधामांत येईन. मी तेथें शिकेन."

"लते, सारीं स्वप्नें हीं. मला वाटे माझे वडील मुलीसाठी सारे देतील. त्यांतून संस्था काढूं. रंगाला आनंद वाटेल, त्याचा आत्मा फुलेल, देहासहि बरें वाटेल. परंतु सारीं स्वप्नें भंगलीं. रंगा गेला. त्याचीं ध्येयें मी कशीं प्रत्यक्षांत आणूं ? मी एक सामान्य स्त्री. लता, कोठें आहे भारतचित्रकलाधाम ? रंगाच्या खोलीवर पाटी होती. त्या लहानश्या जागेत तो आपलें ध्येय फुलवित होता."

"परंतु कधीं ती संस्था जर प्रत्यक्ष सुरू झाली तर मी येईन."

"ये. मी तुझी वाट पाहीन."

त्या दिवशीं रात्रीं नयनाला अद्भुत अनुभव आला. ती आपल्या कोठडींत एकटीच होती. रंगानें योजिलेल्या चित्रांपैकीं एक ती तयार करित होती. एकाएकीं तिला संस्फूर्त वाटलें आपल्यामध्यें कोणी तरी शिरत आहे असें वाटलें. आपल्या बोटांत कोणी तरी घुसत आहे असें तिला वाटलें. ती जरा बावरली, घाबरली. परंतु ओरडली नाहीं. तो काय आश्चर्य ? समोर तिला रंगा दिसला. ती बघत राहिली. ती त्याला भेटायला धांवली. कोठें आहे तो ? तो छायामय होता, स्वप्नमय होता. ती पुन्हां आपल्या आसनावर बसली. तिची जणूं समाधि लागली. तिला स्वत:चें भान जणूं नव्हतें. रात्रभर ती जागी होती. अपूर्व चित्र तिनें तयार केलें.

"नयनाताई, रात्रीं झोपलां नाहीं वाटतें ? किती सुंदर चित्र, खरेंच किती छान."

"लते, हें रंगानें काढलेलें चित्र आहे. बोटें माझीं, प्रेरणा त्याची. माझ्या बोटांत कोणी तरी शिरला होता, घुसला होता. मला खोलीत रंगा दिसला. आणि मी हें चित्र रंगवित बसलें. मी ? माझ्या द्वारा रंगाच सारें करित होता. मी जणूं त्याच्या हातांतील साधन बनलें होतें, माध्यम बनलें होतें."

"नयनाताई, रंगाजवळ तुमचें चिरलग्न लागलेलें आहे. ते तुमच्याशीं एकरूप आहेत. तुमच्या बोटांत आतां दोघांची कला. तुमच्या चित्रांत दोघांचे गुण उतरतील. तुम्ही दु:खी निराश नका होऊं. उठा, तोंड धुवा."

एके दिवशीं मणी नि तिची आई नयनाला भेटायला आलीं होतीं.

"नयना, हीं माझीं नवीन चित्रें. तुम्ही सुटल्यावर आमच्याकडे या. आमचें घर तुमचें. मीं तुमच्या खोलीतच बसतें, निजतें. तुमची खोली मी सजवली आहे. लौकर या."

"मणि, हीं इतकीं फळें कशाला?"

"तुमच्या मैत्रिणींना, सर्व सत्याग्रही भगिनींना"

"बद्धाने आपवा माटे" मणीची आई म्हणाली. भेट चालली होती. तों एकदम नयना सुटल्याची बातमी आली. तयारी करा, तयारी करा,असें येऊन शिपायी म्हणाला.

"आमच्या मोटारींतूनच तुम्हांला नेऊं. किती छान! आम्ही वेळेवर आलों. नाहीं नयनाताई?"

मणि नी तिची आई बाहेर जाऊन वाट बघत बसलीं. नयनानें सारें आंवरले. तिने सर्वांचा निरोप घेतला. तिनें लता, विजया, इंदु वगैरेंना चित्रें भेट म्हणून दिलीं.

"नयनाताई, माझे हें घड्याळ तुम्हांला घ्या. तुमच्या हातांत सुरेख दिसते. मिनिटा मिनिटाला माझी आठवण येईल."

लतेनें आपले घड्याळ नयनाच्या हातांत बांधलें. त्या जणूं दोघी बहिणी झाल्या होत्या.

नयना सुटली. बाहेर मणि होती. ती धांवली. तिनें नयनाच्या गळ्यांत पुष्पहार घातला, हातांत गुच्छ दिला.

"कोठून आणलीस ही फुले?"

"मोटारीनें पटकन् जाऊन आणली."

मोटार निघाली. परंतु नयना खिन्न होती, दुःखी होती.

"तुम्ही मुंबईला येतांना आमच्याकडे?"

"नाहीं; मला घरीं गेलें पाहिजे. वडील आजारी आहेत. ते मरणशय्येवर आहेत."

"अरेरे."

पुण्याच्या स्टेशनवर मणि नि नयना, दोघी उभ्या होत्या.

"पत्र लिही नयना."

"होय मणी"

"मी तुझ्याबरोबर येऊं?"

"मी भित्री नाहीं."

"तरीहि अशा वेळेस कोणी जवळ असावें असें वाटतें."

"मला वाटलें तर मी बोलावीन."

"ठीक तर."

नयना सातारकडे गेली. मणि नि तिची आई मुंबईला. गाडींत नयना विचारमग्न होती. पित्याचें शेवटचें दर्शन तरी होईल कीं नाहीं? किती प्रेमानें त्यांनीं वाढवलें. साऱ्या आठवणी येत होत्या. ती घरीं आली. त्या मोठ्या वाड्यांत शान्तता होती. हलकेच ती घरांत शिरली. सकाळची वेळ होती. घरांत दूरची एक आजीबाई होती.

"आजी, बाबांचें कसें?"

"आलीस तूं? तुझ्यासाठीं कंठी प्राण धरून आहेत."

नयना वडिलांच्या शयनागारांत गेली. तो वृद्ध पिता तेथें नयनाची नि मृत्यूची वाट पहात पडून होता. ती पित्याजवळ बसली. तिनें हळूच हांक मारली.

"बाबा, मी आलें आहे. मी सुटलें."

"मलाहि आतां सुटूं दे" डोळे उघडून म्हणाले.

"मी तुमच्यासाठीं काय करूं?"

"आतां कांही करायचें राहिलें नाहीं. वर्तमानपत्रांत तुझा पति गेल्याचें वाचलें. मला किती दुःख झालें असेल? नयना, जाणूनबुजून तूं दुःखाच्या डोहांत उडी घेतलीस. आणि मीहि तुला वेळेवर मदत दिली नाहीं. मीहि अपराधी. माझें मन मला खातें. तुम्ही मुलीला विधवा केलेंत तूं म्हणालीस. क्षमा कर पित्याला. त्याचें मरण इतक्या जवळ असेल याची मला काय बरें कल्पना? तूं मला नंतर कधीं पत्रहि लिहिलें नाहींस. तुरुंगांत गेल्यावर लिहिलेंस. असो. आज तूं पुन्हां प्रेमानें पित्याजवळ आलीस. दुरावलेलीं पितापुत्रींचीं हृदयें पुन्हां जवळ आलीं. मला सारें मिळालें बाळ. तूं सारें जीवन कसें कंठणार?"

"त्यांचें ध्येय वाढवून. मी एकटी नाहीं बाबा. ते माझ्याजवळ आहेत. मला समोर दिसतात. मी चित्र काढायला बसलें तर कोणी तरी माझीं बोटें

धरित आहे, कोणी बोटांत शिरत आहे असें वाटतें. मी एकटी नाहीं. आणि त्यानीं भारतचित्रकलाधाम संस्था माझ्या स्वाधीन केली आहे. तेंच आमचें चिमुकलें बाळ. तें मी वाढवीन. तुम्ही मुलीला आशीर्वाद द्या. बाबा, तुमचें किती प्रेम ! मी तुम्हांला सोडून गेलें. परंतु मी कृतघ्न नव्हतें. मुलींचें जीवन दुसऱ्यासाठीं असतें. मला जो आवडला, माझ्या जीवनांत जो भरलेला होता, त्याला मी तें अर्पण केलें. रंगाच्या आईजवळ मी एकदां म्हटलें होतें ' आई, मी तुमच्या रंगाजवळ लग्न लावीन.' त्या हंसल्या व म्हणाल्या ' रंगा गरीब, तूं श्रीमंत ' परंतु त्यांचें हंसूं गेलें नि डोळ्यांत आंसवें आलीं. मरतांना मला म्हणाल्या ' रंगाला सुखी कर.' त्यांच्या त्या शब्दांत का अधिक अर्थ होता ? रंगाची आई माझ्या खाटेवर होती. मीच शुश्रूषा केली. जणूं मी त्यांची लहानशी सून झालें होतें. बाबा, अशा रीतीनें रंगा माझ्या जीवनांत शतधाग्यांनीं गुंफिला गेला, विणला गेला, भरला गेला. तो अल्पायुषी ठरला. प्रभूची इच्छा. तुम्ही मजवर रागावूं नका. माझें चुकलें असलें तर क्षमा करा. एकदां ज्याला मन दिलें त्यालाच नको वरूं तर कोणाला ? असो. मी शान्त असेन. कर्तव्य करित राहीन. तुम्हां सर्वांना स्मरेन, अश्रूंची तिलांजलि देत जाईन." ती असें म्हणून उठली. पित्याच्या थंडगार चरणांना तिनें कढत अश्रूंनी भिजविलें. तो वृद्ध गहिंवरला. उठूं लागला.

"उठूं नका बाबा, पडून रहा."

"नयना" एवढेंच तो म्हणाला नि पुन्हां पडला. तिनें पित्याला मांडी दिली.

"नयना, तुझ्या ध्येयबाळासाठीं सारी इष्टेट मी करून ठेवली आहे. हें सारें मीच कमावलेलें. तुझ्या संस्थेला सारें दिलें आहे. वाटलें तर या वाड्यांतच संस्था आणा. येथें आपला सुंदर चित्रसंग्रह आहे. सातारा महाराष्ट्राचें हृदय. शौर्य नि वैराग्य यांचें आजुबाजूचें वातावरण. जवळ माहुली. संगम. तुला वाटलें तर इकडे संस्था आणा. नाहीं तर हा वाडा विकून टाका. योग्य तें करा. रंगाला मी वांचवूं शकलों नाहीं. परंतु त्याचें ध्येयबाळ मरूं नये म्हणून मी शक्य तें सारें केलें आहे. त्या ध्येयबाळाला वाढव. सुखी समाधानी रहा. तुझें जीवन ध्येय-पूजेनें कृतार्थ होवो. पित्याचें प्रेम, पित्याचे आशीर्वाद मागावे नाहीं लागत. ते सदैव मिळतच असतात बाळ. ये, जवळ ये."

तिनें डोकें खालीं केलें. त्यानें आपले वरदहस्त, ते वत्सल हात तिच्या डोक्यावर ठेवले.

"कृतार्थ हो" तो म्हणाला.

खोलींत आणखी मित्रमंडळी आली. आजीबाई मधून येई. परंतु अतःपर सारें शान्त होतें. वडील देवाकडे गेले. शान्तपणें त्यानी देह सोडला. आत्मा परमात्म्यांत मिळाला. नयनानें सुनंदाआईना, मणीला सविस्तर पत्रें लिहिलीं. ती त्या वाड्यांत एकटी फिरे. लहानपणच्या आठवणी. आईच्या, वडिलांच्या तैलचित्रांसमोर उभी राही नि रडे. तिला एकाकी वाटे. सारे बंध तुटले. असें कसें माझें जीवन? परंतु बंध आहेत. सुनंदा आहे, ताई आहे, मणि आहे, आणि तो पंढरी? तो असेल का जिवंत? का जपान्यांच्या ताब्यांत गेला, मारला गेला? एकदम स्वातंत्र्याचा सारा लढा डोळ्यांसमोर आला. माय माउली कस्तुरबांचें मरण, महात्माजींचा उपवास, आचार्य भन्साळीचें दिव्य, मुला-बाळांचीं बलिदानें! ती विचारमग्न होती. आणि सुभाषबाबू कोठें आहेत? खरेंच का ते तिकडे स्वतंत्र सेना उभारित आहेत? मायभूमीचा महान् पुत्र, यज्ञमय जीवन, मायभूमीचे स्वातंत्र्याशी लग्न लावीन, माझ्या लग्नाचा विचारच माझ्या मनांत येत नसतो असें म्हणणारा, विवेकानंदांची जणूं प्रतिकृति! नयना ध्यानस्थ बसली.

"नयना, नयना" कोणी तरी येऊन तिला मिठी मारली.

"कोण, मणि? तूं आलीस?"

"आईला म्हटले जाते. नयनाचे डोळे पुसायला. आतां आमच्याकडे चल. येथें नको राहूं."

"मला सुनंदा आईकडे जायला हवें मणि."

"आधीं माझ्याकडे."

नयना नि मणि घरभर हिंडलीं. नयना तिला सारें दाखवित होती. मधून दुःखी होत होती.

"मला सातारा दाखव नयना."

"सारें दाखवीन."

आणि मोटारींतून दोघं सर्वत्र हिंडलीं. माहुली क्षेम पाहून आलीं.

"तूं मेरुलिंग येशील बघायला?"

"हां"

"चालावें लागेल"

" मी चढेन, चालेन "

दोघीजणी गेल्या. किती सुंदर दृश्य! एकेठिकाणीं हात धरून तिला नयनानें वर ओढून घेतलें. तो सारा डोंगर पाझरत होता. सभोंवतीं फुलेंच फुलें. मणि गुलाबाचीं फुलें तोडित होती. नयनानें सोनचाफ्यांचीं काढलीं.

" आपण वर जायचें ? "

" तिकडे वाघाच्या गुहा आहेत. "

" आपण बसूं एकांत. येतेस नयना ? "

" नको. "

मणि तेथून सारें पुनःपुन्हां बघत होती. भव्य निसर्ग !

नयना नि मणि उंचावरून खालीं आलीं. परत तीं सातारला आलीं.

" आजी, आज मी जाते " नयना म्हणाली.

" मी येथें एकटी कशी राहूं ? "

" भय्या आहे. मी लौकरच येईन. सुनंदा, ताई, यांना घेऊन येईन. आतां भारतचित्रकलाधाम येथेंच सुरू करूं. "

" तुला योग्य तें तूं कर. मला आधार दे म्हणजे झालं. "

" मी तुला दूर कशी लोटीन ? बाबांचे तूंच तर सारे केलेंस. "

मणि आणि नयना निघालीं. मुंबईस मणीकडे एक दिवस राहून नयना दुधगांवला आली. सुनंदा आईनें तिला पोटाशी घेतलें.

" आई, जगांत मला कोणी नाही. जन्म देणारी आई लहानपणींच गेली. जीवनाचा अर्थ देणारा रंगा लगेच गेला. ज्याने वाढवले ते बाबा गेले. "

" मी आहें तुला, ताई आहे, सर्वांच्या प्रेमळ स्मृति आहेत. रंगाचीं चित्रें आहेत. ध्येयें आहेत. सभोंवतालचा समाज आहे. नयना, आपण कधींच एकटीं नसतों. मनांत डोकावून बघ. तेथें रंगा आहे. खरें ना ? मनुष्याचा हाच मोठेपणा आहे कीं तो एकटा असून अनेकांचा होतो, अनन्ताचा होतो, विश्वाचा होतो. "

" आई तुम्ही कोठल्या शाळेंत असें बोलायला शिकल्यात ? "

" रंगाच्या वासुकाकांच्या. त्यांची थोर शिकवण. नयना, मला तरी कोण आहे ? परंतु मी तुम्हां सर्वांची आहें. आजुबाजूच्या शेजाऱ्यांची आहें. तूं कलावान् तूं नुसते चित्रांतच रंग भरणारी नाहींस. अनेकांच्या जीवनांतहि रंग भरायचे

असतात. तें चित्र कशासाठीं ? दुसऱ्यांना आनंद देण्यासाठीं, त्यांच्या हृदयाला पोंचण्यासाठीं. खरेंना ? तुझीं चित्रें विश्वाच्या जीवनांत रंग ओततील. रंगा म्हणे, 'माझें चित्र एखादा अमेरिकन घेईल. तेथील बंधुभगिनी माझें चित्र पाहतील. त्यांचा आत्मा भारताशीं बोलेल. माझें चित्र जगाला एकत्र आणील. पौर्वात्य पाश्चिमात्य हृदयें जोडील. केवळ पूर्व, केवळ पश्चिम असेंनाहीं. मानवी हृदय, मानवी आत्मा एकच आहे.'

" आई, बोला. "

" त्यांच्या सारखें का मला सांगतां येणार आहे ? ते गच्चींत बसत. रंगाला भारतीय प्रसंग सांगत. याच्यावर चित्र काढ म्हणत, विवरण करीत. ती अमृतवाणी होती. मी त्या वाणीची वेडीवांकडी प्रेत. "

" वेडीवांकडी मुरली, परंतु विश्वाला रमविते. "

नयना दुःख विसरली. पुढील योजना करूं लागली. परंतु ताई म्हणाली " रंगाला हें गांव आवडे. येथें नदीतीरीं अपूर्व शोभा. पलीकडे तो नेहमीं हिरवागार असणारा डोंगर. तो धबधबा ! तें रामरायाचें मंदीर. रंगाचीं तेथील अद्वितीय चित्रें ! आपण येथील नदीतटाकीं भारतकलाधाम बांधूं. तें मंदीर आपल्या संस्थेच्या आवारांत आणतां आले तर पाहूं. आपणच मंदिराचीं पुजारी होऊं. हल्लीं तेथें व्यवस्थाहि नीट नसते. संस्था व्यवस्था ठेवील. नयनाताई, तो सातारचा वाडा विका. वाईट नका वाटून घेऊं. शेवटीं ध्येयासाठीं जगायचें ना ? तुमच्या वडिलांचा तो कलावस्तूंचा संग्रह येथें आणूं. आपण नवीन भव्य संस्था उभारूं. "

" ताई, वाडा विकून कितीसे पैसे येतील ? "

" आपण कांहीं दिवस थांबूं. युद्ध संपूं दे. पंढरी येऊं दे. "

" पंढरी कोठें आहे ? "

" माझ्या स्वप्नांत. मी येतों म्हणाला. "

" आई, तुमचें काय मत ? "

" मला ताईचें म्हणणें भावना नि विचार दोन्ही दृष्टीनें योग्य वाटतें. मला आशा आहे. युद्ध संपल्यावर जागतिक प्रदर्शन भरेल. रंगाचीं चित्रें तेथें पाठवूं. मला वेडी आशा वाटते कीं तीं चित्रें भारताचें नांव करतील. "

" कदाचित् भारतमाता तुमच्या तोंडानें बोलत असेल " नयना म्हणाली. दुधगांवलाच रंगाचें स्मारक, ती भारतचित्रकलाधाम संस्था सुरू करायचें ठरलें. नयना रंगाच्या भारतदर्शनांतील उरलेलीं चित्रें काढित बसे.

तिकडे आजीबाई होती. नयना एकदां गेली व तिला घेऊन आली. वाड्याची देखरेख भग्या करी. एका खोलींत तो राही. बागेला पाणी घाली. वाडा विकण्याचा विचार वडिलांच्या मित्रांच्या कानांवर घालून नयना आली होती.

हिंदी स्वातंत्र्याचा लढा मंदावला होता. परंतु तिकडे आझाद सेनेचा रोमांचकारी लढा सुरू झाला. नेताजी सुभाषबाबू यांनीं शून्यांतून विश्व निर्माण केलें. कैद केलेल्या हिंदी शिपायांना मुक्त करून त्यांची मुक्तिसेना त्यानीं उभी केली. स्वतंत्र सरकारची घोषणा केली. स्वतंत्र नाणें पाडलें. अंदमान निकोबार बेटांना शहीद बेटें नांवें दिलीं. हिंदु मुसल्मान शीख सारे एकत्र आणले. त्यांना चलगानें दिलीं. जयहिंद मंत्र दिला. चलो दिल्ली ध्येय दिलें. हिंदु मुसलमान व्यापाऱ्यांनीं लाखों काय, कोटि कोटि खजिने दिले. फुलांचे हार, नेताजींच्या स्पर्शानें दिव्य झालेले, लाखों रुपयांना जात. लहान मुली बंदुका घेऊन चालूं लागल्या. मरणाचा डर गेला. रंगूनला नेताजी आले. रंगून मुक्त झालें. शेवटच्या मोंगल बादशहाच्या कबरेचें नेताजीनीं दर्शन घेतलें. हिंदुमुस्लीम ऐक्याची ते मूर्ति बनले. ते जेव्हां बोलत तेव्हां नवीन पैगंबरच बोलत आहे असें मुस्लीम तरुणांस वाटे. ती दिव्य दैवी प्रभा होती. भारताच्या मुक्तिध्यासाचें तें तेजोवलय होतें. नेताजी म्हणजे विवेकानंद, चित्तरंजन, खुदीराम–सर्वांची जणुं मूर्ति! परंतु महायुद्धाचे रंग पालटले. जर्मनी हरला. हिट्लर मेला. जपानचें काय होणार? एक दिवस अणु बॉंब पडला. अडीच लाख लोकांचें शहर क्षणांत मातींत गेलें, जळून गेलें. काय करणार जपान? तेंहि शरण आलें? आतां नेताजींचें काय होणार? तें पहा आझाद लष्कर! खायला नाहीं, प्यायला नाहीं. बैलगाड्यांतून रणगाड्यांबरोबर झुंजत आहेत. गवत खाऊन लढत आहेत. बारा बारा दिवसांत अन्न नाहीं. तरी लढत आहेत. नेताजी सांगत आहेत "दिल्लीच्या रस्त्यानें चला. भारतमातेकडे जाणाऱ्या रस्त्याचें चुंबन घेत मरूं. ते डोंगर, त्या नद्या हांका मारित आहेत. चला. त्यांच्या पलीकडे प्रिय भारतमाता. चला." ती दिव्य वाणी पेटवीत होती, मढ्यांना स्फूर्ति देत होती. परंतु संपली आशा. शेवटचा क्षण आला.

"तुम्ही महात्माजींकडे जा. ते वांचवतील. ते राष्ट्रतात. मी जातों. पुढील कामासाठीं जातों."

त्यांच्या डोळ्यांत पाणी आलें. महापुरुष विमानांत चढला. परंतु तें विमान वर नेणारें ठरलें. देवाकडे नेण्यासाठीं जणुं तें विमान आलें, नेताजी गेले. आझादसेना कैद झाली. ब्रिटिश लष्करानें तिचे धिंडवडे मांडले. अनेकांना गोळ्या घातल्या. कांहीं वार्ता कळेना. निरनिराळ्या कँपांत त्यांना ठेवलें. गोळ्या घालीत, कत्तल करीत. परंतु कॉंग्रेसचे पुढारी सुटले. आझादसेनेच्या कथा प्रसिद्ध होऊं लागल्या. सारे राष्ट्र उचंबळलें. राष्ट्रसभा सर्वांच्या बचावाला उभी राहिली. पंडित जवाहरलालांनीं बॅरिस्टराचा झगा घातला. भुलाभाई ऐतिहासिक खटला चालवायला उभे राहिले. भारताच्या स्वातंत्र्ययुद्धांतील तें सुंदर कांड होतें. गुलाम राष्ट्रानें सशस्त्र युद्ध पुकारणें न्याय्य आहे. नेताजींनीं स्वतंत्र सरकार स्थापलें. युद्धांतील कैद्यांचा नियमच येथें लावला पाहिजे. कोणीहि मारला जातां कामा नये. भुलाभाईंची धीरोदात्त वाणी! जगांतील महान् ऐतिहासिक खटला. लालकिल्ल्यांतील. साऱ्या भारताचे डोळे तिकडे लागले. कॅप्टन लक्ष्मीचें नांव घरो-घर गेलें. ३६ तास बॉंबवर्षावांत उभी राहून जखमी शिपायांची सेवा करणारी दिव्य वीरांगना, सेवांगना! आझादडायरी प्रसिद्ध झाली. एकेक ऐकावें तों हृदय उचंबळे. परंतु नेताजी कोठें? त्यांची शेवटची भावाला भेट-तें घड्याळ, तें घेऊन अखेरचे सांगाती आले. पंडितजी म्हणाले 'त्यांची आशा आतां नाहीं. ते गेले.' पंडितजींनीं शरद्‌बाबूंना—नेताजींच्या बंधूना तें घड्याळ दिलें. ते रडले. त्यांनीं जयहिन्द मंत्र उचलला. व्याख्यानाच्या अंतीं जयहिन्द ते म्हणूं लागले. त्यांचा नातू बापूजींना "जयहिंन्द बापू" करूं लागला. जयहिन्द मंत्र घरोघर गेला. पत्रांत वरतीं जयहिन्द लिहूं लागले. सातारकडे मुलांना जयहिन्द नांवें ठेवूं लागले. नेताजी राष्ट्राच्या जीवनाला व्यापून उरले.

ताई वर्तमानपत्रे किती कसोशीनें वाची. पंढरीचें नांव दिसतें का कोठें पाही. तो ब्रह्मदेशांतच होता. तो का मारला गेला? तो आझाद सेनेंत नव्हता का? कोठें आहे पंढरी? ब्रिटिशांनीं कैद केल्यावरहि अनेकांना ठार केलें. त्यांत का तो होता? कोठें आहे तो?

भारताचें स्वातंत्र्य? कोठें आहे? वाटाघाटी सुरू झाल्या. महात्माजी, जिना, पंडितजी, सरदार, बोलणीं चाललीं होतीं. क्षणभर आशा चमके, पुन्हां अंधार. अजून शेंकडों कार्यकर्ते भूमिगत होते. जयप्रकाश लालकिल्ल्यांतच होते. सातारचे वीर अज्ञातवासांत. अरुणा, अच्युत अज्ञातवासांत. उत्तम लीला अज्ञात-

वासांत. स्वातंत्र्य, कोठें आहे स्वातंत्र्य ? विद्यार्थ्यांवर लाठीमार होत आहेत. मुंबईत खलाशांचें बंड होत आहे. मुंबईचें काय होणार ? सरदारांनीं मध्यस्थी केली. शान्त झालें बंड. परंतु स्वातंत्र्य कोठें आहे ? हिंदी चलेजाव लढा, नेताजींचा संग्राम, खलाशांचीं बंडें, या खुगा आहेत. ब्रिटिशांना जावें लागणार. परंतु कधीं उचलणार चंबुगवाळें ? दीडशें वर्षांचा बाडबिस्तरा गोळा करायला वेळ लागणारच. आणि जातां जातां विष नको पेरून जायला ? अडचणी निर्माण करून जायला ?

ताईचें लक्ष त्यांत नव्हतें. ती पंढरीला पहात होती. मनांत, स्वप्नांत. कोठें गेला तो ? मध्यरात्र होती. ताई एकटी गच्चींत होती. आकाशांतील तार्‍यांकडे बघत होती. विचारमग्न होती. मध्येंच बसे. मध्येंच फिरे. रात्र संपली. पहांटेचा गार वारा आला. बागेंतील फुलांचा मधुर सुगंध येत होता. दंवबिंदु टपटप पडत होते. तिकडे आगगाडी आली.

" पंढरी का आला " ताई बोलली.

गच्चीच्या टोंकाजवळ येऊन कोणाची तरी मार्गप्रतीक्षा करीत. ती उभी होती. अंधारांतून कोणी येतें का बघत , तो पहा एक टांगा येत आहे. इकडे का येत आहे ? खरेंच, इकडेच येत आहे. ताई गहिंवरली. ती हळूच परंतु लगबगीनें खालीं आली. तिनें हलकेच दार उघडलें. ती अंगणाच्या फाटकांत उभी राहिली. टांगा थांबला. एक मूर्ति उतरली.

" पंढरी " तिनें हांक मारली.

" ताई " तो म्हणाला.

टांगा गेला. तीं दोघें आंत गेलीं.

" उठवूं नको कोणाला " तो हळूच म्हणाला.

" वर जाऊं गच्चींत " ती म्हणाली.

तीं दोघें गच्चींत गेलीं. बसलीं.

" रंगा बरा आहे ? "

" तो देवाकडे गेला. "

कोण बोलणार ? त्याचे डोळे भरून आले.

" मी कशाला वांचलों ! "

" माझ्यासाठीं. या अभागिनीसाठीं. पंढरी, नीज. माझ्या मांडीवर डोकें ठेवून नीज. तूं एकटा नाहींस. तुझ्या पाठोपाठ मी रणांगणावर होतें. तूं स्वप्नांत येऊन म्हणस मी येतों. रडूं नको. हे डोळे आशेनें होते. तूं अझाद सेनेंत होतास. होय ना ? "

" हो. "

" धन्य तूं. नेताजींचा तूं मानसपुत्र. आगींतून आलास. या अभागिनीला सुखी कर. तूं मागें निरोप घेऊन गेलास. आणि माझें हृदय घेऊन गेलास. तूं आगगाडींत फोटो दिलेस. हा बघ तुझा फोटो. या हृदयाजवळ तो असतो. मी ज्याला शोधित होतें तो मला मिळाला. तूं माझा आहेस. भ्रम नाहीं, वेड नाहीं. रंगा तुझ्या माझ्या भारताच्या जीवनांत भरलेला आहे. नीज, राया नीज. शूर वीरा, प्रियकरा नीज. याच गच्चींत रंगाचें नि नयनाचें मी लग्न लावलें. मरणोन्मुख रंगा. नयना म्हणाली तुझी म्हणून जगांत जगू दे. तुझ्या आत्म्याशीं लग्न लागो. थोर नयना ! असें प्रेम कोठें दिसणार ? त्याच या गच्चींत मी या पहाटे तुझ्याशीं लग्न लावित आहें. माझें जीवन तुझ्यांत ओतींत आहें. हा बघ सुगंधी वारा ! हें बघ दंवबिंदूंचें गुलाबपाणी ! तें बघ जरा तांबडें फुटत आहे ! जणूं सत्याची ज्वाला दिसत आहे ! प्रभातकाळचा पवित्र मुहूर्त. माझ्या जीवनांतील अंधार सरो, प्रभात येवो. माझ्या वाळवंटांत पंढरी येवो. तेथें आनंदाची चंद्रभागा उचंबळो; नीज, माझा होऊन माझ्या मांडीवर नीज. मी तुला गाणें म्हणूं ? भारताच्या मुक्तीचें गाणें ? "



"आई, भारतमातेचें हें चित्र जवळ होतें म्हणून मी वांचलों. जपानी मारणार होते मला. त्यांनीं माझी झडती घेतली. झडतींत हें चित्र सांपडलें. 'देशावर प्रेम करतोस' त्यांनीं मला प्रश्न केला. मी हो म्हटलें. तें चित्र माझ्याजवळ असूं दे. मग गोळी घाला मी म्हटलें. त्यांनीं मला गोळी नाहीं घातली. कैदी केलें. पुढें आझादसेनेंत गेलों. नेताजींची वाणी ऐकली. ते अमर अनुभव! आई, आम्ही गवत खाल्लें, उपाशीं लढलों. असें युद्ध जगांत झालें नसेल."

"परंतु उपयोग काय? स्वातंत्र्य कोठें आहे?"

"येत आहे."

"पुन्हां का युद्ध करावें लागणार?"

"कॉंग्रेसचा तसा मानस नाहीं. वाटाघाटींतून त्यांना हवें आहे. म्हणजे फाळणी येणार."

"परंतु त्यानें तरी प्रश्न सुटतील का?"

"आई, नौखाली, कलकत्ता येथें काय झालें? बिहारमध्यें काय झालें? महात्माजी धीर देत आहेत. अनवाणी हिंडत आहेत. अश्रु पुशीत आहेत. परंतु हिंदु मुसलमानांच्या या दंगली कधीं थांबणार? जेथें ते बहुसंख्य तेथें द्यावें त्यांना स्वातंत्र्य. परंतु शान्ति येवो."

"येईल का?"

"आशेनें मनुष्य काम करतो. प्रभूचे हेतु अतर्क्य आहेत. आई कोणाला नांवें ठेवायचीं? आपल्या संकुचित धर्मामुळें पाकिस्तान निर्माण होत आहे. आपण आपल्याच कोट्यवधि बांधवांना कमी लेखलें. ते परधर्मांत गेले. काश्मीर-मधील सारे मुसलमान ७५।८० वर्षांपूर्वी स्वधर्मांत येऊं इच्छित होते. आम्ही अब्रम्हण्यं म्हटलें. अस्पृश्य मुसलमान वा ख्रिस्ती होऊन आला तर विहिरीवर

पाणी भरतो, ओटीवर बसतो. हरिजन दूर ! कोठे फेडायचीं ही पापें? तरी डोळे उघडत नाहींत. अजून गोव्यांत हरिजनांना मंदिरें मोकळीं नाहींत, हॉटेलें मोकळीं नाहींत. आपलें फार पाप झालें. धर्म, तत्त्वज्ञान अद्वैताचे कृति भाऊबंदकीची, संकुचितपणाची, माणुसघाणेपणाची. अतःपर तरी डोळे उघडोत."

अशीं बोलणीं चालत. कधीं रंगाच्या आठवणी येत. सारी रंगत. कधीं पंढरी युद्धस्थ ,रम्या यांना मागे. रडवी, उचंबळवी. देशाचें काय होतें इकडे सर्वांचे डोळे होते. शेवटीं १५ ऑगस्ट १९४७ रोजी ब्रिटिश जाणार, सत्ता सोडणार असें घोषित झाले. देशाची फाळणी होणार. परंतु ४० कोटि मुक्त तर होतील ना ? जनता आनंदली. त्या आनंदात विषण्णता होती. ती आपल्या परंपरित पापाची होती.

१५ ऑगस्टची अमर तारीख आली. भारत मुक्त झाला. महात्माजी कोठें आहेत ? ते दुःखी आहेत. भारताचे तुकडे झाले तर मी माझ्या प्राणांनी सांधीन अशी त्यांची प्रतिज्ञा. दोन देह झाले. तरी त्यांत आत्मा एक असावा म्हणून ते उभे राहिले. परंतु लाखो लोक घरेंदारें सोडून निघाले. हिंदमधून पाकिस्तानांत, पाकिस्तानांतून इकडे ! कत्तली, गोळीबार ! लाखलाख पायीं येत आहेत ! मरत आहेत, लढत आहेत ! जगात असें झाले नाहीं. पाऊणपाऊण कोटी लोक जा ये करित आहेत. काय हाल, काय विपत्ति ! सारें सोडून निराधार यावयाचें. आकाशाचे छत, पृथ्वीची शय्या ! पाला खायला, पाणी मिळालें तर ! थंडीचा कडाका. ना पांघरूण, ना निवारा !

महात्माजी धीर देत होते. कलकत्त्यांत पुन्हां दंगल. महापुरुष शान्तीचा अमृतकुंभ घेऊन आला. त्याच्यावरहि दगडफेक ! भारताच्या, विश्वाच्या हृदयावर ती दगडफेक होती. ते उपवास करित होते. एका मुसलमानाच्या घरांत ! ते विश्वात्म होते ! कलकत्ता शान्त झालें. बापू दिल्लीला शान्त करायला आले. म्हणाले येथें शान्त करा. मी पाकिस्तानांत जातों. त्यांनीं उपवास आरंभला. त्यांच्यावर बॉब फेकण्यांत आला ! वांचले. म्हणाले " तो समोर फेंकीत असतां तोंडावर हास्य राहिलें असतें का ? " परंतु प्रभु त्यांना बोलावित होता. ते सारखें म्हणत माझें कोण ऐकतो ? मी एकटा आहें. नका रे मारामारी करूं ? हें का स्वराज्य ? पाकिस्तान कसेंहि वागो. तुम्ही थोर भूमिकेवरून वागा. परंतु काळ आला. शुक्रवार ! मुसलमानांचा प्रार्थनेचा दिवस. महात्माजी प्रार्थनेला चालले. जरा उशीर झाला. म्हणाले उशीर करणाराला शिक्षा होते. आणि जलदीनें आले.

त्या प्रसन्न मुखानें, प्रभुमय वृत्तीनें ! आणि तो पहा काळपुरुष ! चार गोळ्या आल्या. गोळ्या झाडणाऱ्याला बापूंनी प्रणाम केला. तो परमेश्वराचा दूत त्यांनीं मानला. हरे राम म्हटलें ! महान् प्रभुमय जीवन !

जगभर अंधार अंधार ! जगाचे हृदय तुटलें, भारताचें नशीब फुटलें ! अरेरे, राष्ट्रपित्याचा वध ! प्रभु त्यांना क्षमा करो. पाप म्हणजे अज्ञान ! दुःखानें वेडें झालेलें मूल आईलाच बोंचकारतें ! देशांतील अनंत आपत्तीनीं वेडा झालेला राष्ट्रपित्यावरच संतापला परंतु तें वेड होणें होतें का. ? का ती योजना होती ? अनेकांच्या हत्यांची ? प्रभु जागे. अन्तर्यामी तो.

जगांत तिसऱ्या महायुद्धाच्या छाया पसरत आहेत. अशा वेळेस जगाला या शान्तिसिन्धूची पदोपदीं आठवण येईल. तीन दिवस राष्ट्रसंघाचें निशाण खालीं ! जगभर एक विषय, एक विचार, एकच लिखाण ! बापू विश्वपुरुष होते. ते विश्वाचें हृदय होते. गेले. भव्य दिव्य जीवन ! जीवनाला शोभेसें मरण ! यज्ञमय सारें, तेजोमय !

पंडितजी म्हणाले "अंधार वाटतो. परंतु नाहीं. त्यांनीं दिलेला प्रकाश चंद्रसूर्य आहेत तोंवर पुरेल." होय पुरेल. जातीयता दूर करा पंडितजी गर्जले. मंत्रिपद सोडून जातीयतेशीं दोन हात करायला येऊं का मैदानांत गर्जले. देशाचें दैन्य संपो. उरलेल्या हिंदीसंघराज्यांतील सारे एकत्र नांदोत.

"पंढरी, भारताची मान खालीं झाली रे." आई म्हणाली.

"महान् यज्ञांतून महान् वैभव येईल. आई, अशी समजूत आहे कीं मोठा पूल बांधतांना माणसाचा बळी देत. म्हणजे तो पूल पडत नसे. आपण स्वातंत्र्याची इमारत बांधीत आहोंत. हिंदुस्थान, पाकिस्तान दोघांत ऐक्याचा पूल रहावा, तो मोडूं नये म्हणून का महात्माजींचें बलिदान झालें ? त्यांच्या त्रिभुवनमोल रक्तावर स्वातंत्र्य उभारलें जाईल, ऐक्य उभारलें जाईल, पूल बांधला जाईल. अभंग पूल. आई, रडूं नकोस."

"काश्मीरमध्यें युद्ध आहे. आणि हा निजाम ऐकत नाहीं. ते रझाकार का पशु आहेत ?"

"आई, मनुष्य पापानें आधीं जळतो. कंस पापानें आधीं मेला. मग भगवान् निमित्त. रझाकार पापानें मरतील. निमित्तमात्र व्हावें लागेल. स्वातंत्र्यासाठीं कोठें तरी कोणाला किंमत द्यावीच लागणार. जगांत फुकट कांहीं नाहीं."

अशा चर्चा चालत. परंतु नयना कोठें आहे. ? ती मणीकडे गेली आहे. रंगाचीं उरलेलीं चित्रें पुरीं करित आहे. भारताच्या ध्येयांत रंगली आहे. इकडे गळे एकमेकांचे कापले जात आहेत, परंतु ती ऐक्यप्रसंग रंगवित आहे. श्रद्धा नष्ट नाहीं होतां कामा. मानवी मांगल्यावरची श्रद्धा लोपली तर काय उरलें ?

"नयना, अमेरिकेत भरणार ग प्रदर्शन. बातमी आली आहे, रंगाचीं तुझीं चित्रें पाठवायचीं ना ?"

"माझीं ?"

"हो"

"माझीं कोठे आहेत ?"

"हें तूं नाहीं का काढलेलें ? हें काढित आहेस."

"नाहीं मणि. हीं बोटें माझीं नाहींत. तीं रंगाचीं आहेत. तो माझ्या देहांत, मनांत घुसतो नि चित्रें काढतो. मी निमित्तमात्र, माध्यम आहें."

"कोणाचीं असोत. आपण पाठवूं. पापा सारें करतील."

कांहीं दिवसांनीं तीं भारतीय ध्येयाची चित्रें गाजावाजा न करतां पाठवण्यांत आलीं. पाठवण्याआधी तीं नयनानें हृदयाशीं धरलीं. जणूं दहाहजार वर्षांची भारतपरंपरा हृदयाशीं धरित होती. त्यावर अश्रूंचा अभिषेक करित होती.

"मणि, आज मी दूधगांवला जातें. आजीला बरें वाटत नाहीं."

"नयना, रंगाचें नांव जगभर जाईल."

"तुझ्या तोंडांत साखर पडो."

"आईचे एक मित्र तुमच्या संस्थेला देणगी देणार आहेत."

"मणि, किती ग तूं चांगली. तुम्ही फार उदार."

"आमचें औदार्य आमच्या जातीपुरतें. तें सर्व भारतासाठीं व्हायला हवें. अतःपर जें कांहीं करायचें तें या वा त्या जातीसाठीं नसो. सर्वांसाठीं असो. मी पारशी नाहीं. मी हिंदी आहें."

"रंगा म्हणायचा 'मी मानव आहें' असें म्हणावे. सारे लोक जर मानवतेला स्मरून वागतील तर पृथ्वीवर स्वर्ग फुलेल."

नयना दुधगांवला आली. आजीबाई तशी आजारी नव्हती. परंतु एकदम थकली. ९१ वें वर्ष. आजहि पहांटे उठून तुळशीला नमस्कार करून ती आली.

"नयना, गीता म्हण" ती म्हणाली. गीता ऐकतां ऐकतां प्राण परमात्म्यांत विलीन झाले. आजीची जपमाळ नयनानें आपल्या गळ्यांत घातली.

"नयना, तूं आतां योगिनी दिसतेस."

"दिसून काय करूं ? मला होऊं दे."

"मी संसार मांडला आहे."

"मागें मी मांडला होता.ताई,सुखी हो. पंढरीसारखें रत्न तुला मिळालें आहे."

"नयना, आम्ही जाणार आहोंत. पंढरीला नोकरी मिळत आहे."

"मी तुम्हांला कसें बांधूं ? रंगाचें आध्यात्मिक बंधन तुम्हां आम्हा सर्वांस एकत्रमनाने ठेवीलच. ताई, मुंबईस त्या राममंदीर बांधणाऱ्या शेटजींच्या मुलांस मी भेटलें. ते राममंदीर भारतचित्रकलाधामास द्यावयास तयार आहेत. मी मग रामाची पूजा करीन. तेथें विद्यार्थी, विद्यार्थिनी येतील. रंगाची चित्रशाळा तेथे आहे. नवीन सुंदर इमारत बांधूं. मोठें स्वप्न आहे. मणीच्या आईचे एक मित्र मोठी देणगी देणार आहेत. जागतिक प्रदर्शनांत रंगाला बक्षीस मिळालें तर ! आपण पंडितजींना भारतचित्रकलाधामाच्या उद्‌घाटनास बोलवूं. मी 'महात्माजी त्रस्त जगाला संदेश देत आहेत' म्हणून चित्र काढलें आहे. तें हिंदी पार्लमेंटास मी देईन. हंसूं नको ताई. मी अशा स्वप्नांत रमत असतें. तुम्ही जा. सुखी व्हा. पत्र पाठवा. हें घर म्हणजे तुझें माहेर. मी तुझी बहीण. सुनंदा आई आपल्या सर्वांच्या आई."

पंढरी व ताई निघून गेलीं.

सुनंदा व नयना गच्चींत बसलीं होतीं. दोन ध्येयार्थी जीव.

"बाळ, ये नीज." सुनंदा आईनें नयनाला वात्सल्यानें जवळ घेतलें व मांडीवर निजविलें.

एके दिवशीं वार्ता आली. हिंदी चित्रकाराला एक लाखाचें पहिलें बक्षीस ! रंगा, रंगा सर्वत्र झालें ! कोण हा रंगा ? विश्वभारतीनें जाहीर केलें आमचा विद्यार्थी, मुंबईचें कलाभवन म्हणालें आमचा. जो तो त्याच्यावर हक्क सांगूं लागला. महाराष्ट्राची मान उंच झाली. परंतु नयना भारताला बघत होती. भारताच्या पोटांत तुम्ही आम्ही सारीं. आधीं आपण हिन्दी, भारतीय, मग प्रान्तीय, आपापल्या गांवचे वगैरे. तिनें रंगाचें सारें चारित्र लिहून काढलें. तें वर्तमानपत्रांना धाडलें. त्याची धडपड, त्याचा त्याग, दारिद्र्य, ध्येयवादित्व, तिनें रेखाटलें.

"स्वतंत्र पार्लमेंट रंगवीन."

हे त्याचे शब्द वाचून पंडितजी उचंबळले. त्यांची नयनाला अभिनंदनपर तार आली. त्यांनीं तिला प्रेमानें भेटायला बोलावले.

" आई, भारताच्या त्या पुण्यपुरुषाला, महात्माजींच्या वारसदाराला, उदात्त भूमिकेवरून जाणाऱ्या महान् नेत्याला नमस्कार करून येतें. "

" ये बेटा. "

नयना हिंदुस्थानच्या राजधानींत आली. पंडितजींस भेटली. तिनें प्रणाम केला. त्यांनीं मस्तकावर मंगल हात ठेवला.

"आतां स्वतंत्र हिंदुस्थानांत दारिद्र्य कोणाच्या विकासाच्या आड येणार नाहीं. किती शास्त्रीय बुद्धि, कलात्मक बुद्धि गेल्या शेंदोनशे वर्षांत मातींत गेली असेल. नयना, तूं थोर पुरुषाची, महान् कलावंताची पत्नी. तुला प्रणाम. "

" ही माझी भेट. ही पार्लमेंटांत लावा. "

" अद्भुत चित्र " थोड्या वेळानें तो गंभीर पुरुष म्हणाला.

" भारतकलाधाम उघडायला तुम्हीं याल ?"

" बेटी. कामाचे डोंगर आहेत. हैदराबादचा प्रश्न कठीण होत आहे."

" होय. आम्ही तुमचीं मुलें."

" मी कळवीन."

प्रणाम करून नयना गेली. ती राजघाटावर गेली. पवित्र यमुनेच्या तीरावरील महापुरुषाची ती दहनभूमि तिनें पाहिली. तिचे अश्रु थांबतना.

" बापू, दधीचीचीं हाडें देवांचा सांभाळ करती झालीं. तुमची रक्षा सर्व नद्यांत, कैलासांत मानससरोवरांत, समुद्रांत सर्वत्र सोडली गेली. तात, ती रक्षा, तें मांगल्याचे कण भारताला सांभाळोत. आम्हांला प्रेमानें रहायला शिकवोत ! तिनें मस्तक ठेवलें. उठली. त्या बिर्लाभवनांत गेली. जेथें महापुरुषाचें रक्त सांडलें तेथें डोळे मिटून उभी राहिली. आणि बापूंचा चष्मा, त्या खडावा, ती माळ, जेवण्याचा कटोरा, सारें पाहिलें. सजल नयनांनीं ती परतली.

' आई कृतार्थ होऊन आलें."

" तूं पुण्यवती सती आहेस."

कांहीं दिवस गेले. अमेरिकेंतील कोट्याधीशानें तो चित्रसंग्रह दहा लाखांना मागितला. परंतु नयनानें कळविलें " तो भारताचा वारसा आहे." तिची ती तार वाचून पंडितजी उत्तरले " महामना स्त्री."

" तुमच्या संस्थेला हिंद सरकारची पांच लाखांची देणगी. पुढें वार्षिक देणगी मिळत राहीलच."

पंडितजींची तार आली. नयनानें देवासमोर मस्तक नमविलें.

दुधगांवला राममंदिराजवळ भव्य इमारत होत आहे. मोठें आवार घेतलें आहे. तें राममंदीर मध्यवर्ती होणार. समोर नदी. तो तिकडे डोंगर. तो धबधबा. निसर्गरम्य स्थान!

हैदराबादचाहि प्रश्न संपला. हिंदसरकारनें फौजा पाठवल्या. मुक्तिफौजा. दुरावलेली जनता हिंदी जनतेस मिळाली. ग्रहण सुटलें. भारताचें तोंड फुलूं लागलें. पंडितजी म्हणाले " ठेचाळायचे दिवस संपले. महात्माजींची शिकवण तारील."

नयना आनंदली होती. भव्य इमारत पुरी झाली. अमेरिकेंतून चित्रसंग्रह परत आला. लाखरुपयाचा चेक आला. मणीच्या आईच्या मित्रानें एक लाखांची देणगी दिली. हिंदसरकारचे पांच लाख. प्रान्तिक सरकारनें एक लाख दिले. महाराष्ट्रांतील जनतेनेंहि दोन लाख लहान मोठ्या रकमांनीं गोळा केले. दहा लाखांची विश्वस्त योजना झाली. नयनाच तेथें प्रमुख. इमारतींत चित्रें लावण्यांत आलीं. इमारत सजली. वर तिरंगी झेंडा फडकत होता.

रामनवमीच्या दिवशीं इमारतीचें उद्‌घाटन व्हायचें आहे. पंडितजी येणार आहेत. अपूर्व सोहळा होईल. लाखों लोक जमतील. मणि आली आहे. पंढरी, ताई आलीं आहेत.

" नयना, आणखी काय हवें ? "

" ही परंपरा वाढो. या संस्थेंतून नवनिर्मिति होवो. कला सर्वांची होवो. कलाविकासांत सारी जनता भाग घेवो. येथें गरीब श्रीमंत येतील. मी त्यांची सेवा करणारी. येथें सारीं भारताचीं लेंकरें. सारीं एकत्र राहतील, रंग भरतील. भारताचें जीवन कसें रंगवायचें, भरायचें तें जनतेला चित्रद्वारा दाखवतील. आम्ही चित्रें काढूं, स्लाइड्स करूं, गांवोगांव जाऊं. कलेचा प्रचार करूं. कला हृदयें जोडील. नवभारत निर्मायला हातभार लावील."

" नयना, आज रंगा असता तर ? "

" अरे तो का दूर आहे ? येथील अणूरेणूंत तो आहे. नयना कधींच मेली. नयनाच्या रूपानें तोच आहे. हीं त्याचीं बोटें, हे त्याचे डोळे " असें म्हणून तिनें डोळे मिटले. पंढरी, ताई गंभीरपणें तेथून उठून गेलीं

सायंकाळीं आज नयनानें रामरायाची पूजा केली, आरती केली. सुनंदा, ताई, पंढरी, मणि इतर मंडळी आहेत. नयनाचें तोंड दिव्य तेजानें फुललें होतें.

ती भावोन्मत्त झाली. प्रभुमय, ध्येयमय भारतमय झाली. ती नदी-तटाकीं जाऊन बसली. कोणी तरी आलें. पाठीमागून डोळे धरले.

" रंगा सोड डोळे. तूं का निराळा आहेस ? " ती म्हणाली. डोळे सुटले. कोण होतें तेथें ?

" लता ? "

" होय नयना. "

" केव्हां आलीस ? "

" आरतीच्या वेळेसच आले. नयना, मी तुझ्या संस्थेतील तुझी पहिली विद्यार्थिनी ".

" मी दुसरी " मणि येऊन म्हणाली.

" आयेषा येणार आहे हॅरिस साहेबांची " लता म्हणाली.

" या, या, साऱ्याजणी या. भारताची सारीं मुलें मुली येवोत. दिगंतांतील विद्यार्थी येवोत. येथें छोटी विश्वभारती करूं. गुरुदेवांची महान् विश्वभारती. ही आपली छोटी. "

ताई, पंढरी, सुनंदा आई सारी इकडेच आली. नदी वहात होती. मंद वारा वहात होता. आकाश फुललें होतें. सारी बोलत होतीं. रंगाच्या कथा, वासुकाकांच्या, सर्वांच्या. सर्वांचें कृतज्ञतेने स्मरण करण्यांत येत होतें. जणुं श्राद्ध केलें जात होतें. मधून डोळ्यांतून अश्रु येत. तर्पण होई.

" ऊठ नयना " मणि म्हणाली.

" ऊठ रंगा " ताई म्हणाली.

" ती का रंगा ? लतेनें हंसून म्हटले.

" होय. या एका देहांत दोन आत्मे, दोन हृदयें, दोन मनें एकरूप होऊन आहेत. रंगा अमर आहे. " सुनंदा आई गंभीरपणें म्हणाली,

" होय रंगा अमर आहे, **भारत अमर आहे.**" सारीं आनंदानें गर्जली.

**जय हिंद**

